## सूचना.

मूळ संस्कृत कादंबरी ग्रंथाचें मराठी भाषांतर वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री बाळशास्त्री देव टोंकेकर ह्यांनीं सविस्तर केलें आहे त्याचा सारांश निवडून हा संक्षिप्त ग्रंथ केला आहे.

कादंबरी सार पूर्वार्ध

[illegible] टोकेकर

# प्रस्तावना.



प्राचीनकाळीं जे प्रख्यात कवि होऊन गेले त्यांमध्यें गणनीय जो बाणभट्ट कवि त्यानें संस्कृत भाषेंत कादंबरी म्हणून एक ग्रंथ केला आहे. तो ग्रंथ सर्व विद्वानांस मान्य व सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्या ग्रंथांत स्वकपोलकल्पित कथानिबंधन आहे. तो सर्व ग्रंथ गद्यात्मक आहे. त्यांतील कथानकांत मुख्य नायिका कादंबरीनामक गंधर्वकन्या आहे, म्हणून कवीनें ग्रंथाचें नांव कादंबरी हेंच ठेविलें. त्या ग्रंथांत शृंगाररस प्रधान आहे. ग्रंथाची कविता विलक्षण आहे. ह्या कवीची वर्णन करण्याची हातवटी लोकोत्तर आहे. संस्कृतभाषेंत जितके अलंकार व जितके कवितेचे गुण तितके ह्या ग्रंथांत आहेत, म्हणूनच ह्या कादंबरी ग्रंथाचा आदर विद्वान करितात; परंतु पदशः अर्थ समजण्यास कठीण आहे म्हणून सामान्यज्ञानाचे लोक कादंबरीग्रंथ वाचावयास झटत नाहींत.

अशाही प्रकारच्या ग्रंथाचा अर्थ प्राकृतजनांससुद्धां कळावा म्हणून राजमान्यराजश्री विद्वद्वर्य बाळशास्त्री देव टोंकेकर पंडित निसबत सरकारी भाषांतरखातें ह्यांनीं राजशासन निमित्तकरून फार श्रम घेऊन त्या ग्रंथाचें पदशः प्राकृतभाषेंत भाषांतर केलें. तें भाषांतर फार चांगलें झालें आहे व मूलग्रंथ मोठा असल्यामुळें मोठेंही झालें आहे. परंतु तें भाषांतर मूलग्रंथाचा पदशः अर्थ लावण्यास जितकें उपयोगीं पडेल तितकें कथा वाचून मनोरंजन करण्याच्या उपयोगीं पडावयाचें नाहीं. प्राकृत लोक तर बहुतकरून कथापर असतात अशांचें मनोरंजन ह्या ग्रंथापासून व्हावें ह्या हेतूनें त्या प्राकृत भाषांतराचा सारांश घेऊन कथापरांचें कथा वाचून मनोरंजन होण्याजोगा हा संक्षिप्त ग्रंथ लिहिला आहे. ह्यांत मुळची कथा किंचित् ही सोडिली नाहीं. वर्णनाचे मुख्य भाग तेवढे घेतले आहेत, कोठें विस्तारानें केलेलें वर्णन थोडक्या शब्दांत आणून लिहिलें आहे. वर्णनाचे कांहीं अंश सांप्रतच्या लोकांस रुचायाजोगे नाहींत ते सोडले आहेत. भाषेची रीत व व्याकरणशुद्धि जितकी संभाळवली

तितकी संभाळून वाचणाऱ्यांस बरें वाटेल अशा प्रकारें लिहिण्याचा क्रम ठेविला आहे. इतकें केलें तरी ग्रंथ सर्वथा निर्दोष होईल, असें म्हणवत नाहीं. दोषज्ञांस दोषस्थानें बहुत सांपडतील. परंतु गुणज्ञ पुरुष ह्या ग्रंथाचा आदर करतील तरच हा लोकांस प्रिय होईल.

प्राकृत लोकांकरितां हा संक्षिप्त ग्रंथकरण्याचा प्रयास केला, तरी ह्यांत संस्कृत शब्द पुष्कळ ठेविले आहेत. ते अशाकरितां कीं, ग्रंथ प्रौढ दिसावा, आणि हा संस्कृत ग्रंथाचा उतारा असें समजावें, आणि प्रसंगानें त्यात्या संस्कृत शब्दांचा अर्थ ही लक्षांत यावा; म्हणून कोठें कोठें मराठी शब्द तसे चांगले न वाटल्यामुळें व कोठें कोठें तसे प्राकृत शब्द न मिळाल्यामुळें संस्कृत शब्दच ठेवणें प्राप्त झालें.

मुळच्या भाषांतराच्या मानानें हा संक्षेप त्याच्या तृतीयांशा बरोबर ( म्हणजे जसे १२ ह्यांस ४ ) झाला आहे. कोणास वाटेल ह्याहून कमी असावा, तर कमी करितां येईल, आणि कोणास वाटेल ह्याहून अधिक असावा, तर अधिकही करितां येईल. पण केला आहे ह्याहून कमी किंवा अधिक केल्यानें ह्यापेक्षां विशेष चमत्कार होईल असें नाहीं.

मूल कादंबरीचे दोन भाग आहेत. एक पूर्वार्ध व एक उत्तरार्ध. पूर्वार्ध तें खुद्द बाणकवीनें केलें. पुढें तो गत झाल्यावर उत्तरार्ध त्याच्या पुत्रानें केलें, पण त्या बरोबरीच्या योग्यतेचें आहे. हा ग्रंथ पूर्वार्धाचा संक्षेप आहे.

प० ब० गो०

# कादंबरीसारः

## प्रथम भाग.

### मंगलाचरण.

#### श्लोक.

जगाच्या जनीकारणें जो रजातें ॥
धरी पालना सत्व, नाशा तमातें ॥
स्वरूपीं धरी जो अशा तीं गुणातें ॥
नमस्कार माझा असो त्या अजातें ॥ १ ॥

#### आर्या.

रावणबाण प्रमुखाऽसुर निर्जर धरिति मस्तकिं जयातें ॥
ते पावोत त्र्यंबक पद्पंकजरेणु भवहर जयातें ॥ २ ॥
तो विष्णू जय पावो कोपारुण दृष्टिनेंच हेरून ॥
उर अरिचें जणु फुटलें करि जो आरक्तवर्ण दूरून ॥ ३ ॥
सद्गुरु भर्वू याच्या करितों मी नमन पद्युगास तया ॥
मौखर्यादिक राजे मुकुटें नीराजितात सतत जया ॥ ४ ॥

### कथाप्रशंसा.

#### आर्या.

सरसा मधुरालापा सालंकारा स्वयंगता त्द्द्या ॥
रंजविते रसिकांला नव युवती सत्कथाहि अनवद्या ॥ १ ॥
रचिल्या कथा सुरम्या दीपसमोज्वल पदार्थ जे त्यांहीं ॥
मोहिति मना जनाच्या ग्रथिल्या माला जशा नवसुमांहीं ॥ २ ॥

### कविवंशवर्णन.

#### श्लोक.

ज्याचें असे वत्स कुळांत जन्म ॥

प्रख्यात ज्याचें गुणकीर्ति नाम ॥
अनेकगुप्तार्चितपाद तो कीं ॥
कुबेर नामा द्विज साधु लोकीं ॥ १ ॥
विष्णूदरातें विधि जेंवि आला ॥
क्षीराब्धिला जेंवि कलाप[1] झाला ॥
सुपर्ण[2] जैसा सुत कश्यपाला ॥
झाला तसा अर्थपती तयाला ॥ २ ॥
क्षीरोदधी पासुनि शीतभानू[3] ॥
झाला तसा तेथुन चित्रभानू ॥
निजें यशें जो भरि विष्टपाला[4] ॥
त्यापासुनी हा कविबाण झाला ॥ ३ ॥
प्रसिद्ध जो बाणकवी तयानें ॥
स्वबुद्धिच्या केवळ वैभवानें ॥
केली मनो हारि रसें सनाथा[5] ॥
कादंबरी नाम विचित्र गाथा[6] ॥ ४ ॥

---

१ चंद्र. २ गरुड. ३ चंद्र. ४ त्रिभुवनाला. ५ युक्ता. ६ ग्रंथ.

# कादंबरीसार.



पूर्वी शूद्रक ह्या नांवाचा कोणी एक राजा होता. तो असा कीं, ज्याची आज्ञा सर्व राजे शिरसामान्य करीत असत. ह्या मुळें हा भूलोकचा इंद्रच काय असें लोकांस वाटे; जो समुद्रवलयांकित पृथ्वीचें पालन करणारा; ज्याच्या प्रतापाच्या व प्रीतीच्या योगानें सर्व मांडलिक राजे ज्यास अति नम्र असत; जो सार्वभौम राजाच्या सर्व लक्षणांनीं युक्त होता; विष्णूच्या प्रमाणें ज्याच्या हस्ताचे ठायीं (रेषारूप) शंख चक्र चिन्हें होतीं; महादेवाप्रमाणें ज्यानें मदन जिंकिला होता. कार्तिकस्वामीच्या प्रमाणें ज्याची शक्ति अकुंठित होती; ब्रह्मदेवाप्रमाणें राजहंसें मंडळावर जो आरोहणें करणारा; जो समुद्राप्रमाणें लक्ष्मीला प्रसवणारा; जो सूर्यासारखा प्रतिदिवशीं उदय पावणारा; जो मेरु पर्वताप्रमाणें सकल भुवनास आश्रय देणारा; दिग्गजाचा कर म्हणजे शुंडादंड निरंतर दानोदकानें म्ह० मदोदकानें आर्द्र असतो, तसा ज्याचा कर म्ह० हस्त दानोदकानें म्ह० गोधनादि दानाच्या उदकानें आर्द्र असे; जो लोकांस आश्चर्यकारक अशीं अनेक कर्में करणारा; जो अनेकविध यज्ञ करणारा; जो सर्व शास्त्रांचा आदर्श; जो चतुःषष्टिकलांचें उत्पत्तिस्थान; जो दयादि सद्गुणांचें कुलभवन; जो काव्यामृत रसाचा उगम; जो मित्रमंडलास उदयपर्वत; जो शत्रुजनास उत्पातकेतु; जो कथा प्रबंधांचा प्रवर्तक; जो रसिकजनांचा आश्रय; जो धनुर्धरांचें निराकरण करणारा; जो साहसकर्म करणाऱ्यांमध्यें अग्रेसर; जो चतुर पुरुषांमध्यें अग्रगण्य; जो शरणागतांस आनंद देणारा; जो आपल्या धनुष्याच्या अग्रानें शत्रूंचा उच्छेद करणारा; असा होता.

आणखी तो राजा असा होता कीं, ज्याचें नांव ऐकूनच शत्रूंचीं ऱ्हदयें फाटून जात, म्हणून एका शत्रूचें ऱ्हदय फाडणारा जो नरसिंह

---

१ कार्तिकस्वामीची शक्ति ह्मणजे आयुधविशेष आहे. २ सामर्थ्य. ३ पक्षिविशेष. पक्षीं श्रेष्ठराजे. ४ बसणारा. पक्षीं चढावकरून जाणारा.

५ सूर्य मंडल. पक्षीं मित्रसमुदाय. ६ उदयस्थान. ७ नाशसूचक धूमकेतु.

त्यास हांसणारा; तसेंच ज्यानें एकाच विक्रमानें भुवनत्रय व्यापिलें म्हणून जो तीन विक्रमांनीं म्ह० तीन पादक्रमणांनीं भुवनत्रय व्यापणाऱ्या वामनावतार घेणाऱ्या विष्णूस हांसणारा; दुष्ट राजांजवळ बहुत दिवस राहिल्यामुळें मळिण झालेली राजलक्ष्मी ती आपलें अंग धुऊन टाकण्या करितांच काय ज्याच्या तरवारीच्या धारेच्या पाण्यांत येऊन वसली; ज्याच्या मनाचे ठायीं धर्म, कोपाचे ठायीं यम, प्रसादाचे ठायीं कुबेर, प्रतापाचेठायीं अग्नि, हस्ताचे ठायीं पृथ्वी, दृष्टीचेठायीं लक्ष्मी, वाणीचे ठायीं सरस्वती, मुखाचे ठायीं चंद्र, बलाचे ठायीं वायु, बुद्धीचे ठायीं बृहस्पति, रूपाचे ठायीं मदन, आणि तेजाचे ठायीं सूर्य, राहिल्या मुळें विश्वरूपी देवतामय जो नारायण त्याचें अनुकरण करणारा, खड्गरूप हस्तानें बोलावलेली जी शत्रूंची राजलक्ष्मी ती व्यभिचारिणी स्त्री सारखी वारंवार ज्याच्या जवळ येत असे; ज्याचा प्रतापाग्नि शत्रूंस जाळून त्यांच्या विरहिणी स्त्रियांच्या हृदयांत राहणारे जे त्यांचे पति त्यांसही जाळण्या करितां रात्रंदिवस प्रज्वलित असे; असा होता.

तो राजा सर्व पृथ्वी जिंकून तिचें पालन करीत असतां सर्व लोक स्वधर्मानें उपद्रव रहित वागत असत. ज्याच्या राज्यांत चित्रें रंगविण्याच्या कामांमध्यें मात्र वर्णसंकर ( रंगांचें मिश्रण ) लोकांत वर्णसंकर ( ब्राह्मणादि वर्णांचा संकर ) नसे. सुरत काळीं मात्र केशग्रहण, अन्यत्र नाहीं. कवितेमध्यें मात्र दृढबंध ( चक्रपद्मादि ), इतरत्र बंध नाहीं. शास्त्राविषयीं मात्र चिंता ( चिंतन ) लोकांस चिंता ( काळजी ) नसे. स्वप्नांत मात्र असंगत भाषण. छत्रास मात्र सुवर्ण दंड ( दांडा ), लोकांस सुवर्ण दंड ( धन दंड ) नसे. ध्वजास मात्र प्रकंप असे. गीतामध्यें मात्र राग असे. गजास मात्र मदविकार असे. धनुष्यास मात्र गुणच्छेद ( दोरीचा तुकडा ) असे, अन्यत्र गुणच्छेद ( गुणांचा उपमर्द ) नसे. चंद्र, खड्ग, आणि कवच, ह्यांस मात्र कलंक लागत असे. प्रेम कलहांत मात्र दूत प्रेषण होत असे. सोंगट्या, बुद्बळें, ह्यांच्या पटांचीं घरें मात्र रिकामीं असत, ग्रामांतील कोणतेंही घर रिकामें नसे.

ज्याच्या राज्यांत परलोकाचें मात्र भय असे. स्त्रियांच्या केशांचे ठायीं मात्र वक्रता. पादभूषणांचे ठायीं मात्र शब्द बाहुल्य. विवाहाचे ठायीं मात्र करग्रहण म्ह० पाणिग्रहण. अन्यत्र करग्रहण म्ह० खंडणी

घेणें नसे. होमधूमानें मात्र नेत्रापासून अश्रुपात होत असे, दुःखानें होत नसे. घोड्यांस मात्र चाबुकाचा मार असे. मदनाचीं धनुष्यादि शस्त्रें मात्र कामांत वागत असत, शत्रू नसल्यामुळें मानवी शस्त्रें बाहेर काढण्याचें काम पडत नसे.

अशा त्या राजाची विदिशा नांवाची राजधानी मालव देशांत होती. ज्या राजधानींत सर्वत्र कलियुग असतां ही कृतयुगींच्या धर्मांनीं लोक वागत असत. ती राजधानी इतकी विस्तीर्ण होती कीं हें त्रिभुवन इजपासूनच उत्पन्न झालें काय असें लोकांस वाटे. ती राजधानी वेत्रवती नदीनें वेष्टित होती. तिजमध्यें स्नानार्थ शिरलेल्या स्त्रियांच्या स्तनांच्या ताडनांनीं तिच्या लाटा फुटत असत. रंगविलेले हत्ती तिजमध्यें बसवीत असल्यामुळें त्यांच्या गंडस्थळावरील शेंदराच्या रंगानें तिचें पाणी तांबडें लाल होत असे. तिचें तीर उन्मत्त राजहंसांच्या शब्दांनीं नादयुक्त होत असे. अशा राजधानींत तो राजा राज्य करीत असतां, संपूर्ण भुवनमंडल जिंकल्यामुळें त्याला राज्याविषयीं कांहीं काळजी राहिली नव्हती. द्वीपांतरांपासून अनेक राजे येऊन त्याच्या पादयुग्मास आपल्या मुकुटरत्नदीपांनीं ओंवाळीत असत. तो राजा पृथ्वीरक्षणाचा भार आपल्या भुजानें हातांतल्या कड्या प्रमाणें सहज धरीत असे. त्या राजाच्या समीप वागणारे जे प्रधान ते बृहस्पतीपेक्षांही बुद्धिमंत, कुलपरंपरागत, नीतिशास्त्रज्ञ, निर्लोभ, ज्ञानसंपन्न, असे असत. ज्या राजपुत्रांबरोबर तो राजा क्रीडा करीत असे ते राजपुत्र वय, विद्या, आणि अलंकार, ह्यांनीं राजाच्या बरोबरीचे, मोठ्या राजकुळांत उत्पन्न झालेले; विद्या कला ह्यांत निपुण; प्रौढरीतीनें वागणारे; कालदेश जाणणारे; राजावर प्रेम ठेवणारे; सभ्य रीतीनें विनोद करणारे; कामक्रोध लोभांनीं रहित; दुसऱ्यांचें मनोगत जाणणारे; काव्य, नाटक, आख्यानें, चित्रकर्म, शस्त्रास्त्र विद्या इत्यादि कर्मांमध्यें कुशळ; शरीरानें पुष्ट असून बळकट; सिंहासारखे पराक्रमी; आंगीं अनेक गुण असतां नम्रपणानें वागणारे, असे होते. म्हणून हीं आपलीं प्रतिबिंबेंच काय असें राजास वाटत असे. अशा स्थितींत त्या राजानें आपलें पूर्ववय आनंदानें घालविलें.

तो राजा अतिरूपवान्, गुणवान्, नीतिमान्, तरुण, असा होता.

त्यास पुत्रसंतति असावी असें प्रधानादिक इच्छित असतांही तो स्त्रीसं-भोगाचा कंटाळा करीत असे. कारण कीं, त्याचें मन निरंतर शत्रु जिं-कण्याकडे गुंतलेलें असे, आपल्या शरीरसंपत्तीला न्यूनता न यावी असें त्यास वाटत असे म्हणून तो स्त्रीजनास तुच्छ मानी. त्याचा स्त्रीजन आपल्या सौंदर्यानें रतीचा उपहास करणारा, नम्रपणानें वागणारा, कुली न, विलासानें मनोहरण करणारा, असा जरी होता तरी तो राजा त्याच्या उपभोगाविषयीं पराङ्मुख असे.

पराङ्मुख असण्याचें दुसरें कारण, त्या राजाला गाण्याचा छंद होता म्हणून कधीं आपणच गात बसे, कधीं आपण मृदंग वाजवीत असे, कधीं वीणा वाजवीत बसे, कधीं चित्रें काढीत व तीं रंगवीत बसे, कधीं चतुर मंडळी जमवून अनेक प्रकारची कविता करावी, किंवा कधीं शास्त्रीय वादविवाद करावे, किंवा आख्यानें, कथा, इतिहास, पुराण ह्यां-चें श्रवण करावें, अशा प्रकारें काळ घालवीत असे. कधीं मृगया कर-ण्याकरितां अरण्यांत जाऊन अनेक जातीचे पशु मारीत असे; कधीं आपल्या घरीं आलेले ऋषि ह्यांच्या सेवेंत तत्पर होऊन राहत असे; क-धीं आपल्या मित्रमंडळीबरोबर क्रीडा विनोद करून रात्र घालवीत असे.

कोणे एके दिवशीं पद्मांचा विकास करीत आणि आकाशाचा तांब-डेपणा कमी करीत भगवान् सहस्रकिरण सूर्य उदयास पावून कांहींसा वर आला अशासमयीं हा राजा सभामंडपांत सुखासनावर बसला असतां एक द्वारपालिका राजापुढें येऊन उभी राहिली. तिनें शुभ्र वस्त्राचें परि-धान केलें होतें, डाव्या काखेंत खड्ग धरला होता, आणि उजव्या हातांत वेताची काठी घेतली होती. जिनें आंगास चंदनाची उटी लावली होती, राजाच्या भोंवतालीं बसलेल्या मांडलिक राजांच्या मुकुटांवरील रत्नांत तिचीं प्रतिबिंबें पडलीं होतीं त्यामुळें असें वाटे कीं, राजाची मूर्तिमंत आ-ज्ञा सर्वांनीं मस्तकीं धरली आहे काय : सकल राजमंडल तिच्या स्वाधी-न असे, त्याजमुळें ती राज्याची अधिष्ठात्री देवताच काय असें वाटे. अशी ती द्वारपालिका गुडघे आणि हात भूमीवर टेंकून नम्रतेनें बोलती झाली. महाराज, दक्षिण देशाकडून कोणी एक चांडालकन्या एक राघूचा पिं-जरा हातीं घेऊन दरवाज्या बाहेर येऊन उभी राहिली आहे. तिच्या शरीरावर तेज विलक्षण दिसत आहे. ती महाराजांस विज्ञापना करीत

आहे कीं, आपण समुद्रासारखे संपूर्ण रत्नांचें पात्र आहां, आणि हा पक्षीही सकल भूमंडलामध्यें आश्चर्यकारक रत्नभूतच आहे. हा महाराजांस अर्पावा म्हणून त्याला घेऊन मी महारजांच्या पायांजवळ आलें आहें, आणि महाराजांच्या दर्शनाचें सुख अनुभवावयास इछीत आहें. ह्यावर महाराज आज्ञा करतील ती प्रमाण असें बोलून ती द्वारपालिका उगीच उभी राहिली.

राजानें तें मोठें कौतुक मानून जवळ बसलेल्या मांडलिक राजांच्या मुखांकडे पाहून, काय हो, ती चांडाल कन्या आंत आली असतां काय दोष आहे? असें बोलून तिला आंत येऊंद्या अशी आज्ञा दिली. मग त्या द्वारपालिकेनें राजाच्या आज्ञेप्रमाणें त्या चांडालकन्यकेस आंत जावयास सांगितल. सांगतांच त्या चांडालकन्यकेनें आंत प्रवेश करून राजास अवलोकिलें; असें कीं, मध्यें राजा बसला आहे, त्याचे भोंवतालीं हजारों मांडलिक राजे बसले आहेत. ह्यामुळें कुलपर्वतांच्या मध्यें जसा मेरुपर्वत तसा राजा शोभत आहे. ज्याचे शरीरावयव रत्नालंकारांनीं आछादित आहेत; त्या रत्नांच्या प्रभा मिश्रित झाल्यामुळें भोंवतालीं इंद्रधनुष्यें पडल्याची भ्रांति होत आहे. ज्या मंडपांत राजा बसला होता त्या मंडपास वर पांढरा सफेत रेशमी चांदवा बांधला आहे. त्यास मोत्यांच्या झालरी लावल्या आहेत. त्याला सोन्याच्या सांखळ्यांनीं बांधलेले रत्नजडित चार खांब आहेत. अशा मंडपांत चंद्रकांतमण्याच्या सिंहासनावर राजा बसला आहे. त्याजवर सोन्याच्या दांडीच्या चवऱ्या उडत आहेत. त्या चौकांत इंद्रनील पाषाणांची फरसबंदी केली आहे. सिंहासनास माणकें जडलीं आहेत. त्यांच्या तांबड्या कांति मंडपावर पडल्या आहेत. अमृताच्या फेंसा सारखीं पांढरीं व सूक्ष्म अशीं रेशमाचीं वस्त्रें राजानें आंगावर घेतलीं आहेत, त्या वस्त्रांच्या कांठांवर राजहंसांचीं चित्रें आहेत, व त्या वस्त्रांच्या सूक्ष्म दशा चवऱ्यांप्रमाणें हालत आहेत. राजानें आपल्या उरस्थळावर शुभ्र चंदनाची उटी लावून वर केशराचे टिपके दिले होते. ह्यामुळें कैलासपर्वत पांढरा असून त्यावर सकाळचें कोंवळें ऊन पडावें तशी शोभा दिसत आहे; राजाच्या गळयांत तेजस्वी मोत्यांचा हार होता तेणेंकरून नक्षत्र माळेनें वेष्टिलेल्या चंद्राप्रमाणें त्याच्या मुखाची शोभा दिसत आहे; राजाचे भुज भुजंगाप्रमाणें स

रळ दिसत आहेत; त्या भुजांवर इंद्रनील रत्नखचित बाहुभूषणें बांधिलीं आहेत; कानांवर कमलपुष्पें ठेविलीं आहेत; ज्याची नासिका सरळ आणि उच्च आहे; ज्याचे डोळे फुललेल्या कमलाप्रमाणें विस्तीर्ण आहेत; ज्याचें ललाट सुवर्णाच्या पत्र्याप्रमाणें गौरवर्ण असून अष्टमीच्या चंद्राप्रमाणें बांकदार आहे; ज्याच्या भुंवया कमानी सारख्या वक्र असून त्यांच्या मध्यभागीं बारीक केसांचा भोंवरा आहे; ज्यानें आपल्या मुकुटावर सुवासिक श्वेतपुष्पें धरल्यामुळें तो नक्षत्रांनीं वेष्टित अस्ताचलाप्रमाणें शोभत आहे; ज्याच्या भोंवतालीं सेवा करणाऱ्या अनेक स्त्रिया उभ्या आहेत; त्याचें प्रतिबिंब रत्नखचित भूमीवर पडलें होतें; त्यामुळें पृथ्वीनें आपला पति प्रेमानें आपल्या हृदयांतच धरिला आहे काय असें वाटत आहे; ज्याच्या शरीरावर राज्यलक्ष्मीची विलक्षण शोभा दिसत आहे; असंख्य सेवकजन ज्याच्या भोंवतीं सेवातत्पर होत्साते उभे राहिले आहेत; ज्यानें हातांत तरवार घेतली आहे; जो एके ठिकाणीं बसला असतां त्याचा दरारा सर्वत्र लोक मानीत आहेत; ज्याचे डोळे मोठे असून दृष्टि फार सूक्ष्म आहे; जो सर्व गुणांचें अधिष्ठान, जो लावण्यरसाची खाण, जो स्त्रीजनास मूर्त मदन. ज्याचें दानविधान संतत चाललें आहे, अशा प्रकारचा राजा तिनें पाहिला.

त्या चांडाल कन्यकेनें दुरून राजास पाहून रत्नजडित कंकणांनीं शोभमान व आरक्त कमलपुष्पाप्रमाणें कोमल अशा आपल्या हस्तानें एक वेळवाची बारीक काठी, जिचें अग्र पिंजलें आहे, अशी घेऊन सर्व राजमंडळास आपलें येणें कळावें म्हणून ती एक वेळ सभेच्या चौकाच्या फरसबंदीवर मोठ्यानें आपटिली. तेव्हां अकस्मात् झालेल्या तालवृक्षांच्या पतनाच्या शब्दानें हत्तींचा कळप आपलें चरणें सोडून तिकडेसच तोंड करून जसा पाहतो, त्याप्रमाणें तें सर्व राजमंडळ अकस्मात् झालेल्या काठीच्या कठोर शब्दानें एकदम तोंडें फिरवून राजाकडचें पाहणें सोडून त्या चांडालकन्यकेकडे पाहूं लागलें.

महाराज, त्या चांडालकन्यकेकडे दृष्टि द्यावी, असें बोलून, त्या द्वारपालिकेनें दुरून दाखविलेल्या त्या चांडालकन्यकेकडे राजा टक लावून पाहूं लागला. तिच्या पुढें एक पुरुष होता, त्याच्या मस्तकावरचे केश वृद्धत्वामुळें पांढरे झाले होते; त्याचे नेत्रप्रांत तांबड्या कमळाप्रमाणें लाल

होते; तो कसरत करीत असल्यामुळें तारुण्य गेलें असतांही त्याच्या शरीराचे सांधे बळकट दिसत होते; तो जातीचा मांग असून आकृतीनें फारसा क्रूर दिसत नव्हता. त्यानें मोठ्या योग्यतेचा वेष धरिला होता; त्याच्या आंगावरचीं वस्त्रें पांढरीं स्वच्छ होतीं; तसाच तिच्या पाठीमागें एक मुलगा होता. तोही चांडाळजातीचा होता. त्याच्या दोन कानावर दोन झुलपें लोंबत असून, तीं वाऱ्यानें हालत असत; त्याच्या हातीं सोन्याच्या तारांचा एक पिंजरा होता. त्यांत हिरव्या रंगाचा एक रांवा होता. त्याच्या अंगप्रभेनें तो पिंजरा पाचूरत्नाच्या पिंजऱ्याप्रमाणें दिसत असे. ती चांडाळकन्यका इतकी काळी होती कीं, अमृतमंथनसमयीं श्रीविष्णूनें कपटानें स्त्रीरूप धरलेली मोहिनी किंवा इंद्रनील मण्याची चालती बोलती पुतळीच काय अशी दिसत असे. तिनें घोट्यांपर्यंत लोंबणारा काळा झगा घालून वर तांबडें वस्त्र वेष्टिलें होतें. ह्यामुळें नील कमलांनीं आच्छादिलेली भूमि तांबड्या उष्णानें जशी शोभते तशी शोभत असे. तिनें आपल्या मस्तकावरील काळ्या केशांत हस्तिदंताची पांढरी फणी खोंवली होती, ती नीलवर्ण आकाशांत चंद्राच्या कलेप्रमाणें दिसत असे. तिनें ललाटस्थानीं गोरोचनाचा टिळा लाविला होता तो तृतीय नेत्रासारखा दिसत असल्यामुळें ती भिल्लिणीचा वेष घेणाऱ्या भवानीप्रमाणें दिसत असे. तिनें दाट अळत्याच्या रंगानें आपले तळपाय रंगविले होते; तिच्या पादभूषणांच्या मण्यांची प्रभा तिच्या सर्व अंगावर पडली होती; तिच्या कमरेस मेखला म्हणून जें भूषण होतें तेणेंकरून तिची कटी फार शोभत होती; तिच्या गळ्यांत मोत्यांचा हार होता तो यमुना नदींत शिरलेल्या गंगाप्रवाहाप्रमाणें शोभत असे; तिचे नेत्र शरदृतूंतल्या विकसित कमलांप्रमाणें दिसत असत; तिचे केश दाट आणि काळे होते ह्यामुळें तिचा मस्तक वर्षाऋतूंतील मेघछन्न आकाशाप्रमाणें दिसत असे; तिनें आपल्या मस्तकावर चंदनाचा कोमल पल्लव खोंवला होता, व कानांत चित्रविचित्र भूषणें घातलीं होतीं, हातांत एक कमलपुष्प धरलें होतें, पुरुषांचें मन हरणाऱ्या सौंदर्यानें ती संपन्न होती. मदनाच्या धनुष्या प्रमाणें तिचा मध्यभाग फार सूक्ष्म होता. तिच्या शरीरांत यौवनानें नुकताच प्रवेश केला होता. तिची

आकृति व तिचें स्वरूप हीं लोकोत्तर सुंदर होतीं. अशा त्या मातंग कन्यके कडे पाहून त्या राजास मोठें कौतुक वाटलें.

राजा मनांत म्हणतो, काय हा ब्रह्मदेवाचा भलत्याच ठिकाणीं उत्त-मरूप करण्याचा प्रयत्न ? जर हिनें आपल्या रूपानें सर्व स्त्रियांच्या रूपांचा उपहास करावा म्हणून ब्रह्मदेवानें ही उत्पन्न केली असें म्हणावें, तर ज्या कुलांत उत्पन्न केल्यानें श्रेष्ठ कुलांतील उत्तम पुरुषाचें स्पर्शसुख व संभोग सुख प्राप्त व्हावयाचें नाहीं, अशा निकृष्ट चांडालकुलांत हि-ला कशासाठीं उत्पन्न केलें ? मला आणखी असें वाटतें कीं चांडाल जातीचा स्पर्श झाला असतां दोष होईल ह्या भयानें हस्तस्पर्श न करितां ब्रह्मदेवानें मनेंकरूनच ही निर्मिली असेल. असें न म्हणावें तर हिचें श-रीर इतकें सुकुमार कसें असतें ? कारण हस्तस्पर्शानें म्लान झालेल्या शरीराची अशी टवटवीत कांति नसते. असो, जाति आणि रूप ह्यांचा अयोग्य संयोग करणाऱ्या ब्रह्मदेवास धिक्कार असो. कांकीं हिची आ-कृति अति मनोहर असून हा क्रूर जातीची केली. ही रमणीय असून मनास खेद देते. असें चिंतन करीत राजा उगाच स्तब्ध बसला आहे, इतक्यांत त्या चांडाल कन्यकेनें खालीं वांकून प्रौढ स्त्रीप्रमाणें राजास प्रणाम केला. ती राजाच्या आज्ञेनें रत्नखचित भूमीवर बसली असतां तिच्या बरोबरचा वृद्ध पुरुष कांहींसा पुढें होऊन मुलाच्या हातीं जो राघूचा पिंजरा होता तो आपल्या हातीं घेऊन तो राजा पुढें करून म्हणाला कीं, महाराज, सर्व पृथ्वीवरचें एक रत्न असा हा वैशंपायन नांवाचा राघू समुद्रा सारखे सर्व रत्नांचें पात्र भूत आपण अशा आप-णांस द्यावा म्हणून आमच्या धन्याची कन्या महाराजांच्या पायांपाशीं आली आहे. हा राघू बहुगुणी आहे असा कीं, सर्व शास्त्रार्थ जाणरा-णारा, राजनीतींत प्रवीण, पुराण इतिहास ह्यांतील कथा बोलण्याविषयीं निपुण, गायन विद्या जाणणारा, चमत्कारिक बोलून लोकांस हांसविणा-रा; काव्यें, नाटकें, आख्यानें, इत्यादि सुभाषितांचें अध्ययन करणारा, व नवीन रचना करणारा; वीणा, वेणु, मृदंग, इत्यादि वाद्यांचें मार्मिक-पणानें श्रवण करणारा; नृत्याच्या गति दाखविण्याविषयीं निपुण; चि-त्रें काढण्याविषयीं कुशल; द्यूतक्रीडाकरण्याविषयीं प्रवीण; प्रीतिकल-हानें रुसलेल्या स्त्रियांस प्रसन्न करण्याविषयीं चतुर; अश्व, गज, पुरुष,

ह्यांच्या लक्षणांचा ज्ञाता; खिन्न झालेल्या चित्तास मधुर भाषणानें आनंद देणारा, असा हा आहे. ह्याचा स्वीकार महाराजांनीं करावा. असें बोलून राघू या पिंजरा राजापुढें ठेवून मागें सरला.

तो पुरुष राजापुढें पिंजरा ठेवून मागें सरल्या नंतर त्या पिंजऱ्यांतील पक्षिराजानें राजाकडे मुख करून उजवा पाय वर उचलून धरून स्पष्टाक्षर आणि मधुर अशा वाणीनें जयशब्द उच्चारून राजाच्या उद्देशानें ही आर्या म्हटली.

त्वद्रिपुनारीस्तनयुग अंतः शोकाग्निसन्निहित राया ॥
अश्रुस्नात विमुक्ता हार जणो राहिलें तप कराया ॥१॥

हिचा अर्थ असा कीं, हे राया, तुझ्या शत्रूंच्या स्त्रियांचें स्तनयुग्म जणो तपच करीत आहे. तप करणारा नित्यस्नान करितो तसें हें ही नेत्रोदकानें नित्य स्नान करितें, म्हणजे भिजतें. तप करणारा अग्निसेवन करितो, तसें हेंही हृदयांतील शोकाग्नीच्या संन्निध राहिलें आहे. तपकरणारा विमुक्ताहार म्हणजे आहारशून्य असतो. तसें हेंही विमुक्ताहार म्हणजे मुक्ताहारानें शून्य आहे.

राजातर ही आर्या ऐकून आश्चर्ययुक्त होऊन आपल्याजवळ उत्तमासनावर बसलेला, बृहस्पती सारखा विद्वान् वयोवृद्ध ब्राह्मणजातीचा कुमारपालित ह्या नांवाचा जो मुख्य प्रधान त्याशीं मोठ्या हर्षानें बोलूं लागला कीं,अहो प्रधान जी, ह्या पक्ष्याची वर्णोच्चाराची स्पष्टता व स्वराची मधुरता तुम्हीं ऐकिलीना ? आधीं मला हेंच मोठें आश्चर्य वाटतें कीं, ह्या जातीचा पक्षी असून ह्याच्या बोलण्यांत वर्णांचे निरनिराळे विभाग स्पष्ट होतात; व मात्रा, अनुस्वार, विसर्ग, इत्यादिकांचे उच्चारही स्पष्ट होतात. दुसरें असें आश्चर्य वाटतें कीं, शिकलेल्या मनुष्याप्रमाणें ह्या पक्ष्याची बोलण्याची बुद्धिपूर्वक प्रवृत्ति दिसते. कशावरून कीं, ह्यानें उजवा पाय उचलून जय शब्द उच्चारून माझ्या उद्देशानें ही आर्या स्पष्ट शब्दानें म्हटली. बहुतकरून पशु आणि पक्षी हे भय, आहार, निद्रा, मैथुन, आणि संकेत, ह्यांतें मात्र जाणतात. बुद्धिपूर्वक नवी कल्पना जाणत नाहींत. असें असून ह्या पक्ष्यानें आपण कल्पून ही आर्या म्हटली, हें तर मोठेंच आश्चर्य. असें राजा बोलल्यानंतर कुमारपालित मुख्य प्रधान किंचित सहासमुख होऊन राजाशीं बोलूं लागला.

अहो महाराज, ह्यांत काय आश्चर्य आहे ? कारण, पक्षिजातीमध्यें राघू, मैना, इत्यादि कितीएक पक्षी जसें ऐकतात तसें बोलतात. हें आपण जाणतच आहां. त्यांत आणखी असें आहे कीं, जन्मांतरच्या संस्कारानें किंवा मनुष्याच्या प्रयत्नानें त्यांच्या वाणीस संस्कार विशेष उत्पन्न होऊन अधिक चांगले बोलतात. ह्यांत कांहीं मोठें आश्चर्य मानावयास नको. दुसरी गोष्ट अशी आहे कीं, राघू, मैना, इत्यादि पक्ष्यांत पूर्वीं मनुष्याप्रमाणें स्पष्ट वाणी होती, ती अग्नीच्या शापानें अस्पष्ट झाली, आणि हत्तीची जिव्हा उलटी झाली. असें तो प्रधान बोलत आहे इतक्यांत मध्यान्ह झाल्याची सूचना करणारा दोन प्रहरच्या चौघड्याच्या अखेरीस शंखाचा मोठा ध्वनि झाला. ( आतां जसा कर्णा वाजवितात तसा त्याकाळीं शंख वाजविण्याची चाल होती. )

शंखाचा ध्वनि ऐकतांच स्नानाची वेळ झाली असें समजून सर्व राजांस निरोप देऊन राजा सभामंडपांतून उठला. राजा उठतांच सर्व राजे उठले, त्या वेळेस इतकी गर्दी झाली कीं, एकमेकांच्या बाहुभूषणांच्या टोंकांनीं एकमेकांचीं वस्त्रें फाटलीं. कितीएकांच्या गळ्यांतील फुलांचे हार तुटले. आंगास आंग घांसल्यामुळें आंगास लावलेल्या अरगजाचा धुरळा उडून दिशा पिंवळ्या दिसूं लागल्या. गमन काळीं राजास आपण आधीं नमस्कार करावा अशी इच्छा करून खालीं लवणारे राजांच्या गळ्यांतील मोत्यांचे हार रत्नभूमीवर लोळूं लागले, व त्यांच्या कानांवरील कमळें गालांवर लोंबूं लागलीं. मस्तकावरील जाईच्या फुलांचे तुरे हालल्यामुळें जो सुवास पसरला त्याच्या लोभानें भ्रमरांचे थव मंडपांत उडूं लागले. त्याकाळीं चवऱ्या खांद्यांवर घेऊन इकडे तिकडे फिरणाऱ्या दासींच्या मणिमय पादभूषणांच्या शब्दांनीं, संचार करणाऱ्या वेश्यांच्या रत्नमय मेखलांच्या मनोहर शब्दांनीं, वेगानें उठलेल्या हजारों मांडलिक राजांच्या पादाघातांनीं हदरलेल्या सभामंडपांत जो मेघ गर्जने सारखा शब्द उठला त्या शब्दाच्या योगानें, राजमंदिरांतील हंस सारस ह्यांच्या शब्दांनीं, चोपदारांनीं ज्या वारंवार केलेल्या ललकारी त्यांच्या शब्दांनीं, मंगलपाठ करणाऱ्या भाटांच्या जयजयकार शब्दांनीं, मांडलिक राजांचीं मणिमय भूषणें दाटीमुळें मणिमयस्तंभावर आपटल्यामुळें व

मुकुटाला मुकुट घांसल्यामुळें जे खणखण शब्द झाले त्यांच्या योगानें, तो सभामंडप दणाणून गेला.

तो राजा, मांडलिक राजांस निरोप दिल्यावर, त्या चांडाल कन्यकेस अंमळ विसांवा घ्यावा असें स्वमुखानें सांगून, आणि ह्या वैशंपायन नामक राघूस स्नान, खाणें, पिणें, इत्यादिकेंकरून सुखी करीव अशी तांबूलपत्र बाळगणाऱ्या दासीस आज्ञा करून, आपल्या कितीएक अंतरंग मित्रांस बरोबर घेऊन अभ्यंतर गृहांत प्रवेश करिता झाला.

अंतर्गृहांत गेल्यावर राजानें आंगावरचीं भूषणें काढून ठेविलीं. त्या वेळेस तो राजा असा दिसूं लागला कीं, ज्याचे किरण अकस्मात् नाहीं तसे झाले असा सूर्यच काय, अथवा ज्यामधून चंद्र आणि नक्षत्रें नाहीं तशीं झालीं अशा प्रकारचें आकाशच काय? अशा प्रकारचा तो राजा व्यायाम करण्याकरितां ज्यांत व्यायाम साधनें भरलेलीं अशा व्यायामागारांत (तालीम खान्यांत) गेला. नंतर समान वयस्क राजपुत्रांबरोबर त्या राजानें थोडा वेळपर्यंत दंड काढणें, मुद्गल पेलणें, कुस्ती करणें इत्यादि थोडथोडी कसरत केली; त्या वेळेस श्रमामुळें राजाच्या शरीरावर घर्मबिंदु आले ते मोत्यांप्रमाणें दिसूं लागले.

व्यायाम झाल्यानंतर तो राजा तेथून निघून पुढें चालणाऱ्या चोबदारांनीं दाखविलेल्या मार्गानें स्नानगृहांत गेला. तों सेवकजनांनीं स्नानाची सर्व सिद्धता करून ठेविलीच होती. स्नानगृहांत वर चांदवा बांधला होता, त्याच्याखालीं स्फटिकाचा मोठा चवरंग मांडला होता, एक्या आंगें सोन्याची डोणी गंधमिश्रित जलानें भरून ठेविली होती, एकीकडे गंधोदकानें घागरी भरून ठेविल्या होत्या. त्या घागरींच्या तोंडावर गंधलोभानें भ्रमर येऊन बसले होते, त्यामुळें कृष्णवस्त्रानें त्यांचीं तोंडें झांकलीं आहेत काय असें दिसे.

राजा स्नानगृहांत गेल्यावर वेश्यांगनांनीं त्याच्या शरीरास अर्गजा, अष्टगंध, इत्यादि सुगंधि मसाले लावून मृदुहस्तांनीं मर्दन केलें. नंतर तो राजा त्या सुवर्णाच्या डोणींत उतरला तेव्हां त्या स्त्रियांनीं पदरानें स्तन घट्ट बांधून, हातांतील कंकणें मागें सारून, पायांतील भूषणें काढून, पुढें आलेले केश मागें सारून, वस्त्राचे ओंचे मागें खोंवून, त्या राजाचें शरीर चोळून निर्मळ केलें. त्या स्त्रियांचे स्तन कुंभासारखे होते म्हणून ह-

त्तिणीं सहवर्तमान सरोवरांत शिरलेल्या वनगजाप्रमाणें राजा शोभूं लाग-
ला. तदनंतर तो डोणींतून उठून वरुण जसा हंसावर बसतो तसा स्फटि-
काच्या चवरंगावर स्नानासाठीं जाऊन बसला.

मग राजास स्नान घालावें म्हणून त्या वेश्यांगना राजाच्या सभोंवतीं
उभ्या राहिल्या. त्यांतून कोणी सोन्याचे, कोणी रुप्याचे, कोणी रत्नां-
चे कलश हातीं घेऊन त्यांनीं त्यास उष्णोदकानें स्नान घातलें. तेव्हां
जलदेवतांनीं वरुणास स्नान घातलें काय असें वाटलें. राजाचें स्नान
होत असतां अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं, गायक गाऊं लागले,
स्तुतिपाठक स्तुतिपाठ करूं लागले; हे सर्व ध्वनि मिश्रित होऊन राजवा-
ड्यांत मोठाच कोलाहल झाला.

अशा प्रकारें राजा स्नान करून सर्पाच्या कांतीप्रमाणें हलकीं, पां-
ढरीं, स्वच्छ धुतलेलीं, वस्त्रें नेसला. स्नान केल्यामुळें त्या राजाचें शरी-
र शरत्कालच्या स्वच्छ आकाशाप्रमाणें शोभूं लागलें. मग त्या राजानें
शुभ्र मेघाच्या ढगासारखा पांढरा स्वच्छ शालनाम्याचा रुमाल मस्तकास
वेष्टिला, तेणेंकरून तो भागीरथीजलानें ज्याचें शिखर वेष्टिलें अशा हि-
मालयपर्वताप्रमाणें शोभूं लागला. तदनंतर मंत्रानें पवित्र केलेल्या उद-
कानें सूर्यास अर्घ्य देऊन नमस्कार घालून पितरांचें तर्पण करून राजा
देवघरांत गेला. तेथें शिवपूजा करून तेथून निघून होमशाळेंत गेला.
तेथें होम कर्म करून विलेपनगृहांत गेला. त्याठिकाणीं बसून कपाळास
केशरी गंध लावून केशर कस्तूरी, कर्पूर, ह्यांनीं मिश्रित अशा सुगंधि चं-
दनाची उटी सर्वांगास लावून, जाईच्या सुगंधि फुलांचा तुरा मस्तकीं खों-
वून, बहुमूल्य ऊर्णावस्त्र (शाल) पांघरून, रत्नांचीं कर्णभूषणें कानांत घा-
लून, आपणाबरोबर भोजन करण्यास योग्य अशा राजपुत्रांशीं सहवर्त
मान मोठ्या प्रीतीनें यथेष्ट रसमिश्रित अन्नाचें भोजन करिता झाला.

भोजन झाल्यानंतर तो राजा झरझरी ओढून चूळ भरून टाकून
त्रयोदशगुण तांबूल भक्षून त्या रत्नमय भूमीवरून उठला. इतक्यांत
द्वारपालिका जवळ उभी होती तिनें राजास हात देण्याकरितां वेत्रयष्टी
धरतां धरतां कठोर झालेला आपला हात पुढें केला. तो धरून सेवक
जनांसहवर्तमान भोजनोत्तर बसावयाच्या मंडपांत गेला. त्या मंडपास
चोहोंबाजूंस स्फटिकाच्या भिंतीप्रमाणें सफेत पडदे बांधिले होते. खाल-

च्या मणिमय भूमीवर कस्तूरी मिश्रित चंदनोदकाचा सडा घातला होता, व सुगंधि पुष्पें पसरलीं होतीं, त्यामुळें नक्षत्रसमूहानें व्याप्त झालेल्या आकाशमंडलासारखें तें भूमितळ शोभत होतें. त्या मंडपास सोन्याचे खांब होते त्या खांबांवर पुतळ्यां कोरल्या होत्या. त्या मंडपांत अगरूच्या धूपाचा घमघमाट सुटला होता. त्या मंडपाच्या मध्यभागीं स्फटिकाच्या चौथऱ्यावर हस्तिदंताचा पलंग ठेवला होता. त्यावर मऊ न्यहाली घालून निजवर निर्जल मेघासारखा पांढरा स्वच्छ, पुष्पांनीं सुवासित असा, पलंगपोस पसरला होता. उशास मखमाली उशा ठेविल्या होत्या. पायथ्यास पांघरण्याचें ऊर्णावस्त्र ठेविलें होतें, पलंगाच्या एका बाजूस रत्नखचित आसन मांडलें होतें. त्या पलंगावर तो राजा जाऊन बसला.

राजा पलंगावर बसला असतां खड्ग बाळगणारी दासी पलंगाजवळ भूमीवर बसून हातांतील खड्ग आपल्या मांडीवर हळूच ठेवून कमलदलासारख्या नाजूक हातांनीं राजाचे चरण दाबूं लागली. त्या वेळेस दर्शनास आलेले राजपुत्र, व मित्र, व प्रधान, ह्यांबरोबर तो क्षणभर इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलूं लागला.

तदनंतर वैशंपायन शुकाचा वृत्तांत त्यासच पुसावा असें मनांत आल्यामुळें राजानें द्वारपालिकेस हाक मारून आज्ञा केली कीं, अंतर्गृहांत जाऊन तो राघू इकडे घेऊन ये. ती राजाज्ञा मस्तकीं घेऊन ती द्वारपालिका अंतर्गृहांत गेली, आणि राघूचा पिंजरा हातीं घेऊन राजाकडे आली. तिच्या पाठी मागून एक म्हातारा चोबदार हातांतील सोन्याची काठी टेंकीत टेंकीत आला. वृद्धपणामुळें त्याचें आंग वांकलें होतें, व केंस पांढरे झाले होते. त्याचा शब्द गद्गदित झाला होता, आणि त्यानें पांढरा झगा आंगावर घातला होता, ह्यामुळें कोणी वृद्ध राजहंस पक्षिजातीच्या प्रीतीनें राघू पोहोंचविण्या करितांच त्याच्या बरोबर आला आहे काय, असें लोकांस वाटलें. तो चोबदार राजापुढें येऊन भूमीला हात लावून मुजरा करून विज्ञापना करिता झाला कीं, महाराज, राणी साहेबांची विज्ञापना आहे कीं, महाराजांच्या आज्ञेप्रमाणें राघूला स्नान घालून यथेष्ट खाऊं घालून तो द्वारपालिके बरोबर महाराजांच्या पायांशीं पाठविला आहे, ह्याकडे दृष्टि द्यावी, असें बोलून तो चोबदार परत गेला. तदनंतर राजा त्या राघूस पुसता झाला कीं तूं अंतर्गृहांत गेल्यावर

तुला जें जें पाहिजे होतें तें तें खावयास मिळालेंना ? राघूनें उत्तर केलें, महाराज, म्यां काय काय नाहीं खाल्लें ? कोकिल पक्ष्याच्या नेत्राप्रमाणें ज्याचा रंग तांबूस,व ज्याची रुचि तुरट असून गोड, असा जांभळांचा रस यथेष्ट प्यालों; रक्तमौक्तिकांसारखे डाळिंबाचे दाणे पुष्कळ खाल्ले; द्राक्षार सासारखा मधुर असा मोरावळा ही भक्षिला; फार काय सांगावें, राणी साहेबांनीं जे जे पदार्थ मला दिले ते ते अमृताप्रमाणें मला गोड लागले. ते भक्षून मी तृप्त व सुखी झालों आहें. राजा म्हणाला, असो तें राहूं दे, आम्हांस ज्याविषयीं आश्चर्य वाटतें असें तूं आपलें जन्मादिक सर्व पहिल्यापासून एक वेळ सांग. तूं कोणत्या देशांत जन्मलास, तूं पक्षी झालास कसा, तुला वैशंपायन हें नांव कोणीं ठेविलें, तुझी आई कोण, तुझा बाप कोण, तुला वेद कसे आले, तूं शास्त्राचा अभ्यास कसा केला, कलांचें संपादन कोठून केलें, हें सर्व तुला जन्मांतरच्या स्मरणानें प्राप्त झालें किंवा कोणा सत्पुरुषाच्या वरप्रदानानें प्राप्त झालें, किंवा पक्ष्याच्या रूपानें गुप्त राहणारा तूं कोणी महापुरुष आहेस ? तूं पूर्वी कोठें होतास, तुझें वय किती आहे, तूं इतका चतुर असतां पिंजऱ्यांत प्रतिबंध कसा पावलास, चांडाळाच्या हातीं कसा सांपडलास, व येथें कसा आलास, हें सर्व सविस्तर सांगावें.

असें राजानें आपण होऊन मोठ्या उत्कंठेनें संमानपुरःसर विचारिलें असतां तो वैशंपायन शुक क्षणभर ध्यान करून मोठ्या आनंदानें बोलूं लागला, महाराज, ही कथा फार मोठी आहे, ऐकतांना महाराजास फार श्रम होतील. तथापि आपणास ऐकण्याची उत्कंठा असेल तर मी सांगतों, लक्ष देऊन ऐकावी. राजा म्हणाला कांहीं चिंता नाहीं, तुझी कथा ऐकण्याविषयीं आम्हांस कौतुक आहे, सांग कशी ती.

तदनंतर तो वैशंपायन आपली कथा सांगूं लागला, महाराज, या पृथ्वीवर पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत पसरलेली विंध्याटवी म्हणजे विंध्यपर्वतसंबंधी वनभूमि आहे ती प्रसिद्धच आहे. ती विंध्याटवी मध्य देशास शोभविणारी म्हणून पृथ्वीरूप स्त्रीचा कमरपट्टाच काय अशी दिसते. ती वृक्षांच्या दाटीनें भरून गेल्यामुळें तिला फार शोभा आली आहे. त्या झाडींत हत्तींचे हजारों कळप फिरत असल्या-मुळें त्यांच्या मदोदकाच्या सेचनानें ते वृक्ष वाढून इतके उंच झाले आहे-

त कीं, त्यांच्या शेंड्यांवरचीं पांढरीं फुलें नक्षत्र मंडळाप्रमाणें दिसत आहेत. जी मध्यें मदोन्मत्त टिटव्या मिरवेलींचे पल्लव खातात, आणि हत्तींचे छावे आपल्या सोंडांनीं तमाल वृक्षांचे पल्लव ओढतात ह्यामुळें जिकडे तिकडे त्या पल्लवांचा सुवास भरून गेला असतो. वृक्षांचे कोमल पल्लव इतके तांबडे दिसतात कीं जणो लाक्षारंगानें रंगविले आहेत. त्या झाडींत जागोजाग लतामंडप असे शोभायमान आहेत कीं जाणो हीं लक्ष्मीचीं राहण्याचीं घरेंच आहेत. त्या लतामंडपाच्या भोंवतीं नारळींचे, पोफळींचे, केतकींचे, मोठमोठे वृक्ष आहेत. मंडपांतील भूमि फलांचे व पुष्पांचे रस गळत असल्यामुळें ओल्याच झालेल्या असतात. वाटसरू लोकांनीं बसावया करितां जागोजाग लवंगवृक्षांचे पाले पसरले असतात. त्या अटवींत वेलदोड्यांचीं अनेक वनें आहेत. सिंहाच्या नखांत अडकलेलीं हस्तींच्या गंडस्थळांतलीं मोत्यें मिळविण्याकारितां भिल्लांचे नायक हजारों सिंह मारण्याकरितां फिरत असतात. त्या अटवीमध्यें अनेक प्रकारचे पशु, अनेक प्रकारचीं श्वापदें, अनेक प्रकारचे पक्षी, असंख्यात फिरत आहेत; अनेक प्रकारचीं फळझाडें, अनेक प्रकारचीं फुलझाडें आहेत. तीमध्यें अनेक ठिकाणीं पर्वत आहेत. जागजागीं नद्या लहान मोठ्या वाहत आहेत.

त्या विंध्याटवीमध्यें दंडकारण्य नांवाचा एक प्रदेश आहे. त्यांत अगस्त्यमुनीचें आश्रमस्थान आहे. ज्या महामुनीनें इंद्राच्या प्रार्थनेवरून संपूर्ण समुद्राचे उदकाचें प्राशन केलें. मेरु पर्वताच्या मत्सरानें आकाशांत अति उंच वाढलेला जो विंध्यपर्वत तो ज्या महामुनीच्या आज्ञेनें नम्र होऊन राहिला. ज्याच्या जठराग्नीनें वातापीनामक दैत्य जीर्ण केला. ज्याच्या पायांचे रजःकण देव दैत्य मस्तकीं धरिताहेत. जो दक्षिण दिशांगनेच्या मुखावरील कुंकुम तिलक, ज्यानें हुंकारमात्रें करून नहुष राजा स्वर्गावरून भूमितळावर पाडला, त्या महामुनीचा प्रभाव भूमंडळांत प्रसिद्धच आहे.

त्या आश्रमस्थानांतील वृक्ष अगस्त्य मुनीची स्त्री लोपामुद्रा हिनें आपल्या हातानें पाणी घालून वाढविलेले त्या स्थानास फार शोभा देतात. त्या आश्रमस्थानाचे चोंही दिशांचे प्रांतभाग कदलींच्या वनांनीं हिरवे गार दिसतात. त्या आश्रमस्थानामधून कावेरी नदी वाहत आहे.

त्याच आश्रमस्थानांत दशरथाचा पुत्र रामचंद्र ।त्याच्या आज्ञेनें राज्य त्यागून रावणाचा वध करण्याकरितां बंधु लक्ष्मण व स्त्री जानकी ह्यां सहवर्तमान पंचवटींत पर्ण शाला करून अगस्त्य मुनीची सेवा करीत राहिला होता. त्या आश्रमांत मोठाले डोह आहेत ते पाहून असें वाटतें कीं, अगस्त्य मुनीनें पिऊन बाहेर टाकलेलें समुद्राचें सर्व पाणी ह्या डोंहांमध्यें सांचलें आहे. त्याच आश्रमांत मारीचनामक राक्षसानें मायेनें कनक हरिणाचें रूप दाखवून सीतेला लोभ उत्पन्न करून रामचंद्रास फसवून दूर नेलें. त्याच आश्रमस्थानांत सीतेच्या वियोगानें दुःखित झालेले रामलक्ष्मण कबंधनामक दैत्यानें एकदम पुढें येऊन अडविले होते; तें पाहून लोकांस असें वाटलें कीं हे राहूनें ग्रासलेले चंद्रसूर्यच काय आहेत. स्त्री विरहाची व्यथा न व्हावी म्हणून रामचंद्रानें सीतेची पुतळी करून त्या आश्रमांत ठेविली होती, ती अद्यापि तेथें आहे. ह्या प्रकारचे प्राचीन वृत्तांत त्या आश्रमामध्यें अद्यापि स्पष्ट दिसत आहेत. त्याच अगस्त्याश्रमाच्या जवळ पंपानामक मोठें एक सरोवर आहे. तें सरोवर पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं, एक समुद्र अगस्त्यमुनीनें प्राशून नाहींसा केला म्हणून ब्रह्मदेवानें हा दुसरा समुद्रच उत्पन्न केला आहे. त्या सरोवरामध्यें अनेक रंगांचीं कमलें दाट फुललेलीं असतात. त्या कमळांपासून जे मधाचे बिंदु खालीं पाण्यावर पडतात ते मोरांच्या पिसांवरच्या डोळ्यांप्रमाणें शोभतात. त्या सरोवराच्या तीरावर, नाना प्रकारचे पक्षी क्रीडा करितात, व अनेक प्रकारचे वृक्ष आहेत, त्यांहीं करून त्या सरोवरास फारच शोभा आलेली दिसते.

त्या पंपासरोवराच्या पश्चिमतीरीं रामाच्या बाणप्रहरांनीं जर्जरित झालेल्या जुनाट ताल वृक्षांच्या पंक्तीजवळ एक मोठा जुनाट शेंवरीचा वृक्ष आहे. ज्या वृक्षाचा मूलप्रदेश दिग्गजशुंडाकार अशा वृद्ध अजगरानें वेष्टिलेला आहे. त्यामुळें त्याला मोठें आळेंच केलें आहे असें दिसतें. ज्याच्या खांद्यांवर सर्पाच्या कांती लोंबत आहेत त्यामुळें त्यानें सूक्ष्म ( बारीक ) शेला अंगावर घेतला आहे असें वाटतें. आणि दिशांची लांबी मोजण्याकरितांच काय ज्याच्या खांद्या अति दूर पसरल्या आहेत. ह्यामुळें आणखी असें वाटतें कीं, प्रळयकाळीं आपले हजारों हात पसरून तांडव करणाऱ्या शिवाचें तो अनुकरणच करीत आहे. आणि असें वाटतें कीं ह्या-

तारपणामुळें पडण्याच्या भयानेंच काय ज्यानें गगन प्रदेशाचा आश्रय केला आहे. त्या वृक्षावर मुळापासून शेंड्यापर्यंत हजारों वेल गेले आहेत, त्यामुळें असें वाटतें कीं वृद्धपणामुळें त्याच्या शरीरावर ह्या शिरा स्पष्ट दिसत आहेत. ज्याजवरचे बारीक कांटे पाहून असें वाटतें कीं हे सर्वांगावर तिलक बिंदुच उठले आहेत. तो वृक्ष इतका उंच आहे कीं समुद्राचें पाणी घेऊन आकाशांत भ्रमण करणारे जे मेघ त्यांनीं त्याचा शिरोभाग कधीं पाहिलाही नसेल. त्याच्या उच्चपणामुळें असें वाटतें कीं इंद्राच्या नंदन वनांतील कल्पवृक्ष कसे आहेत ते पाहण्याकरितांच काय त्यानें आपला मस्तक उंचावला आहे. त्यावरचा कापूस पाहून असें वाटतें कीं वृद्धपणामुळें केंस पिकून त्याचा मस्तक पांढरा झाला आहे. किंवा त्याच्याजवळून जाणारे जे सूर्याच्या रथाचे घोडे त्यांच्या मुखापासून पडलेल्या फेंसानें त्याचा मस्तक भरून गेला आहे. ज्याच्या आंगास वनगजांनीं गंडस्थळें घांसतांना लागलेलें जें मदोदक त्यावर हजारों भ्रमरांचे समुदाय फिरत असल्यामुळें हा वृक्ष आपलें आंग डोलवीत आहे काय असें वाटतें. ज्या वृक्षावर लक्षोपलक्ष पक्ष्यांनीं घरटे केले आहेत. जो वृक्ष संपूर्ण भूमंडळ पाहण्यासाठीं वनदेवतांचा बसण्याचा उंच बंगलाच काय, जो उच्चत्वामुळें विंध्यपर्वताचा हेवा करणारा, जो दंडकारण्यांतील सर्व वृक्षांचा राजा, जो आपल्या शाखारूप हस्तांनीं विंध्याटवीचें आलिंगनच करीत आहे. असा तो शेवरीचा वृक्ष आहे.

त्या वृक्षाच्या शेंड्यावर, व ढोलींमध्यें, व पल्लवांमध्यें, व फांद्यांच्या संधीं मध्यें, आणि जुनाट सालींच्या भेगांमध्यें, सोईच्या जागा असल्यामुळें नाना देशांहून आलेले हजारों राघू घरटीं करून रहात असत. तो वृक्ष मनुष्यादिकांनीं चढून जावयास फार कठीण म्हणून त्या राघूंस आपल्या नाशाचें कांहीं भय वाटत नसे. तो वृक्ष जुनाटपणामुळें अल्पपर्ण होता, तरी राघूंच्या योगानें दाट हिरव्या पानांनीं व्यापला आहे असा दिसे. ते राघू त्या वृक्षावर आपापल्या खोंप्यांमध्यें रात्रीं राहून सकाळीं उठून प्रतिदिवशीं आकाशांत कळप करून फिरत असत, तेव्हां लोकांस अशी शंका उत्पन्न होई कीं, सूर्याच्या रथाचे घोडे हिरवे आहेत त्यांची ही कांतिच पसरली आहे काय ? किंवा ऐरावत ग-

जानें आकाश गंगेतील कमल लताच उपटून टाकली आहे काय ? किंवा आकाशरूप सरोवरांतील हें शेवाळ्याचें जाळेंच बाहेर काढून टाकिलें आहे काय ? किंवा आकाशवनांतील कोमल तृणयुक्त भूमीच काय ? अथवा चालणारी पाचू रत्नांची भूमीच काय ? अथवा आकाशांतील इंद्रधनुष्यांची पंक्तीच काय ? अशा प्रकारची शंका देणारे राघूंचे कळप आहार संपादून परत येऊन त्या वृक्षावरील आपपल्या खोप्यांत शिरतात, आणि आपापल्या- पिलांस अति प्रीतीनें चोंचींत आणलेला सुंदर चारा चारितात, आणि आपल्या पंखांखाली पिलांस घेऊन मोठ्या सुखानें रात्री घालवितात.

त्याच वृक्षावर एक जुनाट कोट्यामध्यें स्त्री-सहवर्तमान राहणारा जो माझा पिता त्यास दैवयोगानें मीच एकटा मुलगा झाला. तेव्हां माझ्या प्रसववेदनेनें अत्यंत पीडित झाल्यामुळें माझी माता लोकांतरास गेली. तदनंतर माझा पिता आपली आवडती बायको लोकांतरास गेली असतां ही स्त्रीशोकाचा निरोध करून पुत्रस्नेहानें माझें पोषण करण्याविषयीं एकटाच तत्पर असता झाला. तो असा कीं, फार वृद्ध झाल्यामुळें त्याचे पंखजर्जरित होऊन खांद्यांपासून शिथिल झाले होते ह्मणून त्याचे आंगीं उडण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें. आणि त्याचे शरीरास वार्धक्यामुळें कंप सुटला होता, तो पाहून असें वाटे कीं, आपल्या आंगास जडलेली संताप देणारी जरा ती आंग हालवून झाडून टाकण्याविषयीं यत्नच करीत आहे काय? असा तो माझा पिता भक्ष मिळविण्याकरितां दूर जाण्यास असमर्थ होता, ह्मणून साळीचीं लोंबें तोडतां तोडतां बोंथट झालेली जी आपली तांबूस रंगाची चोंच तिणेंकरून दुसऱ्या राघूंच्या कोट्यांतून खालीं पडलेले जे साळीचे दाणे ते वेंचून वेंचून व इतर राघूंनीं तोडतांना वृक्षाखालीं पडलेले जे फळांचे तुकडे ते आणून आणून मला खावयास देत असे, आणि मी खाऊन उरलेलें अन्न आपण खात असे.

एके दिवशीं असें झालें कीं, प्रातःकाळच्या संध्यारागानें आकाश तांबडें झालें असतां, कमळावर बसलेल्या वृद्ध हंसासारखा तांबडा झालेला चंद्र आकाशगंगेपासून पश्चिमसमुद्राकडे जात असतां, वृद्ध श्वेत मृगाच्या केशांप्रमाणें शुभ्रवर्ण दिग्मंडल स्पष्ट व विस्तीर्ण दिसूं लागलें असतां, तापलेल्या लाखेच्या तंतूंप्रमाणें लाल आणि लांब लांब जे सूर्याचे किर-

ण, तेच प्रवाल माणिक ह्यांच्या काड्यांचे खराटे, त्यांनीं आकाशांगणांत पसरलेलीं तारांगणरूप पुष्पें झाडून टाकिलीं असतां, आणि सप्त ऋषींचें-मंडल स्नान करण्यासाठीं मानस सरोवारास जावें म्हणूनच काय उत्तर दिशेस गेलें आसतां, ज्यामध्यें दहिंवराची वृष्टि होत आहे, मयूर जागृत झाले आहेत, सिंह जांभया देत आहेत, मदोन्मत्त निद्रित हस्तींस हस्तिनी जागृत करीत आहेत, असा प्रातः समय स्पष्ट झाला असतां, रात्रीं फुललेलीं पुष्पें दहिंवराच्या भारानें वृक्षापासून खालीं पडत तेव्हां असें वाटे कीं, अरण्यांतील वृक्ष हेच मुनि ते उदयास आलेल्या सूर्यास पुष्पांजळीच अर्पित आहेत काय! ऋषीच्या तपोवनांतले अग्निहोत्राचे धूर वर गेलेले पाहून असें वाटे कीं, हे धर्माचे मूर्तिमंत ध्वजच आहेत. दहिंवराच्या बिंदूंनीं युक्त अतएव शीतल, आणि कमलवनावरून आलेला अतएव सुगंधि, असा प्रातःकालच्या मंद वायू वाहत असतां, आणि वनांत फिरणारे पक्षी आणि पशु इकडे तिकडे संचार करीत असतां, वनगजांच्या कर्णतालांचा गंभीर शब्द ऐकून मेघभ्रांतीनें मयूर नृत्य करूं लागले असतां, क्रमेंकरून आकाशांत वर आलेल्या सूर्याचे किरण गजगंडस्थळावरील चंवऱ्यांप्रमाणें लोंबत असतां, आणि भगवान् सूर्य नारायण हळूं हळूं वर चढूं लागला असतां, ह्मणजे फटफटित उजाडून सूर्याचा प्रकाश चोहोंकडे पसरला असतां, त्या वृक्षावरील सर्व राघू पाहिजे तिकडे चारा मिळवावयास ऊडून गेले. तेव्हां, तो वृक्ष राघूंच्या पिलांनीं भरलेला असून शब्दरहित होता, ह्मणून शून्यसा दिसत असतां, माझ्या पंखांत उडण्याचें सामर्थ्य नव्हतें ह्मणून आपल्या कोठ्यांत आपल्या बापाजवळ मी बसलों असतां, अकस्मात् त्या वनामध्यें पारध करण्यास आलेल्या भिल्ल लोकांचा मोठा कोलाहलध्वनि उठला. तो ऐकून सर्व वनचरांस मोठा धाक पडला, त्या कोलाहलध्वनींत वनांतील पक्ष्यांच्या पंखांचा व पशूंच्या पायांचा शब्द मिश्रित झाल्यामुळें, तो ध्वनि फारच मोठा झाला. असा ध्वनि मी कधींच ऐकिला नव्हता. तो ऐकून मी फार भ्याला, व माझ्या शरीरास कंप सुटला, व कानठळ्या बसल्या. तेव्हां मी भय नाहींसें व्हावें म्हणून आपल्या वृद्ध पित्याच्या पंखांमध्यें शिरलों.

तदनंतर मृगया करणारे लोक वृक्षांच्या आड उभे राहून एकमेकां-

शीं बोलूं लागले कीं, इकडून हत्तींनीं चुरलेल्या कमलांचा सुवास येत आहे; इकडून रानडुकरांनीं चावलेल्या नागरमोथ्यांचा परिमळ येत आहे; इकडून हत्तीच्या छाव्यांनीं मोडलेल्या रायआंवळीच्या सालींचा उग्रवास येत आहे; तिकडे वन महिषांनीं शिंगांनीं उधळलेला धुरळा दिसत आहे; तिकडे हरिणांचे कळप पळत आहेत; तिकडे वनगजांचे समुदाय धांवत आहेत; तिकडे रानडुकरें, तिकडे वनमहिष, पळत आहेत; तिकडे मयूरांचे, तिकडे कपिंजल पक्ष्यांचे, तिकडे टिटव्यांचे शब्द होत आहेत; तिकडे वनगजांच्या मागें सिंह लागले आहेत; हत्ती भयानें चीत्कार करीत आहेत; ती गेंड्यांचीं खेळण्याची जागा आहे. तो चमर मृगांचा कळप पळत आहे, त्यांच्या पाठीस लागा; हरिण मारण्याकरितां वृक्षावर चढा; कोणत्या दिशेकडून कोणत्या पक्ष्यांचा अथवा पशूंचा शब्द ऐकूं येतो पहा; हातांत धनुष्यें घ्या; जाळीं पसरा; सावध रहा; कुतरे मोकळे सोडा; अशा प्रकारचे शब्द ऐकून सारें रान खवळलें, आणि मला तर फारच भय सुटलें.

तदनंतर ते भिल्ल जिकडे तिकडे बाण मारूं लागले, तेव्हां सिंह गंभीर शब्द करूं लागले; हत्तींचे कळप पळूं लागले; हरिणांचे डोळे भयत्रस्त झाले; कुत्र्यांनीं कितीएक हरिण मारले; यूथपति मारले गेल्यामुळें यूथांतील हत्तिणी व कलभ भयानें पळूं लागले; गेंड्यांचीं पोरें मारलीं गेल्यामुळें गेंड्यांच्या स्त्रिया मोठ्या गळ्यानें रुदन करूं लागल्या; तरुण मृगांचे कळप तडातड उड्या मारीत पळूं लागले, भयानें ह्या झाडांवरून त्या झाडांवर उडणाऱ्या पक्ष्यांचा एकच कलकलाट झाला. धनुष्यांचे टणत्कार, खड्गांचा खणखणाट, शिकारी कुत्र्यांचीं भोंकणीं, भिल्लांचा धराधरा, मारामारा, असा कलकलाट; मिळून जो मोठा भयंकर शब्द जाहला, त्यानें सर्व अरण्य हालल्याप्रमाणें झालें.

तदनंतर थोडक्याच वेळानें तो मृगयेचा कलकलाट अकस्मात् नाहींसा झाल्यामुळें, जसा उदकाची वृष्टि करून मेघ गर्जनारहित होतो, किंवा मंथन संपल्यावर समुद्र जसा स्तब्ध झाला, तसें तें अरण्य निश्चल झालें असतां, माझें भय कांहींसें कमी झालें. तरी माझे नेत्र चंचल होत होतेच. परंतु बाल्यस्वभावामुळें मला असें कौतुक वाटलें कीं, ही येवढी गडबड कशाची झाली ती पहावी; म्हणून बापाच्या पंखांमधू-

न बाहेर पडून कांहींसा पुढें सरकून कोठ्याच्या बाहेर मान काढून जिक डे जिकडे शब्द झाला होता तिकडे तिकडे मोठ्या कौतुकानें कोठ्यांतूनच पाहूं लागलों. तों त्या वनांतून आपल्या समोर येणारें वेताळांच्या स्वारी सारखें भयंकर, अरण्याला अंधकारयुक्त करणारें, असें भिल्लांचें फार मोठें सैन्य दृष्टीस पडलें. तें पाहून असे तर्क होत कीं, सहस्रावधी फांद्यांनीं युक्त असा हा नर्मदा नदीचा ओघच काय? किंवा वायुवेगानें चंचल होणारें तमाल वृक्षांचे वनच काय? किंवा, एकत्र झालेला काळरात्रीचा प्रहर समुदायच काय? किंवा, धरणीकंपानें हालणारे अंजनपर्वतच काय? किंवा सूर्यतेजाला भ्यालेला, कांपणारा, अंधकार समूहच काय? किंवा चहूंकडे फिरणारा यमदूतांचा समुदायच काय? किंवा पाताळांतून वर आलेला दैत्य समूहच काय? अथवा एकत्र जमलेला दुष्कर्मांचा समुदायच काय? अथवा जलाशयांतून बाहेर निघालेला वनमहिषांचा समुदायच काय? अथवा भूमीवर उतरलेलें मेघमंडळच काय? अथवा अरण्य जाळणाऱ्या दावानळाच्या धुरांचा लोटच काय? असे अनेक तर्क ज्यावर व्हावे असें तें सैन्य माझ्या दृष्टीस पडलें.

तदनंतर त्या मोठ्या सैन्यामध्यें मातंग ह्या नांवाचा सेनापति होता तो मीं पाहिला. तो असा होता कीं ज्याला नुकतेंच तारुण्य प्राप्त झालें होतें, ज्याचें शरीर फार कठोर दिसत होतें ह्मणून असें वाटे कीं, लोखंडाचा केलेला पुतळाच आहे काय? ज्याला नुकत्याच मिशा फुटूं लागल्या होत्या त्यामुळें हत्तीच्या छाव्याप्रमाणें शोभत असे. ज्याच्या शरीराची नीळकांति अरण्यांत पसरली होती ती पाहून असें वाटें कीं, हें यमुनानदीचेंच जळ पसरलें आहे काय? त्याच्या मस्तकावरचे कुटिल केश खांद्यांपर्यंत लोंबत होते, म्हणून ज्या सिंहाच्या मानेवरचे केश गजाच्या मदोदकानें मलिन झाले त्या सिंहाप्रमाणें शोभत होता. त्याचें कपाळ विशाळ होतें व नाक उंच असून भयंकर होतें. त्यानें आपल्या डाव्या कानांत नागफणांवरील मण्यांचें भूषण घातलें होतें, त्या मण्यांची तांबडी प्रभा त्याच्या खांद्यावर पडली होती. त्यानें आपल्या अंगास कृष्णागरु चंदनाच्या उटीप्रमाणें नुकतेच मारलेल्या हत्तींचें मदोदक सारविलें होतें. त्याच्या गंधाच्या लोभानें भ्रमर भोंवताले उडत असत ते त्यावर मोरचेलाप्रमाणें दिसत असत. त्यानें आपल्या कानांवर को-

मलपल्लव ठेविले होते ते वाऱ्यानें हालत असत, तें पाहून असें वाटे कीं, विंध्याटवी भिऊन त्याची सेवा करावयाकरितां आपल्या हातांनीं त्याच्या गालावरचा घामच पुशीत आहे काय ? त्याचे डोळे स्वभावें करून इतके लाल होते कीं, जणो रक्तानेंच भरले आहेत. त्याचे हात लांब गुडघ्यापर्यंत असून स्थूळ आणि सरळ होते, त्यावरून अनुमान होतें कीं, ब्रह्मदेवानें वनगजांच्या शुंडादंडाचें प्रमाण घेऊन हे हात केले असावे. तो आपल्या खांद्यांचें रक्त शस्त्रानें काढून देवीला अर्पीत असे ह्यामुळें त्याचे खांदे खडकाप्रमाणें खडबडीत दिसत. त्याचें उरःस्थळ विंध्याद्रीच्या कड्याप्रमाणें विशाळ होतें, त्यावर घामाचे बिंदु व श्वापदांच्या रक्ताचे बिंदु चिकटले होते, त्यामुळें गुंजांनीं मिश्रित मोत्यांचा हारच उरःस्थळावर आहे असें वाटे. तो नेहमीं कसरत करणारा होता ह्मणून त्याचे पोट पातळ असून मांड्या खांबांप्रमाण स्थूळ असत, तो लाखी रंगाचें रेशमी वस्त्र नेसला होता, तो अकारण क्रोधी होता, त्याच्या- कपाळावर उभ्या तीन शिरा उठलेल्या असत, व त्यांच्याखालीं मोठ्या भयंकर भिवया होत्या, ह्यावरून हा आपला भक्त आहो असें लोकांस समजण्या करितां देवीनें आपल्या त्रिशूळाचें चिन्हच त्याच्या कपाळावर स्थापिलें आहे, असें भासे. त्याच्या मागून सवईचे मोठ मोठाले शिकारी कुत्रे चालत होते; त्यांच्या जिभा धांवण्याच्या श्रमानें शुष्क होऊन बाहेर लोंबत होत्या; त्या कुत्र्यांच्या गळ्यांत कवड्यांच्या माळा घातलेल्या होत्या; त्या कुत्र्यांचीं शरीरें जरी लहान होतीं तरी त्यांचें बळ मोठें होतें; ते कुत्रे असे पराक्रमी होते कीं, त्यांनीं कधीं कधीं सिंहांस मारून त्यांच्या स्त्रियांस वैधव्य दिलें. त्या कुत्र्यांच्या माद्याही त्यांच्यामागून चालत होत्या, त्यांचीं शरीरें कुत्र्यांच्या शरीरांपेक्षां लांबट होतीं. त्यामुळें कुत्र्यांनीं सिंहास मारूं नये म्हणून अभय मागण्यासाठीं सिंहिणीच त्यांच्या मागून चालत आहेतअसें वाटे.

त्या सेनापतीबरोबर चोहों बाजूंस शेकडों भिल्ल चालले होते. त्यांत कितीएकांनीं वनगाईचीं पुच्छें आणि हत्तींचे दंत ह्यांचे भारे मस्तकावर घेतले होते. कितीकांनीं मधाच्या पोळ्या पानांत गुंडाळून हातांत घेतल्या होत्या. कितीएकांनीं हत्तींच्या गंडस्थळांतील मोत्यें हातीं घेतलीं होतीं. किती एकांनीं राक्षसाप्रमाण आहारार्थ मांसभार घेतले होते.

किती एकांनीं सिंहांचीं, व्याघ्रांचीं चर्में घेतलीं होतीं. किती एकांनीं मोरांच्या पिसांचीं जुडगीं घेतलीं होतीं. कोणाच्या हातांत खड्ग, कोणाच्या हातांत सुऱ्या, कोणाच्या हातांत धनुष्यें होतीं. त्या भिल्ल लोकांचीं झुल्पें खांद्यांवर लोंबत होतीं त्यांचीं वस्त्रें कालमेघा सारखीं नीलवर्ण होतीं. त्यांनीं मयूर पिच्छांचीं भूषणें घातलीं होतीं. असे अनेक प्रकारचे भिल्ल त्याच्या बरोबर चालले होते. त्यानें जें धनुष्य हातीं घेतलें होतें तें मोरांच्या पिसांनीं मढविलेलें होतें, ह्मणून काळ्या मेघावर पडलेल्या इंद्रधनुष्याप्रमाणें दिसत असे, त्याचें शरीर वनमहिषांच्या रक्तानें लाल झालें होतें. तो शरीरानें फार मोठा धिप्पाड होता म्हणून हा विंध्यपर्वताचा पुत्रच काय असें वाटे. तो फार क्रूर होता ह्मणून यमाचा अवतारच काय असें वाटे. तो अरण्यांतील सर्व प्राण्यांस त्रास देणारा होता म्हणून पापाचा सख्खाभाऊच काय असें वाटे. तो दुष्टबुद्धिप्रवर्तक होता म्हणून कलिकालाचा सारथिच काय असें वाटे. तो भयंकर होता तरी तेजस्वीपणामुळें हा कोणी मोठा गंभीर पुरुष चालला आहे असें वाटे. आणि त्याची आकृति अशी भयंकर होती कीं त्याचा पराभव कोणाच्यानेंही करवणार नाहीं. आशा प्रकरचा तो भिल्लांचा सेनापति मीं पाहिला. त्याचे नांव मातंग असें मला मागाहून समजलें.

त्या सर्व भिल्लांस पाहून माझ्या मनांत असें आश्चर्य वाटलें कीं, कायहो भयंकर ह्यांचें जीवन ! आणि काय हो ह्यांचें निंदित आचरण! तें असें कीं, मनुष्य मांसाचा देवीस बळी देणें ह्यावरच ह्यांची धर्मबुद्धि. साधुजनांनीं निंदित जें मद्यमांस तेंच ह्यांचें खाणें पारध करणें हेच ह्यांचे श्रम. कोल्ह्याचें शब्द हेंच ह्यांचें शास्त्र. ह्यांस बरें वाईट सांगणारे घुबडपक्षी. ह्यांचें ज्ञान तर पक्ष्यांच्या व पशूंच्या जाती ओळखणें. कुत्रेहीच ह्यांच्या परिचयाची मंडळी. ह्यांचें राज्य शून्यारण्य. ह्यांचा उत्सव मद्यपान. क्रूर कर्मांचीं साधनें तींच ह्यांचीं मित्रें. धनुष्येंच ह्यांचें धन. विषमुखबाण तेच ह्यांचें सहाय. भोळ्या मृगांस फसविणारें ह्यांचें गायन. दुसऱ्याच्या लुटून आणलेल्या स्त्रिया त्याच ह्यांच्या बायका. क्रूर स्वभावाचे जे व्याघ्र त्यांशीं ह्यांचा सहवास. पशूच्या रक्तानें देवीची पूजा करून तिला मांसाचा बळी देणें ही ह्यांची भक्ति. ह्यांचें कसब चोरीकरणें. ह्यांचीं भूषणें नागफणावरील मणि. वनगजांच्या मदोद

काची आंगास उटी. आणि ज्या अरण्यामध्यें हे निरंतर राहतात त्याचा समूळ उच्छेद करतात. अशा प्रकारचा मी आपल्या मनामध्यें विचार करीत आहें तों तो भिल्लांचा सेनापति अरण्यांत भ्रमण करण्यामुळें झालेला श्रम घालवावा म्हणून त्या शेवरीच्या वृक्षाखालीं आला, आणि छायेंत आपलें धनुष्य खांद्यावरून काढून खालीं ठेवून सेवकांनीं आणलेल्या पल्लवांच्या आस्तरणावर बसला. इतक्यांत त्याच्या सेवकांपैकीं कोणीएक तरुण भिल्ल पंपासरोवरावर जाऊन त्याचें पाणी कमलपत्राच्या द्रोणांत घेऊन आला. तें पाणी इतकें स्वच्छ होतें कीं वैडूर्य रत्नाच्या किंवा मुक्ताफळाच्या वरील जें पाणी तेंच काढून आणलें काय असें वाटे. आणि तें इतकें मधुर होतें कीं जणो चंद्रमंडळांतील अमृतच आहे. आणि बर्फाप्रमाणें थंडगार व स्वच्छ असें तें पाणी तो सेनापती प्याला, आणि सेवकानें तत्काळ उपडून धुऊन आणलेले कमळांचे देंठ राहू जसा चंद्रकळांचा ग्रास करतो तसा चोंखून खाऊं लागला. तदनंतर त्याच्या श्रमाचा परिहार झाल्यावर त्याला पाहिजे त्या दिशेकडे जाण्यासाठीं तो निघाला. तेव्हां त्याच्या पाठी मागून तें सर्व सैन्यही पाणी पिऊन विश्रांत होऊन निघून गेलें. मागें त्या भिल्लांपैकींच एक म्हातारा भिल्ल त्याच वृक्षाखालीं अंमळ खोळंबून बसला. कारण, त्या दिवशीं त्याला मांस मिळालें नव्हतें म्हणून मांसाची इच्छा करीत होता, आणि राक्षसासारखा भयंकर दिसत होता. तदनंतर कांहीं वेळानें तो भिल्लांचा सेनापती दूर गेल्यामुळें दिसेनासा झाल्यावर तो म्हातारा रक्ताप्रमाणें लाल, व भोंऱ्या भिवयांच्या मंडळानें भयंकर अशा प्रकारच्या आपल्या डोळ्यांनीं त्या शेंवरीच्या वृक्षाकडे पाहूं लागला. तेव्हां असें वाटलें कीं हा आमचीं आयुष्यें पीत आहे काय? किंवा राघूंचीं राहण्याचीं घरें मोजीत आहे काय? किंवा ससाण्या प्रमाणें हा पक्ष्यांच्या मांसावर लुब्ध झाला आहे काय? असा तो म्हातारा भिल्ल त्या वृक्षावर चढावें ह्या बेतानें खालपासून वर पावेतों फार वेळपर्यंत पाहत राहिला. त्यावेळेस त्याच्या पाहण्यानें भ्यालेल्या राघूंच्या कुळांचे प्राण गेल्याप्रमाणें झाले. कारण जे करुणा रहित निष्ठुर पुरुष असतात त्यांस कोणतेंही करणें अशक्य नाहीं. मग तो भिल्ल, अनेक तालप्रमाण उंच व ज्याच्या खांद्या मेघमंडळास लागलेल्या अशा प्रकारच्या त्या शेंवरीच्या वृक्षावर, जसें पायऱ्यांनीं माडीवर चढावें तसें सहज

रीतीनें चढला; आणि खांद्यांच्या संधींतून व घरट्यांतून राघूंचीं पिलें काढूं लागला. त्यांत कितीएक पिलें ज्यांस उडण्यास सामर्थ्य आलें नाहीं अशीं होतीं. कितीएक उत्पन्न होऊन थोडेच दिवस झाल्यामुळें शेंवरीच्या फुलांप्रमाणें लाल दिसत होतीं. कितीएक नुकतेंच पंख फुटूं लागल्यामुळें कमळाच्या कोंवळ्या पानाप्रमाणें दिसत होतीं. कांहीं पिलें बरेच पंख वाढल्यामुळें रुईच्या फलासारखीं दिसत होतीं. कितीकांच्या चोंची लाल झाल्यामुळें किंचित् उमललेल्या कमळांच्या कळ्यांप्रमाणें दिसत होतीं. कितीकांच्या माना हालत होत्या म्हणून माना हालविण्याच्या मिषानें त्याचें निवारणच करीत आहेत काय अशीं होतीं. अशीं राघूंचीं बहुत पिलें त्यानें झाडावरचीं फळें तोडून घेतल्याप्रमाणें काढून त्यांचे प्राण घेऊन खालीं भूमीवर टाकून दिलीं.

तेव्हां माझा पिता तर, प्राण घेणारा व अनिवार्य असा फार मोठा उपद्रव अकाळींच प्राप्त झाला, असें पाहून दुप्पट कांपूं लागला. आणि मरणाच्या भयानें अति चंचल, व दुःखामुळें शून्य व पाण्यानें भरलेले, अशा आपल्या डोळ्यांनीं चहूं दिशांकडे पाहूं लागला. त्याच्या टाळूस शोष पडला. आणि स्वसंरक्षणाविषयीं असमर्थ असतांही त्रासानें अत्यंत शिथिल झालेल्या आपल्या पंखांनीं मला झांकून घेऊन ह्याचें तरी ह्याकाळीं संरक्षण होवो अशी चिंता करीत मोठ्या ममतेनें माझ्या संरक्षणाविषयीं तत्पर होऊन आतां काय करावें हें त्यास सुचेनासें झाल्यामुळें मला पोटाशीं धरून उगीच बसला. इतक्यांत त्या काळरूपी भिल्लानें त्या वृक्षाच्या फांद्यांवरून फिरतां फिरतां आमच्या कोठ्याच्या द्वारापाशीं येऊन काळसर्पाप्रमाणें भयंकर दिसणारा, व रानडुकरांच्या चर्बीनें दुर्गंध झालेला, व ज्याला धनुष्याच्या दोरीचे घट्टे पडले होते, व जो काळदंडाचें अनुकरण करणारा, असा आपला डावा हात कोठ्यांत घातला. त्यास जरी माझा पिता आपल्या चोंचीनें वारंवार टोंचीत होता, व मोठ्यानें ओरडत होता, व पंख फडफडावून आंत ओढ घेत होता, तरी त्यास घरट्यांतून बाहेर ओढून त्यानें त्याचा प्राण घेतला. माझें शरीर तर मुळीं फारच लहान असून भयानें फारच संकुचित झालें होतें म्हणून, व माझ्या आयुष्याची दोरी बळकट होती म्हणून, त्याच्या पंखांत मी लपलेला असतां ही मला त्यानें

पाहिलें नाहीं. माझ्या पित्याची तर मान मोडून खालीं डोकें करून त्याला खालीं टाकून दिलें. तेव्हां त्याच्या दोहों पायांच्या मध्यें डोकें घालून पोटाशीं चिकटून लपून राहिलेला मीही त्याच्याबरोबर खालीं पडलों. आयुष्य संपलें नव्हतें म्हणून वाऱ्यानें एकेठायीं जमलेल्या गलित पर्णांच्या राशीवर माझा देह पडला असें मी आपणास पाहिलें. त्या पानांच्या राशीवर पडल्यामुळें माझें अंग दुखावलें नाहीं. जोंपर्यंत तो दुष्ट भिल्ल वृक्षावरून खालीं उतरला नाहीं तोंपर्यंत इकडे तिकडे सरकून आपला प्राण वांचवावा असें मनांत आणून त्या गळालेल्या पानांत घुसून राहिलों. माझ्या पंखांचा रंग पानाच्या रंगाप्रमाणेंच होता म्हणून मी त्यास स्पष्ट दिसलों नाहीं. मग मेलेला पिता पाहून आपलाही प्राण टाकण्यास योग्य अशा समयीं घातुकाप्रमाणें पित्याचा त्याग करून जाणतेपणीं होणाऱ्या स्नेहरसाचा आविर्भाव न होतां बाळपणामुळें स्वाभाविक भयानें आक्रांत होऊन थोडथोड्या फुटलेल्या पंखांच्या बळानें गमन करण्याविषयीं निश्चय करून इकडे तिकडे खरडत खरडत यमाच्या दाढेंतून मी निघालोंच काय असें मानून जवळच एक मोठा तमाल वृक्ष होता त्याच्या मूळप्रदेशाजवळ जसें दुसऱ्या पित्याच्या मांडीवर जावें असें गमन करितां झालों. त्या मूलप्रदेशावर सूर्याच्या किरणांचाही प्रवेश होत नव्हता. तो तमालवृक्ष इतका काळा होता कीं, हा विंध्याटवीचा केशपाशच काय असें वाटे. किंवा दिवसास ही अंधकाराचा पुंज धैर्य धरून उभा आहे काय असें वाटे. इतक्यांत तो म्हातारा भिल्ल त्या शेंवरीच्या वृक्षावरून खालीं उतरून भूमीवर चोहोंकड पसरलेलीं राघूंचीं पिलें एकत्र जमा करून पानांच्या पुड्यांत गुंडाळून वेलाच्या दोऱ्यांनीं बळकट बांधून घेऊन ज्या दिशेस तो सेनापति गेला होता त्याच दिशेस धांवत धांवत निघून गेला. तेव्हां मला त्या काळीं कांहींशी जीविताची आशा प्राप्त झाली. माझें अंतःकरण पितृमरणशोकानें अत्यंत व्याप्त झालें होतें, आणि फार उंचावरून खालीं पडल्यामुळें, आणि खरडत खरडत दूर गेल्यामुळें माझ्या शरीरास फार मोठा आयास प्राप्त झाला होता, आणि अतिभयानें कांप सुटला होता. त्यासमयीं सर्वांगास ताप देणारी अशी फार मोठी तृष्णा मला प्राप्त झाली. तदनंतर तो दुराचारी भिल्ल दूर गेला असें

असें समजून मी मान वर करून भीत भीत चोहोंकडे पाहूं लागलों. तेव्हां तृणही हाललें असतां तो दुष्टच पुनः परत आला काय अशी शंका पदोपदीं करीत करीत त्या तमालवृक्षाच्या मूळप्रदेशापासून निघून पाण्याजवळ जाण्याविषयीं प्रयत्न करूं लागलों. त्याकाळीं मला पुरते पंख आले नव्हते, व पायांस ही चालण्याचें पुरतें सामर्थ्य नव्हतें, ह्यामुळें वारंवार भूमीवर मुख टेंकून पडत असें; व वारंवार वांकडा एक्या कुशीवर पडत असें, तेव्हां एका आंगच्या पंखांवर आपलें शरीर सांवरून धरीत असें. भूमीवर चालण्याच्या श्रमानें थकल्यामुळें, व चालण्याचा अभ्यास नसल्यामुळें, एकही पाऊल टाकिलें असतां वर मुखकरून वारंवार श्वास टाकीत होतों, व धुळीनें माझें शरीर मळिण झालें होतें. अशाप्रकारें मी पाणी पिण्यासाठीं पाण्याकडे जात असतां मनांत आलें कीं, प्राण्याला किती ही दुर्दशा प्राप्त झाली तरी जीविताची आशा सुटत नाहीं. याजवरून हें सिद्ध होतें कीं, ह्या लोकांत प्राण्यास जीवितापेक्षां दुसरें कांहींच प्रिय नाहीं. पहा कीं, अशा प्रकारचा मायाळू माझा पिता लोकांतरास गेला असतांही माझ्या इंद्रियांची कांहीं न्यूनता न होतां मी जीवंत राहिलों आहें. तस्मात् निर्दय, निष्ठूर, व पितृमरणशोकाचें सहन करणारा असा मी आहें, त्या मला धिक्कार असो. जो मी उपकार करणाऱ्या पित्याची अपेक्षा न धरून वांचत आहें. तस्मात् माझें अंतःकरण मोठें दुष्ट व निष्ठूर खरें. आणखी, माझी माता लोकांतरास गेली असतांही शोकवेगाचें सहन करून ज्या पित्यानें नाना प्रकारच्या उपायांनीं जन्मापासून माझा पालन व पोषण केलें, आणि स्नेहामुळें श्रमाचीही ज्यानें गणना केली नाहीं, त्या पित्याचेंही मला तात्काळ विस्मरण झालें. ह्याजवरून मला असें वाटलें कीं, प्राण मोठे कृपण आहेत;कारणकीं उपकारकर्ता पिता लोकांतरास गेलातरी ते जात नाहींत. सर्वथा हीच गोष्ट खरी कीं, जीविताची तृष्णा सर्व प्राण्यांस दुष्टता आणित. कारण कीं, मी अशा शोकावस्थेंत असतांही मला तहान पीडा देत आहे. ह्याजवरून मी असें मानलें कीं, निर्दयपणामुळेंच ही तहान मला लागली आहे. आणखी मनांत आलें कीं, आतां पाणी प्यावयास जावें तर सरोवर फार दूर आहे असें अनुमान होतें. कारण, जलदेवतांचे नूपुरशब्दच काय असे जे राजहंसांचे शब्द ते आद्यापि दूर ऐकूं येत आ-

हेत; व सारस पक्ष्यांचे शब्दही स्पष्ट ऐकू येत नाहींत, व कमलपुष्पांचा गंधही चारी दिशांकडे पसरल्यामुळें थोडाच येत आहे. आणि दिवसाची स्थिति तर फार कष्टाची झाली आहे; कारण, दुपारचें उष्ण अग्नीच्या ठिणग्यांप्रमाणें लागत आहे. व धूळ फार तापल्यामुळें भूमीवर संचार करणें ही फारच कठीण झालें आहे. माझें शरीर तर तृषेनें ग्लान झाल्यामुळें थोडकें चालण्यासही समर्थ नाहीं. हा जीव सोडावा असें म्हणावें तर ह्याजविषयीं कांहीं आपल्या स्वाधीन नाहीं, म्हणून अंतःकरणास फारच खेद होत आहे. माझ्या डोळ्यापुढें अंधारी येत आहे. अशा प्रसंगीं माझें दुर्दैव तरी मला मरण देईल तर फार चांगलें होईल. अशा प्रकारें मी चिंतन करीत आहें, तों इतक्यांत त्या सरोवराजवळच एका तपोवनामध्यें जाबालि नामक महातपस्वी राहत होता. त्याचा पुत्र हारीतनामक ऋषि त्याच मार्गानें सरोवरावर स्नान करावयास जात होता. तो ऋषिकुमार याज्ञवल्क्याप्रमाणें सर्वविद्याविशारद होता. त्याच्यामागून त्याच्या वयाचे दुसरे ऋषिकुमार चालले होते. तो अत्यंत तेजस्वीपणामुळें हा मूर्तिमंत अग्नीच किंवा सूर्यच आहे काय असें वाटे. त्याच्या मस्तकावर जटाभार होता. त्याच्या उजव्या कानावर स्फटिकमण्यांचें वलय लोंबत होतें. त्याच्या कपाळावर भस्माचा त्रिपुंड्र शोभत होता. त्याच्या डाव्या हातांत स्फटिकाचा कमंडलु होता. त्याच्या आंगाभोंवतीं कृष्णाजिन वेष्टिलेलें होतें. त्याच्या डाव्या खांद्यावर नवीन कमलतंतूप्रमाणें पांढरें स्वच्छ यज्ञोपवीत होतें. त्यानें उजव्या हातांत पळसाचा दंड घेतला होता. त्या दंडाच्या शेंड्यास देवपूजेकरितां घेतलेल्या फुलांचा पुडा अडकविला होता. त्याच्या पाठीमागून एक तपोवनांतील हरिण चालला होता. तो हरिण त्यानेंच नित्य तृणधान्यमुष्टि चारून वाढविलेला म्हणून त्याचा फार संवईचा होता. त्या ऋषीच्या कटीस मोळाचें कटिसूत्र बांधलेलें होतें, व त्यानें वल्कलाचें परिधान केलें होतें. तो पुण्यवान् असून कृपाळु होता. प्रायशः ह्या ऋषीसारखे जे साधुजन असतात त्यांचीं अंतःकरणें कारणावांचूनही स्नेहयुक्त असून दयारसानें आर्द्र होतात हेंच खरें. कारण तशा अवस्थेंत पडलेल्या मला पाहून त्याला अति दया उत्पन्न झाली. आणि तो समीप चालणाऱ्या एका ऋषिकुमारास

म्हणाला, अरे, हा शुक-बालक कोणत्या तरी कारणानें ह्याजवळच्या वृक्षावरून खालीं पडला आहे असें वाटतें. हा बहुतकरून ससाण्याच्या मुखापासून पडला असावा. ह्यास अजून पुरते पंख फुटले नाहींत. ह्याचें जीवित अत्यल्प राहिलें आहे, हा वारंवार उष्ण उच्छ्वास टाकीत आहे. पहा हा मुख भुईवर टेंकून पडत आणि चोंच पसरीत आहे. आपली मान सांवरण्याचेंही ह्याला पुरतें सामर्थ्य नाहीं. हा असाच कांहीं वेळ येथें राहिला तर खचित मरेल. तर तूं इकडे ये, आणि जोंपर्यंत ह्याचे प्राण गेले नाहींत तोंपर्यंत ह्याला उचलून घेऊन उकादजवळ ने. असें बोलून त्या हारीत ऋषीनें मला त्या ऋषिकुमाराकडून पंपासरोवराच्या तीराजवळ नेवविलें.

तदनंतर आपणही त्या उदकाजळ येऊन आपला दंडकमंडलु एका बाजूस ठेवून मला निश्चेष्टसें पाहून आपल्या हातानें माझें तोंड वर करून त्या दयाळु ऋषीनें आपल्या बोटांनीं उदकाचे कांहीं बिंदु माझ्या मुखांत घातले व कांहीं आंगावर शिंपडले. तेव्हां मला कांहींशी हुशारी आली असें पाहून त्यानें त्या सरोवराच्या तीराजवळ उगवलेल्या कमललतेच्या पत्रांच्या शीतल छायेंत मला ठेवून आपण स्नानविधि संपादावयास गेला.

तदनंतर तो ऋषि सरोवरामध्यें उतरून स्नानविधि संपादून सूर्याकडे मुख करून कमलपत्रांच्या द्रोणांत उदक घेऊन सूर्यास अर्घ्य देऊन त्याचें उपस्थान करून बाहेर आला. मग त्यानें पांढरीं स्वच्छ वल्कलें परिहित केलीं, आणि आपल्या जटा झाडून कमल पुष्पांनीं सुगंधित आणि स्वच्छ अशा सरोवराच्या उदकानें आपला कमंडलू भरून घेतला. मग तो मुनि मला हातानें उचलून घेऊन तपोवनाकडे जावयास निघाला. त्याच्या पाठीमागून ते सर्व ऋषिकुमारही आपापले स्नानविधि आटोपून निघाले. मग कांहींसा पुढें गेल्यावर मीं एक रमणीय आश्रम पाहिला. त्या आश्रमाच्या चारी दिशांकडे मोठालीं अरण्यें होतीं. त्या अरण्यांत सर्वकाळ फुलणारीं फुलझाडें भरलीं होतीं. आणि ताल, तिलक, ताली, तमाल, हिंताल, बकुल, नारिकेल, लवली, लोध्र, लवंग, आम्र, इत्यादि वृक्षांनीं तीं अरण्यें भरलीं होतीं. आम्रवृक्षांस मोहर आले होते त्यांवर भ्रमरसमुदाय बसून झंकार शब्द करीत होते. उन्मत्त

कोकिलांचे समुदाय पंचम स्वरानें मधुर गान करीत होते. फुललेल्या केवड्यांच्या रजांनीं तीं अरण्यें पिंगट वर्ण झालीं होतीं. सुपाऱ्यांच्या झाडांवर चढलेल्या वेलांचे झोंपाळे करून त्यांवर वनदेवता बसल्या होत्या. वृक्षांवरून पांढऱ्या फुलांची खालीं वृष्टि होत होती, ती नक्षत्रवृष्टीच होत आहे काय असें वाटे. त्या अरण्यांत जिकडे तिकडे वृक्षांची व लतांची पराकाष्ठेची दाटी होती. त्या आश्रमाच्या जवळच दंडकारण्यस्थलें फार शोभायमान होतीं. त्यांमध्यें चित्रविचित्र वर्णांचे हरिणांचे कळप निर्भयपणें फिरत असत. जिकडे पहावें तिकडे तांबडीं स्थलकमलें फुललेलीं दिसत. पूर्वीं तेथें रामचंद्र राहत होता त्यानें कंदमुळें खणून काढल्यामुळें ज्या जागजागीं खांचा पडल्या होत्या त्या अद्यापि तशाच दृष्टीस पडत होत्या. त्या आश्रमाचा समीप प्रदेश ऋषिमंडळीनें परिपूर्ण होता. जागजागीं शिष्यवर्ग अध्ययन करीत होते. त्या आश्रमांत होमाग्नीचा धूर आकाशांत वर चालला होता तो पाहून असें वाटे कीं ऋषींस सशरीर स्वर्गास जाण्याकरितां अग्नीनें हा जिनाच बांधिला आहे काय. त्या आश्रमासभोंवतां मोठमोठ्या शेंकडों विहिरी होत्या. त्यांचीं उदकें स्वच्छ असून त्यांत श्वेत कमलें प्रफुल्लित झालेलीं होतीं, तीं पाहून असें वाटे कीं ऋषींच्या दर्शनासाठीं आकाशांतील सप्तऋषीं सहवर्तमान ग्रहगणच आला आहे काय. वनलतांचीं अग्रें वाऱ्यानें नम्र होत त्यामुळें त्या लता आश्रमाला नमस्कारच करीत आहेत काय, आणि वृक्षांचीं फुलें खालीं गळून पडत त्यामुळें वृक्ष आश्रमाची पूजाच करतात काय, असें वाटे. आश्रमांतील अंगणांत कोठें सांवे वाळत घातले आहेत, कोठें आंवळे, हरपरेवड्या, लवंगा, बोरें, केळीं, आमसुलें, आंबोशी, तालफलें, ह्यांचे ढीग घालून ठेविले आहेत. कोठें बटू अध्ययन करीत बसले आहेत. राघू आणि सारिका ऋषांनीं उच्चारलेले शब्द ऐकून त्यांचाच निरंतर उच्चार करीत आहेत. अरण्यांतील कावळे ऋषींनीं टाकललेले काकबळी भक्षीत आहेत. राजहंस पक्ष्यांचीं पोरें ऋषींनीं पसरलेलीं तृणधान्यें चोंचींनीं वेचीत आहेत. हरिणांच्या स्त्रिया हरिणी आपल्या कोमल जिव्हांना ऋषींच्या मुलांचीं अंगें चाटीत आहेत. नारळ फाडण्याचे व हिंगणबेटें फोडण्याचे पाषाण चिकट झालेले जिकडे तिकडे पडले आहेत. संवईचे वानर अंधवृद्ध ऋषींच्या हातांतील काठ्या धरून

त्यांस इकडे तिकडे नेत आणीत आहेत. हरिण आपल्या शिंगांनीं ऋषिजनांसाठीं कंदमुळें उकरीत आहेत. हत्ती आपल्या सोंडेंतल्या उदकानें झाडांचीं आळीं भरीत आहेत. रानडुकरांच्या दाढांत गुंतलेले कमलाचे कंद ऋषिकुमार आपल्या हातांनीं काढून घेत आहेत. संवईचे मयूर आपल्या पंखांच्या वाऱ्यानें ऋषींचे कुंडांतील अग्नि पेटवीत आहेत. अग्नींत टाकलेल्या चरुपुरोडाशादि होमद्रव्यांचा सुवास जिकडे तिकडे सुटला आहे. कोणी ऋषि अतिथींची पूजा, कोणी देवतांची पूजा, करीत आहेत. कोणी श्राद्धकल्पनेची चर्चा करीत आहेत. कोणी यज्ञविद्येची व्याख्या करीत आहेत. कोणी धर्मशास्त्राचें आलोचन करीत आहेत. कोणी अनेक प्रकारचीं पुस्तकें वाचीत आहेत. कोणी धर्मशास्त्रांचा विचार करीत आहेत. कोणी नवीन पर्णशाला बांधीत आहेत. कोणी अंगणें सारवीत आहेत. कोणी पर्णशालांतील भूमिका झाडीत आहेत. कोणी ध्यान, धारणा, मंत्रजप, योगाभ्यास, इत्यादि परलोकसाधनें करीत आहेत. कोणी मोळाचीं कटिसूत्रें वळीत आहेत. कोणी वल्कलें धूत आहेत. कोणी समिधा, दर्भ, आणीत आहेत. कोणी मृगचर्में कमावून मृदु करीत आहेत. कोणी तृणधान्याचा संग्रह करीत आहेत. कोणी कमळाक्षांच्या कोणी रुद्राक्षांच्या माळा ओंवीत आहेत. अशा प्रकारचे ऋषिजनांचे नाना व्यापार त्या आश्रमांत चालले होते. जो आश्रम कलिकालानें कधीं पाहिला नाहीं. ज्या आश्रमास अनृताचा परिचय नाहीं. जो आश्रम मदानें कधीं ऐकिला नाहीं. जो आश्रम ब्रह्मदेवाप्रमाणें त्रिभुवनास वंद्य. असा अनेक गुणसंपन्न आश्रम मीं पाहिला.

त्या आश्रमामध्यें एक रक्ताशोक वृक्ष मध्यभागीं होता. त्या वृक्षाचे पल्लव अलित्यासारखे लाल होते. ऋषिमंडळीनें आपलीं कृष्णाजिनें व उदकपूर्ण कमंडलु त्याच्या फांद्यांस अडकविले होते. ऋषिकन्यांनीं पिवळ्या रंगाचीं पंचांगुळें त्याच्या मूलभागीं काढिलीं होतीं. त्याच्या आळ्यांतील पाणी हरिण बालक चोहोंकडून पीत होते. ऋषिकुमारांनीं दर्भांच्या व सालींच्या दोऱ्या वळून त्या वृक्षास बांधिल्या होत्या. त्याचा मूलप्रदेश हिरव्या गोमयानें सारविला होता. व तत्क्षणींच रचलेल्या पुष्पपूजेनें रमणीय दिसत होता. तो वृक्ष फार मोठा नसून गेंदासारखा

वाटोळा दिसत होता. अशा प्रकारच्या त्या अशोक वृक्षाच्या छायेंत बसलेला भगवान् जाबालिनामा महर्षि म्यां पाहिला. त्याच्या भोंवतालीं उग्र तपश्चर्या करणारे अनेक ऋषि बसले होते. म्हणून तो समुद्रांनीं वेष्टिलेल्या भूमंडळाप्रमाणें किंवा कुलपर्वतांनीं वेष्टिलेल्या मेरुपर्वताप्रमाणें किंवा अग्निकुंडांनीं वेष्टिलेल्या यज्ञमंडपासारखा किंवा सूर्यांनीं वेष्टिलेल्या प्रलयकालासारखा शोभत होता. जरेनें त्याचा देह शुभ्र केला होता. त्याच्या मस्तकावर पांढऱ्या शुभ्र जटा लांब लांब पसरलेल्या होत्या. त्या स्वर्गास चढण्याच्या पुण्यकर्मानें मिळविलेल्या दोऱ्याच काय, किंवा तपश्चर्यारूप वटवृक्षाच्या पारंब्याच काय, अशा वाटत. त्यानें आपल्या कपाळावर भस्माचा त्रिपुंड्र लाविला होता. त्यामुळें भागीरथीच्या तीन ओघांनीं व्यापलेल्या हिमालयाच्या शिखराप्रमाणें तो दिसत होता. त्याच्या भुंवया डोळ्यांवर लोंबत होत्या, त्या भुंवयांचा आकार अधोमुख चंद्रकलेसारखा झाला होता. त्या भुवयांवर कपाळाच्या वळ्या लोंबत होत्या. त्या ऋषीचें मुख निरंतर मंत्राभ्यास करतांना उघडत असें म्हणून त्याच्या पांढऱ्या स्वच्छ दंतपंक्ति बाहेर दिसत असत. त्यामुळें ज्याच्या मुखापासून गंगेचा स्वच्छ प्रवाह निघाला होता असा हा जन्हुऋषीच काय असें वाटे. ते त्याचे शुभ्र दंत पाहून असें वाटे कीं हे सत्वगुणाचे अंकुरच आहेत काय, किंवा इंद्रियाच्या निर्मळवृत्तिच काय, किंवा विद्यांचे गुणच काय, किंवा करुणारसाचे प्रवाहच आहेत काय? त्या ऋषीच्या मुखांतून सोमवल्लीच्या रसाचे उद्गार (ढेंकर) निघत होते, त्यांच्या गंधाच्या लोभानें मुखाजवळ भ्रमर येत असत ते पाहून असें वाटे कीं, हीं मूर्तिमंत शापाक्षरेंच काय हा ऋषी फार कृश होता, म्हणून त्याचे गाल फार खोल गेले होते, आणि हनवटी व नासिका उंच दिसत होत्या. त्या ऋषीच्या पापण्यांचे केंस झडून विरळ झाले होते, व कानांचीं भोकें केंसांनीं झांकलेलीं होतीं. त्याच्या मुखावरचे दाढीमिशांचे केंस नाभीपर्यंत लोंबत होते. त्याचा अस्थिपंजर उंच लांबट असून विरळ होता. त्याच्या खांद्यावर शुभ्र यज्ञोपवीत होतें. व त्याचें शरीर गौरवर्ण होतें. उजव्या हातांत स्वच्छ स्फटिक मण्यांची माळ जप करतांना हालत होती. त्याच्या आंगावर पुष्कळ शिरा दिसत होत्या, त्या पाहून हा जुनाट कल्पवृक्ष वेलींनीं

व्यापलेलाच आहे काय असें वाटे. त्याच्या आंगावर शुभ्र वल्कलें होतीं तीं इतकीं निर्मळ होतीं कीं, हीं चंद्रकिरणांनीं किंवा अमृताच्या फेंसांनीं किंवा दयागुणांनीं निर्मिलीं आहेत असें वाटे. तीं वल्कलें पाहून त्याच्या शुभ्र जरेचें प्रतिबिंबच काय बाहेर उमटलें आहे असें भासे. त्याच्याजवळ तिवईवर भागीरथीच्या उदकानें भरलेला स्फटिकाचा कमंडलु ठेविला होता, तो प्रफुल्ल कमलवनाजवळ राजहंस पक्षीच बसला आहे काय असा वाटे. तो ऋषि स्थैर्यानें पृथ्वीसारखा, गांभीर्यानें सागरासारखा, तेजानें सूर्यासारखा, शांतीनें चंद्रासारखा, स्वच्छपणानें आकाशासारखा दिसत होता.

असा ऋषि पाहून माझ्या मनांत आलें कीं, काय हो ह्या महर्षीच्या तपाचा प्रभाव ! ह्याची मूर्ति शांत असून तावलेल्या सुवर्णाप्रमाणें तेजस्वी आहे. ह्याची कांति विजेप्रमाणें डोळे दिपविते, व भय उत्पन्न करिते. सामान्य तपश्चर्या करणाऱ्या मुनीच्या तेजाचें सहन करवत नाहीं, मग ज्यांच्या चरणाचें वंदन सर्व मुनि करतात, ज्यांनीं तपोरूप जळानें पापमळ धुऊन टाकिला आहे, जे दिव्य दृष्टीनें सर्व जगत् करतलामलकवत् पाहतात, असे जे ह्या जाबालिमहर्षीसारखे मोठे तपस्वी ह्यांच्या तेजाचें सहन करवत नाहीं हें काय सांगावें ? ज्याचें नांव घेतलें तरी सर्व पातकें नष्ट होतात, व पुण्य घडतें; मग दर्शन घेतलें असतां पातकें नष्ट होऊन पुण्य घडेल यांत काय आश्चर्य ! धन्य हें आश्रमस्थान कीं ज्याचा स्वामी असा मोठा महर्षि आहे. किंवा हें सर्व -मंडळच धन्य आहे. कारण, दुसरा ब्रह्मदेवच ह्या भूमंडळावर अवतरला आहे. हे भोंवतालचे ऋषिही मोठे पुण्यवंत व धन्य आहेत. कारणकीं, भूमंडळावर अवतरलेला दुसरा ब्रह्मदेवच अशा ह्या जाबालि ऋषीचें मुखारविंद रात्रंदिवस सर्व व्यापार सोडून पाहतात, आणि त्यानें सांगितलेल्या कथा ऐकतात. आणि सरस्वतीही धन्य आहे, कारणकीं, उत्तम ब्राह्मणांनीं ज्याची सेवा आरंभिली आहे, जो सर्वदा प्रसन्नवदन, आणि करुणारसस्रावी, आणि गंभीरमनाचा, अशा महर्षीच्या मुखामध्यें ती राहत आहे. ब्रह्मदेवाच्या मुखांत वास करणाऱ्या वेदांनीं फारदिवसांनीं आपणांस राहण्याजोगें दुसरें हें स्थान संपादिलें. वर्षाकालांत गढूळ झालेल्या

सर्व नद्या जशा शरत्कालाच्या योगानें स्वच्छतेप्रत पावतात, तशा कलिकालानें मलिन झालेल्या सर्व विद्या ज्या ऋषीच्या आश्रयानें पुन्हा स्वच्छते प्रत पावल्या आहेत. ज्या ऋषीच्या आश्रयानें ह्या तपोवनांत कलिकालाचा पराभव करून कृतयुगाचे धर्म चालत आहेत. मजमध्यें सप्तऋषि वास करतात म्हणून जो आकाशाला अभिमान झालेला आहे तो भूमीवर जाबालिऋषि वास करीत आहे असें पाहून गेला असेल. हाऋषि सर्व तेजस्विजनामध्यें श्रेष्ठ म्हणून ह्याच्या तेजाचा पराभव कोणत्याही महाभूता कडून होत नाहीं, व सर्व देवताही ह्याला पाहून भीत आहेत. असाह्या जाबालिनामा महर्षि केवळ करुणारसाचा प्रवाह, संसार समुद्र तरण्याचा सेतु, क्षमारूप उदकाचा आधार, संतोषामृताचा सागर, सिद्धिमार्गाचा उपदेष्टा, दुष्टबुद्धि ग्रहांचा अस्ताचल, शांतिवृक्षाचें मूळ, बुद्धिचक्राचा मध्याधार, धर्मध्वजाचा प्रासाद, सर्वविद्यारूप स्त्रियांच्या स्नानाचें तीर्थ, लोभसमुद्राचा वडवाग्नि, शास्त्ररत्नाची खाण, धर्मरूप सुवर्णाची कसोटी, विषयरूप वृक्षांस जाळणारा वन्हि, मोहरूप अंधकारास सूर्य, क्रोधरूप भुजंगाचा मोहरा, नरकद्वाराचा अडसर, आचारांचें कुलभवन, मंगलांचें संस्थान, सन्मार्गाचा आदर्श, सत्वगुणाचा आश्रय, कलिकालाचा शत्रु, तपोरूप धनाचें भांडार, सत्याचा सखा, पुण्यरूप जलाचा डोह, मदमत्सरादि दुर्गुणांचा द्वेष्टा, असा हा महर्षि आहे. ह्या महर्षीच्या प्रभावानें ह्या तपोवनांत कोणाचाही परस्पर द्वेष, मत्सर, हेवा, असूया, नाहीं. पशुपक्षीही आपापला स्वाभाविक विरोध सोडून आपापणांत एकमेकांशीं सख्य धरून शांत अंतःकरणानें ह्या तपोवनांत राहण्याच्या सुखाचा अनुभव घेत आहेत.

अशा प्रकारें चिंतन करणारा जो मी त्या मला तो हारीत नामक ऋषिकुमार त्या रक्ताशोक वृक्षाच्या छायेमध्यें एकीकडे ठेवून आपल्या पित्याचे चरण वंदून त्याजपासून कांहींशा दूर अंतरावर एक दर्भासन होतें त्यावर जाऊन बसला. तदनंतर ते सर्व ऋषि मजकडे पाहून त्या हारीत ऋषीस पुसूं लागले कीं, हा शुकशिशु कोठें सांपडला ? असें त्यांनीं पुसल्यावर तो हारीत ऋषि त्यांस सांगूं लागला कीं, मी येथून स्नानास जात असतां मार्गामध्यें पंपासरोवराच्या तीराजवळ एका वृक्षाच्या कोठ्यांतून खालीं पडलेला, उन्हानें म्लान झालेला, व तापलेल्या धुळींत

लोळत राहिलेला, व उंचावरून पडल्यामुळें व्याकुळ झालेला, व मरण्यास टेंकलेला, असा हा शुकशिशु म्यां पाहिला. आणि तो वृक्ष आम्हांसारख्यांनीं चढावयास अशक्य म्हणून कोठ्यांत ठेवतां येईना ह्माजकरितां मला त्याची दया आली, आणि त्याला मीं उचलून येथें आणिलें आहे. तर जोंपर्यंत ह्माला पुरते पंख येऊन आकाशांत उडण्याची शक्ति येई तोंपर्यंत ह्मा आश्रमांतील कोणत्या तरी एखाद्या वृक्षाच्या कोठ्यांत ठेवून आपण आणलेल्या तृणधान्यानें व नाना प्रकारच्या फळांच्या रसानें ह्माचा जीव वांचवावा असें मला वाटतें. कारण कीं, अनाथाचें परिपालन करणें आम्हांसारख्यांचा धर्म आहे; पंख फुटून आकाशांत उडण्याचें सामर्थ्य ह्माला आल्यानंतर हा पाहिजे तिकडे जावो, किंवा आपला परिचय झाला असतां येथेंच राहो इत्यादि माझ्या संबंधाचें त्याचें भाषण ऐकून तो भगवान् जाबालि महर्षि मोठ्या कौतुकानें मान वळवून मजकडे पाहूं लागला. तेव्हां मला असें वाटलें कीं, पुण्यजलें करून हा माझें शरीर प्रक्षालित करतो कीं काय! तो महर्षि वारंवार खूण पोंचल्याप्रमाणें शांतदृष्टीनें पाहून बोलला कीं, हा आपल्या अविनयाचेंच फळ भोगीत आहे. असें त्या महर्षीचें भाषण ऐकून त्या सर्व ऋषिमंडलीस मोठें आश्चर्य वाटलें. तो भगवान् जाबालि महर्षि कालत्रयीं झालेलें सर्व जाणतो, आपल्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें सर्व जग करतलामलकवत् चक्षूनें पाहतो, प्राण्याचीं मागील जन्मांतरेंही जाणतो, भावि गोष्टीही सांगतो, असें त्यांस विदित होतें म्हणून ते त्या महर्षीस पुसूं लागले कीं, ह्मानें कोणता अविनय केला, व कोठें केला, व कशासाठीं केला, हा जन्मांतरीं कोण होता, ह्मा पक्षिजातींत कसा जन्मला, व ह्माचें नांव काय, हें सर्व सांगून आम्हांस झालेलें आश्चर्य घालवावें. कारण आपण सर्वज्ञ आहां, सर्व आश्चर्यकारक गोष्टी जाणतां. असा त्या ऋषिमंडळीनें मोठ्या उत्सुकतेनें प्रश्न केल्यानंतर तो जाबालि महर्षि बोलला कीं, हें आश्चर्यकारक कथानक फार मोठें आहे. हें सांगावयास पुष्कळ वेळ पाहिजे, आणि दिवस तर थोडा राहिला आहे. आमची स्नानाची वेळ झाली, व तुमचीही देवपूजेची वेळ चालली. तर तुम्हीं सर्वांनीं उठावें, आणि आपापल्या यथायोग्य दिवस व्यापार करावा; अनंतर फळें मुळें भक्षून स्वस्थ झालां

म्हणजे तुम्हांस हा कोण व ह्यानें पूर्वजन्मीं काय केलें, व ह्या लोकांत ह्याचे जन्म कसे झाले, हें सर्व पहिल्यापासून मी सांगेन. आतां ह्या शुकबालकालाही आहार घालून ह्याची ग्लानी दूर करावी. मी ह्याची गोष्ट सांगूं लागलों म्हणजे ह्याला आपल्या जन्मांतरींच्या सर्व गोष्टींचें पहिल्यापासून स्मरण होईल, जसें स्वप्नांतल्या गोष्टींचें जागृतपणांत स्मरण होतें तसें, असें मला वाटतें. असें बोलत बोलत तो महर्षि त्या ऋषि-मंडळी सहवर्तमान उठून दिवसास करण्याचा स्नानादि व्यापार करावयास गेला. इतक्यांत दिवसही सरावयास आला. त्यासमयीं अस्ताचलावर आलेला सूर्य लाल दिसत होता तो पाहून असें वाटलें कीं, ऋषींनीं स्नानें करून रक्तचंदन मिश्रित उदकाचीं जीं सूर्यास अर्घ्यें दिलीं त्यांचा तांबडेपणाच काय हा सूर्य आपल्या आंगावर धरीत आहे! आणि त्यावेळेस सूर्याचें तेज हळूहळू कमी होत चाललें होतें त्यामुळें असें वाटलें कीं, सूर्य बिंबाकडे पाहून उष्ण पिणारे ऋषि ह्या सूर्याचें तेज पितात म्हणूनच काय ह्याचें तेज कमी होत चाललें, आणि सप्तर्षींचें मंडळ आकाशांत येणार त्यास आपल्या किरणरूप पादांचा स्पर्श न व्हावा म्हणूनच काय आपले सर्व किरण आटोपून घेऊन सूर्य अस्तास जात आहे. अशा प्रकारचें सूर्यमंडळ जेव्हां दिसूं लागलें, तेव्हां त्याचे किरणही भूतल सोडून, कमलवनें टाकून, वृक्षाग्रांवर व पर्वत शिखारांवर पक्ष्यां प्रमाणें शोभूं लागले. तपोवनांतील वृक्षा त्या तांबड्या उन्हानें लाल दिसूं लागले तेव्हां क्षणभर असें वाटलें कीं, ऋषींनीं त्या वृक्षांवर आपलीं तांबडीं वल्कलें वाळण्यासाठीं पसरलीं आहेत. सूर्य अस्तास गेल्यानंतर पश्चिम समुद्रापासून आकाशांत वर आलेला संध्याराग तांबड्या पोंवळ्यांच्या वेलांप्रमाणें शोभूं लागला. त्या समयांत कोणी ऋषि संध्यावंदन करीत आहेत, कोणी गोमुखींत हात घालून जप करीत आहेत, कोणी देवपूजेची सिद्धता करीत आहेत, कोणी होम धेनूंचीं दुग्धें काढीत आहेत, कोणी होमशाळेच्या वेदीमध्यें दर्भ पसरीत आहेत, कोणी देवतांस बलि देत आहेत. कोणी अग्नींत आहुती टाकीत काहेत, अशा प्रकारचे अनेक व्यापार ऋषि करीत आहेत, असें म्यां पाहिलें. सूर्य अस्तास गेल्यानंतर सूर्य विकासी कमलिनी म्लान व मुकुलित झाल्या तें पाहून असें वाटलें कीं, आपला प्रियमित्र देशांतरास गेला त्याच्या वियोगदुःखानें खिन्न

होऊन त्या पाण्यांत उभ्या राहून पतीचें आगमन पुन्हा लौकर व्हावें ह्या उद्देशानें तपश्चार्यच करीत आहेत काय? इतक्यांत आकाशांत नक्षत्रें दिसूं लागलीं तीं पाहून असें वाटलें कीं, सूर्यानें अस्ताचलावरून पश्चिम समुद्रांत मोठ्यानें उडी टाकिली त्यामुळें वर उडालेले उदकाचे बिंदूच हे आकाशांत पसरून शोभत आहेत. आपला मित्र अस्तास गेल्याची वार्ता ऐकून चंद्रास वैराग्य उत्पन्न झालें म्हणूनच काय तो शुभ्र वल्कलें परिहित करून सप्तऋषीं सहवर्तमान आकाशरूप आश्रमामध्यें राहावयास आला. तो भगवान् चंद्रमा हळूहळू आकाशांत वर आला असतां सर्व जग चुना सारविलेल्या प्रासादा प्रमाणें पांढरें स्वच्छ दिसूं लागलें. आणि प्रदोष काळचे मंद सुगंध शीतळ असे वारे वाहूं लागले. तेव्हां दिवसभर रवितापानें तापलेल्या प्राण्यांस फार सुख झालें.

तदनंतर चार घटका रात्र झाल्यावर मजकडून योग्य आहार करवून तो हारीत ऋषिकुमार मला आपल्या हातीं घेऊन सर्व ऋषिमंडळीसहित पुढें सरून शुभ्र चांदण्यानें शोभणाऱ्या तपोवनाच्या एका प्रदेशीं वेताच्या आसनावर बसलेला, व जालपाद नामक शिष्य जवळ उभा राहून ज्यास ताडाच्या पंख्यानें हळू हळू वारा घालीत आहे, असा जो आपला पिता जाबालि महर्षि त्याशीं बोलूं लागला कीं, महाराज, ही सर्व ऋषिमंडळी ह्या शुकबालकाच्या कथेचें श्रवण करावें असें मनांत आणून मोठ्या कौतुकानें येथें जमली आहे, व वाट पाहत आहे, ह्या शुकबालकही आहार देऊन श्रमरहित स्वस्थ केला आहे, तर हा पूर्वजन्मीं कोण होता, व ह्यानें कोणतें कर्म केलें, व हा पुढच्या जन्मांत कोण होणार, वगैरे ह्याचें कथानक कृपाकरून सांगावें. असा हारीतानें प्रश्न केला असतां त्याचा पिता जाबालि महर्षि माझ्याकडे अवलोकन करून सर्व ऋषि एकाग्र अंतःकरणानें श्रवण करण्यास तत्पर झाले आहेत असें जाणून तुम्हांस कौतुक वाटत असल्यास मी सांगतों ऐकावें असें बोलून माझी कथा सांगूं लागला.

## कथेचा प्रारंभ.

अवंती नामक देशामध्यें उज्जयनी नांवाची एक नगरी आहे. ती अशी कीं संपूर्ण त्रिभुवनाचें भूषणभूत, आणि कृतयुगाच्या उत्पत्तीचें

स्थानच काय, आणि जगत्रयाच्या उत्पत्ति स्थिति संहारास कारणभूत जो महाकाल नामक महादेव त्यानें आपल्या राहण्यास योग्य अशी दुसरी पृथ्वीच उत्पन्न केली काय अशी, समुद्राप्रमाणें उदकानें भरलेले जे अगाध विस्तीर्ण खंदक त्यांनीं वेष्टिलेली, जिच्या भोंवतालचा कोट पाहून अशी शंका होते कीं आकाशांत उडणारा जो मैनाकपर्वत तो आपला मेहुणा शिव त्याचें हें राहण्याचें स्थान जाणून प्रेमानें खालीं उतरला आहे काय, ज्या नगरींतील बाजारचे मार्ग विस्तीर्ण असून सुवर्ण, मुक्का, रत्नें, ह्यांनीं भरलेले पाहून अगस्त्य ऋषीनें उदक प्राशून कोरडे पाडलेले हे समुद्राचे तासच काय अशी शंका होते. ज्या नगरींतील चित्रशालांमध्यें देव, दैत्य, सिद्ध, गंधर्व, विद्याधर, इत्यादिकांचीं चित्रें काढलीं होतीं, म्हणून निरंतर चाललेला नगरींतील उत्साह पाहण्याकरितां मोठ्या कौतुकानें आकाशांतून खालीं उतरलेल्या दिव्य विमानांच्या समुदायानेंच काय ती व्यापिली आहे असें वाटावें. ज्या नगरींत जागजागीं देवांचीं देवळें रमणीय असून पर्वतासारखीं उंच आहेत, व त्यांच्या शिखरांवर सोन्याचे कलश आहेत, त्या कलशांची कांति आकाशांत पसरते; आणि त्यांच्या शिखरांवर पांढऱ्या पताकांनीं युक्त असे उंच उंच ध्वज आहेत, ते वाऱ्यानें निरंतर हालत आहेत. ह्यामुळें गंगेच्या स्वच्छ प्रवाहानें युक्त अशीं हीं हिमालयाचीं शिखरेंच काय असें वाटतें. त्या नगरीच्या भोंवतालीं मोठमोठे रमणीय बाग आहेत. त्या बागांत नानाप्रकारचीं फुलझाडें व फळझाडें दाट आहेत. निरंतर पायरहाट चालले आहेत. विहिरींचें पाणी सतत वृक्षांच्या मूलप्रदेशाकडून वाहत आहे, तेणेंकरून सर्व वृक्ष हिरवेगार दिसत आहेत. जागजागीं पाणी प्यावयासाठीं कुंड्या केल्या आहेत, आणि बसावयास चुनेगच्ची ओटे बांधलेले आहेत. त्या नगरींत लोकांच्या घरोघरचे बागही फार रमणीय आहेत जागजागीं जलमंदिरें आहेत, त्यांत कारंज्यांच्या धारा सतत उडत आहेत व उदकाचे बिंदु चोंहोंकडे पसरत आहेत, त्यामुळें मयूरांस मेघवृष्टीची भ्रांति होऊन ते आपले पंख पसरून नृत्य करितात. त्या नगरीमध्यें हजारों सरोवरें आहेत. त्यांमध्यें अनेक प्रकारचीं कमळें प्रफुल्लित होतात, त्यामुळें तीं सरोवरें सहस्रनेत्र इंद्राप्रमाणें शोभतात. त्या नगरींत जागजागीं हस्तिदंती बगले आहेत, ते

चोहोंकडून कदलींच्या वनांनीं व्याप्त आहेत, व अमृताच्या फेंसाप्रमाणें शुभ्र दिसतात. ती नगरी चोहोंकडून शिप्रानदीनें वेष्टिलेली आहे. त्या नगरींत विलासी जन बहुत राहतात. ज्यांची कीर्ति संपूर्ण भूमंडळांत पसरली आहे. जे कुबेराप्रमाणें धनसंपन्न आहेत. जे वीर असून विनयसंपन्न; जे, प्रिय असून सत्य भाषण करणारे; जे सुरूप असून स्वस्त्रियेवर संतुष्ट. जे अतिथिजनाच्या आगमनाचीमात्र इच्छा करणारे. जे काम, अर्थ, धर्म, त्रिविध पुरुषार्थ साधणारे, जे बलवंत असून परलोकाचें भय बाळगणारे, जे विद्याकलापारंगत, जे हास्य विनोद करण्याविषयीं निपुण, जे अनेक भाषा जाणणारे, जे काव्यनाटक अलंकार इतिहास पुराणें ह्यांवर प्रीति करणारे, जे सुभाषिताचें व्यसन बाळगणारे, जे उत्तम पुरुषाच्या समस्त गुणांनीं युक्त, अशा विलासिजनांनीं शोभायमान ती नगरी आहे. पृथ्वीमध्यें जितक्या वस्तु तितक्याही जिजमध्य दृष्टीस पडतात. जी नगरी आपल्या वैभवानें इंद्राच्या अमरावती नगरीशीं हेवाच करीत आहे. अशा प्रकारची उज्जयनी नगरी आहे. ज्या नगरीमध्यें सर्वदेवनमस्कृत जो महाकाल नामक महादेव तो कैलास पर्वतीं वास करण्याविषयींची प्रीति सोडून प्रीतीनें राहत आहे.

अशा प्रकारच्या त्या नगरींत सर्व प्रजांची पीडा दूर करणारा तारापीड ह्या नांवाचा राजा होता. जो राजा नृग नहुष, ययाति, धुंधुमार, भरत, भगीरथ, दशरथ, जन्मेजय, अर्जुन इत्यादि जे मोठमोठे राजे पूर्वी होऊन गेले त्यांसारखा पराक्रमी व पुण्यवान् होता. ज्यानें आपल्या बाहुबलानें संपूर्ण भूमंडल हस्तगत केलें, जो बुद्धिमान् असून उत्साहसंपन्न, ज्याची बुद्धि नीतिशास्त्राविषयीं निरलस, जो धर्मशास्त्रांत प्रवीण, जो तेजानें सूर्यासारखा व कांतीनें चंद्रासारखा, ज्याचा देह यज्ञादिकर्मेंकरून पवित्र झालेला, ज्यानें जगाचा उपद्रव नाहींसा केला, ज्याचें यश दिगंतास व्यापणारें, जो लक्ष्मीचें निवासस्थान, जो सत्याचा आश्रय, जो विद्वानांचा पालक, जो मोठी सेना बाळगणारा, जो शत्रूंस कालदंडासारखा, शेषाप्रमाणें ज्यानें सर्व पृथ्वीचा भार मस्तकीं घेतला, जो धर्माचा अवतारच काय किंवा पुरुषोत्तमाचा प्रतिनिधिच काय, अशा प्रकारचा तो तारापीड राजा होता.

तो तारापीड राजा राज्य करीत असतां सर्व प्रजा नीतीनें व सुखानें

वर्तत होती. अन्यायाचा व अधर्माचा प्रवेश त्याच्या राज्यांत होत नव्हता. त्या राजाचा मुख्य प्रधान, शुकनास ह्या नांवानें प्रसिद्ध, जातीचा ब्राह्मण होता. जसा इंद्राचा बृहस्पति, वृषपर्व दैत्याचा शुक्राचार्य, दशरथ राजाचा वसिष्ठ, रामचंद्राचा विश्वामित्र, धर्मराजाचा धौम्य, भीमराजाचा दमनक, नलराजाचा सुमति, तसा शुकनास प्रधान तारापीडाचा साह्यकर्ता होता. ह्याची बुद्धिही तशीच सर्व कार्यांविषयीं अकुंठित होती, व सर्वशास्त्रें व सर्व कला ह्यांच्या अभ्यासेंकरून गंभीर झालेली होती. ज्या प्रधानाचा बालपणापासून राजाशीं परिपूर्ण प्रेमरस भरलेला होता. जो नीतिशास्त्राप्रमाणें वर्तन करण्याविषयीं कुशल होता. जो राज्यकार्यभाररूप नौका चालविण्याविषयीं नाविक, किंवा शेषाप्रमाणें सर्व पृथ्वीचा भार धरण्याविषयीं समर्थ. जो धैर्याचें घर, जो लोकस्थितीचा पाया, जो सत्याचा सागर, जो गुणांचा गुरु, जो आचाराचा प्रवर्तक, जो धर्माचा पोषक, जो गांभीर्याचा समुद्र. जो संधिविग्रह करण्याविषयीं कुशल, जो शरीरानें दृढ, जो विनयरूप अलंकारानें शोभणारा. समुद्रवलयांकित पृथ्वीवर राहणाऱ्या जनांचें वर्तमान ज्याला घरच्या वर्तमानाप्रमाणें रोजच्यारोज कळत असे, असा तो प्रधान तारापीड राजाचा होता.

तारापीड राजा पूर्व वयांत असतांच आपल्या बाहुबळानें संपूर्ण द्वीपांसहित पृथ्वीचें राज्य संपादून, त्या शुकनास प्रधानावर आपल्या मित्राप्रमाणें सर्व राज्यकारभार सोंपवून, व सर्व प्रजांची सर्वप्रकारें स्वस्थता करून आपणास कांहीं दुसरें कर्तव्य राहिलें नाहीं असें पाहून, व सर्व शत्रु निःशेष नाहींतसे झाल्यामुळें निःशंक होऊन, सर्व पृथ्वीचा व्यापार सोडून, प्रायशः यौवनांतलें सुखच अनुभवीत राहिला होता. ज्या ज्या ऋतूंत जे जे विलास व भोग योग्य ते ते त्या त्या ऋतूंत अनुभवीत होता. तो राजा आपल्या स्त्रियांसहवर्तमान व आपल्या मित्रांसहवर्तमान गृहक्रीडा, जलक्रीडा, स्थलक्रीडा, वनक्रीडा, उपवनक्रीडा, ज्या ज्या वेळेस ज्या ज्या आवडल्या त्या त्या वेळेस त्या त्या करीत होता. केव्हां गायन, केव्हां नृत्य, केव्हां वाद्यें, केव्हां मल्लयुद्धें, केव्हां पशुयुद्धें, केव्हां मृगया, केव्हां वनभोजनें, केव्हां गृहभोजनें, केव्हां उत्तम फलांचें भक्षण, केव्हां उत्तम मिष्टान्नाचें भक्षण,

इत्यादिकें करून आनंदानें कालक्रमण करीत होता. फार काय सांगावें, जें जें अत्यंत रमणीय, व जें जें अत्यंत सुखकारक असून आपणास इष्ट आपल्या मोठेपणास व त्या काळास अविरुद्ध, वस्तु किंवा कृत्य होतें, तें तें, तो राजा त्याच्या त्याच्या स्वाधीन न होतां, उपभोगीत होता. तरी प्रजांची प्रीति आपणावर राहण्यासाठीं मध्यें मध्यें त्यांस दर्शन देत होता, व कांहीं विशेष कारण उपस्थित झालें असतां सिंहासनावरही बसत होता.

तो शुकनास नामक प्रधान सर्व पृथ्वीच्या राज्याचा कारभार आपल्या बुद्धीच्या बळानें अनायासें करून करीत असतां, जशी राजावर तशी आपणावरही प्रजांची प्रीति व्हावी म्हणून तो प्रजांचीं सर्व काय वेळच्यावेळीं करीत होता. राजास जसे सर्व राजे प्रणाम करीत होते, तसे त्या शुकनास प्रधानासही प्रणाम करीत होते. त्या प्रधानाची स्वारी निघाली असतां अतिचपल अश्वांच्या खुरांच्या शब्दांनीं लोकांचे कर्ण बधिर होऊन जात असत. आणि सैन्याच्यायोगानें सर्व पृथ्वी दणदणून जाई. त्यामुळें पर्वतही हालल्याप्रमाणें होत. ही राजाची स्वारी कीं प्रधानाची स्वारी असा लोकांस संशय पडे. राजाकडून जीं जीं कार्यें व्हावयाचीं तीं तीं त्या प्रधानाकडून होत असत.

अशा प्रकारें तो राजा आपला सर्व राज्यकाभार प्रधानावर ठेवून यौवनसुखाचा अनुभव घेत असतां बहुतकाळ लोटला. त्या काळांत अन्यही जीं सुखें लोकांत प्रसिद्ध आहेत तीं सर्व त्या राजानें भोगिलीं. परंतु एक पुत्रमुखदर्शनाचें सुख मात्र त्या राजास प्राप्त झालें नाहीं. जसे लव्हाळे बहुतकाळ असले तरी त्यांस फळें येत नाहींत त्याप्रमाणें त्या राजास बहुत स्त्रिया असून, व तो राजा पूर्वीं वर्णिल्याप्रमाणें त्या स्त्रियांचा उपभोग करीत असूनही, त्या स्त्रियांस संतति झाली नाहीं.

जसें जसें त्या राजाचें यौवन अतिक्रांत होत चाललें तसा तसा त्या राजास आपणास पुत्र व्हावा असा जो आपला मनोरथ आहे तो व्यर्थ जाईल असें वाटून अनपत्यत्वामुळ झालेला त्या राजाचा संताप वृद्धिंगत होत चालला, आणि विषयोपभोगाच्या सुखाच्या इच्छेनें त्या राजाचें मन सोडलें. तो राजा आपणास अपत्य नाहीं येवढ्याच कारणानें हजारों मांडलिक राजांनीं वेष्टित असूनही आपणास असहाय मानीत हो-

ता, व नेत्रयुक्त असूनही अंध मानीत होता. व सर्वभुवनास आश्रयभूत असूनही निराश्रय मानीत होता.

त्या राजाची सर्व स्त्रियांत मुख्य, व जिचें सौंदर्य त्रिभुवनास आश्चर्यकारक, व स्त्रियांच्या आंगीं जे विलास असतात त्यांची जननीच काय, अशी विलासवती ह्या नांवाची पट्टराणी होती. ती चंद्रकला जशी शिवाच्या जटाजूटास भूषणभूत, व कौस्तुभ मण्याची कांति जशी विष्णूच्या वक्षस्थळास, व वनमाला जशी बळरामाच्या त्दृदयास, व मर्यादा जशी समुद्रास, व मदलेखा जशी दिग्गजास, व कल्पलता जशी कल्पवृक्षास, व पुष्प समृद्धि जशी वसंतऋतूस, व चंद्रिका जशी चंद्रास, व कमललता जशी सरोवरास, व नक्षत्रपंक्ति जशी आकाशास, व हंसपंक्ति जशी मानस सरोवरास, व चंदनवृक्षांची पंक्ति जशी मलय पर्वतास, व मणियुक्त फणांची पंक्ति जशी शेषास भूषणभूत तशी त्या राजास ती भूषणभूत होती.

एके दिवशीं तो राजा त्या विलासवतीच्या मंदिरांत गेला असतां तिचा सर्व सेवकजन चिंताक्रांत होऊन निश्चल दृष्टि व दीनवदन होऊन शोकानें मुका झालेला असा तिच्या भोंवतालीं बसला आहे, व चोबदारही कांहीं मनांत आणून चिंतन करीत असल्यामुळें स्तब्धदृष्टि होऊन भोंवतालीं उभे राहिले आहेत, व घरांतल्या वृद्धस्त्रिया तिच्या भोंवतालीं बसून तिचें आश्वासन करीत आहेत, आणि तिच्या नेत्रांतून अश्रु पडत असून पट्टवस्त्र भिजलें आहे, व तिनें आंगावरील अलंकार काढून टाकिले आहेत, आणि डाव्या हातावर मुखकमल ठेविलें आहे, आणि न बांधल्यामुळें वेणीचे केश इकडे तिकडे उडत आहेत, आणि लहानशा पलंगडीवर बसली आहे, अशी ती विलासवती त्या राजानें पाहिली. इतक्यांत राजा आला असें पाहून ती झटकर उठून पुढें आली. तेव्हां त्या राजानें तिचा हात धरून तिला त्याच पलंगडीवर पुन्हा बसविलें, आणि आपणही जवळ बसला.

तदनंतर तिच्या शोकाचें कारण न समजल्यामुळें तो राजा तिच्या गालावरचे अश्रुबिंदु आपल्या हातानें पुसून भीतभीत तिजशीं बोलूं लागला कीं, हे प्रिये, तुला काय झालें, तुझ्या मनांत कशाविषयीं शोक प्राप्त झाला आहे, व तूं मुकाट्यानें रोदन कां करीत आहेस? ह्या तुझ्या

नेत्रांच्या पापण्यांवर आश्रुबिंदु मौक्तिकमाळेसारखे दिसत आहेत. हे सुंदरी तूं अलंकारांचें धारण कां केलें नाहीं? आरक्त कमळावर जसें कोंवळें ऊन्ह शोभतें तसा शोभणारा लाक्षारस आपल्या पायांस कां लाविला नाहीं? सरोवरांतील कमलावर शब्द करणाऱ्या हंसाप्रमाणें मधुर शब्द करणारीं मणिमय नूपुरें आपल्या पादकमलावर कां घातलीं नाहींत? कोणत्या कारणानें हा तुझा मध्यभाग मेखलालंकार न घातल्यामुळें मुका झाला आहे? चंद्रमंडळावर जसा कलंकरूप मृग शोभतो तसा स्तनतटावर शोभणारा कृष्णागरूचा वेल कां लिहिला नाहीं? व शिवाच्या मस्तकावरची चंद्रकला जशी गंगेच्या ओघानें शोभते तशी तुझी मान मोत्यांच्या हारानें कां भूषित केली नाहीं? हे विलासिनी, तुझ्या गालावरचे केंशराच्या रंगानें काढलेले वेलबूट आश्रुबिंदूंच्या प्रवाहानें धुऊन गेल्यामुळें विशोभित व्यर्थ कां झाले? तूं आपला रक्त कमलाप्रमाणें शोभणारा हस्त कर्णभूषणासारखा कानावर कां ठेविला आहे? तुझ्या ललाटावर लावलेला गोरोचनाचा तिलक कोणत्या कारणानें नाहींसा झाला? आणि तुझ्या मस्तकावरील नील कुंतल इकडे तिकडे उडवलेले कां दिसतात? तुझ्या केशांत चंद्रकोर भूषण नाहीं त्यामुळें चंद्र नसल्यामुळें अंधकारयुक्त कृष्णपक्षींच्या रात्रीप्रमाणें तुझा केशपाश पाहून मला फार खेद होतो. हे प्रिये प्रसन्न हो आणि तुला दुःख होण्याचें कारण काय झालें तें मला सांग. तुझ्या निःश्वास-वायूनें माझें अंतःकरण कंपित होत आहे. हे सुंदरी, खरेंच सांग, माझ्याकडून कांहीं अपराध घडला आहे किंवा सेवकजनांपैकीं कोणी कांहीं अपराध केला आहे? मी तर आपल्या ठिकाणीं विचार करून पाहतों तरी माझ्याकडून तुजविषयीं कांहीं थोडाही अपराध घडला असेल असें मला वाटत नाहीं. माझें जीवित आणि राज्य हीं तुझ्या स्वाधीन आहेत. तर हे सुंदरी, तुझ्या शोकाचें कारण सांग. मी त्याचा परिहार करीन. असें राजानें विचारिलें असतांही ती विलासवती पट्टराणी कांहींच उत्तर करीना, तेव्हां राजानें तिच्या परिजनास तिच्या अश्रुपाताचें कारण पुसलें. त्यासमयीं तिची तांबूलाचा डबा बाळगणारी व निरंतर जवळ असणारी मकरिका नांवाची दासी राजास सांगूं लागली.

महाराज, आपणापासून थोडातरी अपराध कोठून होणार? आणि

महाराज जवळ असतां सेवक जनाची अथवा दुसऱ्या कोणाची राणी साहेबांचा अपराध करण्याविषयीं शक्ति कोठून असणार? तेव्हां अपराधाची गोष्ट बोलावयासच नको. आतां राणी साहेबांस शोक होण्याचें कारण कोणतें म्हणून महाराज दासीला विचारतात, तर मुख्य कारण हेंच कीं इतके दिवस महाराजांचा समागम असून फल कांहींच झालें नाहीं, म्हणून देवीस मोठाच संताप प्राप्त झाला, तेणेंकरून मोठ्या ग्रहानें ग्रासल्या प्रमाणें राणी साहेबांचें चित्त उद्विग्न झालें आहे. त्यास फार वेळ झाला.

आज किती दिवसांपासून राणी साहेबांनीं विलासाचे उपभोग टाकले आहेत. निजणें, बसणें, स्नान करणें, भोजण करणें, भूषण धारण करणें इत्यादिक नित्याचे करावयाचे व्यापारही सेवक जनांनीं प्रेरणा करावी तेव्हां मोठ्या बलात्कारानें करितात, आणि निरंतर चित्तांत खेद मानीत आहेत. परंतु महाराजांच्या चित्तास खेद न व्हावा म्हणून आपलें दुःख बाहेर दाखवीत नाहींत.

आज तर शिवरात्रीचा दिवस म्हणून भगवान् महाकालेश्वर ह्याच्या पूजेला राणी साहेब गेल्या होत्या. तेथें देवळांत पौराणिक बाबा महाभारत वाचीत होते. त्यांत असें निघालें कीं, ज्याला पुत्र नाहीं त्याला उत्तम लोक प्राप्त होत नाहीं. असें ऐकून राणी साहेब घरीं आल्या. तेव्हांपासून सेवकजनानें कितीही प्रार्थना केली तरी कांहीं खात नाहींत. व भूषणें, घालीत नाहींत, व कोणी कांहीं पुसलें तरी त्याचें नीटसें उत्तर देत नाहींत. डोळ्यांतून अश्रुबिंदु काढून रोदन करीत बसल्या आहेत. असें वर्तमान जें होतें तें महाराजांस विदित केलें. ह्याचा विचार करणें महाराजांकडे आहे. असें बोलून ती दासी उगीच उभी राहिली.

तदनंतर तो तारापीड राजा घटकाभर उगीच स्तब्ध राहून, दीर्घ उष्ण श्वास टाकून त्या विलासवती राणीशीं बोलूं लागला. हे प्रिये, दैवाच्या स्वाधीन जी गोष्ट आहे तिजविषयीं खेद करणें व्यर्थ आहे. मला असें वाटतें, ह्या गोष्टीविषयीं प्रायः देवाची आम्हांवर दया नाहीं. आणि आमचें चित्त पुत्रालिंगनसुख अनुभवायास पात्र नाहीं. पूर्वजन्मीं अशा प्रकारचें कांहीं पुण्य आम्हीं केलें नसेल. कारण कीं, जसें पूर्वजन्मीं कर्म करावें तसें ह्या जन्मीं मनुष्यास फल प्राप्त होतें असें सांगतात.

कोणी कितीकां मोठा असेना, त्याला दैवाची गति अन्यथा करतां येत नाहीं. तर आतां मला असें वाटतें कीं ह्या मनुष्य लोकांमध्यें जितके कांहीं पुत्र प्राप्तीचे उपाय असतील तितके करावे. मुख्य उपाय हेच दिसतात कीं, गुरूविषयीं अधिक भक्ति करावी, आणि देवतांची पूजाही दुप्पट करावी, आणि ऋषिजनांच्या सेवेविषयीं अधिक आदर करावा. कारण कीं, ऋषि हें एक मोठेंच दैवत आहे. त्यांचें आराधन जे कोणी यत्नें करून करतात त्यांस त्यांच्या आशीर्वादानें दुर्लभ वस्तूचीही प्राप्ति होते. अशा प्रकारच्या पूर्वींच्या गोष्टी म्यां ऐकिल्या आहेत. मगध देशचा राजा बृहद्रथ ह्याला चंडकौशिक ऋषीच्या प्रसादानें मोठा पराक्रमी जरासंध नांवाचा पुत्र प्राप्त झाला. तसेंच दशरथ राजास वृद्ध दशेपर्यंत संतति नसतां ऋष्यशृंग मुनीच्या प्रसादानें साक्षात् देवतारूप राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न हे चार पुत्र प्राप्त झाले. आणखी असे पुष्कळ राजे तपोधन ऋषींचें आराधन करून त्यांच्या अनुग्रहानें पुत्रदर्शनरूप अमृतास्वादाचें सुख पावले आहेत. म्हणून महामुनिजनांची सेवा एकनिष्ठपणें केली तर ती कधीं निष्फळ व्हावयाची नाहीं. प्रिये, जसें तुला दुःख वाटतें, तसें मलाही अनपत्यत्वाचें दुःख वाटतें. मी आपल्या मनांत असें चिंतन करीत आहे कीं, आपली प्रिया गर्भाच्या भारानें मंदमंद चालत आहे, आणि पूर्णगर्भ झाल्यामुळें पौर्णमासीच्या रात्रिमुखा प्रमाणें जिचें मुख पांढरें झालें आहे, अशी मी कधीं पाहीन; आणि महाराज, आपणास पुत्र झाला, असें आनंदाचें वर्तमान सांगून सेवकजन प्रजपासून बक्षीस कधीं घेईल; आणि मुलास मांडिवर घेणारी, व जिचें वस्त्र हळदीनें पिवळें झालें आहे अशा प्रकारची तूं, माझ्या दृष्टीस पडून मला कधीं आनंदविशील, आणि ज्या बालकाच्या मस्तकावरचे कोमल केश, सर्वौषधींचें चूर्ण घातल्यामुळें पिंगटवर्ण व जटाप्राय झाले आहेत, आणि ज्या बालकास बाधा न व्हावी म्हणून घृत मिश्रित मधानें टाळू भरून वर पांढऱ्या मोहऱ्या डकविल्या आहेत, आणि ज्याच्या कपाळीं दृष्टीचा आंगारा लावला आहे, आणि ज्याच्या गळ्यांत गोरोचना लावून पिवळें केलेलें व गांठी दिलेलें सूत बांधलें आहे, आणि ज्याचें मुख दंतरहित असून हास्ययुक्त सुशोभित दिसत आहे, असा उताणा निजलेला बाळक माझ्या चित्तास कधीं आनंद देईल; आणि मंगळदीपा प्रमाणें ज्या बाल-

कास हातीं घेऊन स्त्रिया इकडे तिकडे फिरवीत आहेत, व ज्यास पाहून सर्व लोकांस आनंद होत आहे, असा बालक माझा शोकरूप अंधकार कधीं नाहींसा करील; आणि ज्याचें शरीर धुळीनें मलिन झालें आहे, व माझ्या दृष्टीस व मनांस घेऊन इकडे तिकडे रांगत फिरत आहे, असा माझा बालक घराचें अंगण कधीं शोभवील; आणि घरीं बाळगलेले जे मृग, हंस, सारस ह्मांस धरावया करितां त्यांच्या मागें लागलेला, आणि हत्तीच्या छाव्या प्रमाणें नानाविध लीला करणारा, आणि अनेक प्रकारच्या खोड्या करणारा, आणि मणिमय भूमितलावर आपलें पडलेलें प्रतिबिंब मोठ्या कौतुकानें पाहून अडखळत चालणारा, असा मी कधीं पाहीन, आणि ज्याला उचलून घ्यावया साठीं हजारों राजे आपले हात पुढें करीत आहेत, व ज्याची दृष्टि भूषणांच्या मण्यांच्या कांतीनें दिपून चंचल झाली आहे, असा बालक माझ्या पुढें सभेंत फिरतांना मी कधीं पाहीन; असें आणखी अशा प्रकारच्या शेंकडों मनोरथांचें चिंतन करीत व अंतःकरणांत दुःख मानीत माझ्या रात्री दुःखांत जात आहेत. जसा तुला शोक झाला आहे तसा मलाही अनपत्यत्वामुळें झालेला शोक रात्रंदिवस जाळीत आहे. सर्व जग मला शून्यसें भासतें, सर्व राज्य आणि आपलें जीवितही मी निष्फळ असें मानितों. परंतु दैव प्रतिकूल आहे तोंपर्यंत कांहीं उपाय चालावयाचा नाहीं. तर हे प्रिये शोकातिशय सोडून व धैर्य धरून धर्माविषयीं बुद्धि धर. कारण कीं जे धर्मतत्पर असतात त्यांस कल्याणसंपत्ति सन्निहित होतात.

असें बोलून उदक घेऊन आपल्या पल्लवतुल्य कोमल हस्तानें कमलतुल्य मनोहर जें त्या विलासवतीचें मुख त्यावर आलेल्या अश्रुपंक्तींचें राजानें परिमार्जन केलें, आणि प्रियशतांनीं व शोकहारक मधुरवचनांनीं व धर्माचरणाच्या उपदेशांनीं त्या विलासवतीचें पुनः पुनः समाधान केलें, आणि फार वेळपर्यंत तेथेंच राहून मग तो राजा राणीस विचारून तेथून आपल्या मंदिराकडे गमन करिता झाला.

अशा प्रकारें आश्वासन करून तो राजा गेला असतां त्या राणीच्या शोकाचा वेग कांहींसा कमी झाला, म्हणून प्रतिदिवशीं करावयाचा जो अलंकार धारणादि व्यापार तो राणीनें सर्व केला; आणि त्या दिवसापासून ती देवतांच्या आराधना विषयीं, व ब्राह्मणांच्या पूजेविषयीं, व गुरु-

जनांच्या सेवेविषयीं, मोठा, आदर करूं लागली. पुत्रप्राप्ती करितां कोणीही जें जें व्रत तिला सांगत तें तें व्रत ती मोठ्या आस्थेनें करीत असे. त्या व्रतांत जरी मोठे क्लेश झाले तरी त्यांची गणना तिनें केली नाहीं.

ती राणी कधीं कधीं स्नान करून शुभ्र वस्त्र नेसून उपोषित राहून देवीच्या देवळांत भूमीवर दर्भ पसरून त्यांवर रात्रीं शयन करीत असे; आणि कधीं कधीं पवित्र उदकानें गाईच्या गोठ्यांत स्नान करीत असे. कधीं तिळांनीं भरलेलीं सुवर्णपात्रें ब्राह्मणास देत असे. कधीं कृष्णपक्षींच्या चतुर्दशीच्या रात्रीस चव्हाट्यावर मांत्रिकांनीं काढलेल्या मंडळावर बसून दिग्देवतांस बलिदान देऊन मंगलस्नान करीत असे. कधीं नवसास पावणाऱ्या देवतांच्या देवळांत जात असे. कधीं नंदिन्यादि मातृका देवतांचें सेवन करीत असे. तसेंच लोकपूज्य जे अश्वत्थादि वृक्ष त्यांचें पूजन करून त्यांस प्रदक्षिणा नमस्कार करीत असे. कधीं रुप्याच्या पात्रांत घातलेला दध्योदन बळी कावळ्यांस देत असे. विधियुक्त पुष्पें, फळें, धूप, दीप, अनुलेपन, अपूप, पायस, लाह्या, इत्यादि पूजा संभारांनीं ज्येष्ठा देवीची पूजा नित्य करीत असे. कधीं बैरागी, गोंसावी, ह्यांस मिष्टान्न भक्षणास घालून प्रश्न विचारीत असे. कोणी लक्षणें जाणणारे, कोणी शकुन सांगणारे, कोणी भाकीत सांगणारे, अशा प्रकारच्या लोकांचा फार आदर सत्कार करीत असे. आपल्या भेटीस आलेल्या ब्राह्मणाकडून वेदाचीं पारायणें करवीत असे; पौराणिकाकडून पुण्यकथा पुराणें वाचवून आपण ऐकत असे. ज्यांवर गोरोचनेनें मंत्र लिहिले आहेत अशीं भूर्जपत्रें सूत्रांत गोंवून गळ्यांत बांधीत असे. प्रति दिवशीं सेवक जनाकडून उपश्रुति पाहवीत असे.

ह्या प्रकारें करून काल जात असतां कोणा एका दिवशीं बहुतेक रात्र गली असतां, व आकाशांत नक्षत्रें थोडीं असून निस्तेज झालीं असतां, व आकाश धूसरवर्ण झालें असतां, त्या तारापीड नामक राजानें असें स्वप्न पाहिलें कीं, जसा हत्तिणीच्या मुखांत कमलाचा बिसपल्लव जातो तसा आपली स्त्री विलासवती गच्चीवर उभी आहे तिच्या मुखांत सकलकलापरिपूर्ण असा चंद्र प्रवेश करीत आहे.

असें स्वप्न पाहिल्यानंतर तो राजा जागृत होऊन उठून हर्षातिशयानें अत्यंत विस्तृत झालेल्या नेत्रांनीं ज्यानें निवासगृह शुभ्रवर्ण केलें आहे अ-

सा होत्साता त्याचक्षणीं आपल्या शुकनास नामक प्रधानास मोठ्या सन्मानानें बोलावून आणवून तें पाहिलेलें स्वप्न त्यास सांगता झाला. तेव्हां तें स्वप्न ऐकून तो प्रधान मोठा आनंदित होत्साता राजाशीं बोलूं लागला.

महाराज आमचे मनोरथ बहुत दिवसांनीं परिपूर्ण झाले. आतां थोडक्याच दिवसांनीं स्वामी पुत्रमुखकमलाच्या अवलोकनाचें सुख अनुभवितील, ह्यांत कांहीं संशय नाहीं. आणि मीही आजच रात्रीं असें स्वप्न पाहिलें कीं, कोणी एक वृद्ध ब्राह्मण स्वच्छ धौतवस्त्र नेसलेला व पांघरलेला, ज्याची मूर्ति शांत, व आकृति दिव्य, असा आला, आणि त्यानें प्रफुल्लित झालेलें सहस्र पांकळ्यांनीं युक्त, व शुभ्र केसर आणि मधुबिंदु ह्यांनीं परिपूर्ण असें श्वेतकमल मनोरमा नामक जी माझी प्रिया तिच्या मांडीवर नेऊन ठेविलें. असें आपलें स्वप्न सांगून प्रधान आणखी बोलला कीं, प्रथम झालेलीं शुभ चिन्हें आनंद देणारा लाभ समीप आला आहे असें सुचवितात; आणि आपणास तर पुत्र मुखदर्शनसुखावांचून दुसरें कोणतेंही अत्यंत प्रिय असें परमानंदाचें कारण राहिलें नाहीं. आणि पाहटेच्या रात्रीस पाहिलेल्या स्वप्नांचीं फळें प्रायः खरीं होतात. तर खचित सांगतों, थोडक्याच दिवसांत मांधाता नांवाच्या राजाप्रमाणें राज्य करणारा व लोकांस आनंद देणारा असा पुत्र देवीस होईल. शरत्काळची कमललता नवीन कमलाच्या उद्भवानें गंधगजास जशी आनंदविते, तशी देवी पुत्राच्या उत्पत्तीनें महाराजांस आनंद देईल. आणि त्या पुत्राच्या योगानें स्वामीची कुलपरंपरा दिग्गजाच्या मदरेखेप्रमाणें अविछिन्न आणि पृथ्वीचा राज्यभार वाहण्यास योग्य होईल. असें प्रधानाचें भाषण ऐकून राजानें आपल्या हातानें त्याचा हात धरून अंतर्गृहांत प्रवेश करून आपणास व प्रधानास जीं स्वप्नें पडलीं तीं आपली प्रिया जी विलासवती तिला सांगून आनंदित केलें. तदनंतर थोडक्याच दिवसांनीं जसें एखाद्या सरोवरांत चंद्रबिंब प्रविष्ट होतें तसा विलासवतीच्या उदरांत गर्भ प्रविष्ट झाला. आरसा जसा प्रतिबिंबाचें धारण करतो तसें गर्भाच्या मिषानें विलासवतीच्या उदरानें राजाच्या प्रतिबिंबाचें धारण केलें. तदनंतर पारिजात वृक्षानें जसें नंदनवन किंवा कौस्तुभमण्यानें जसें नारायणाचें वक्षस्थळ शोभतें तसा गर्भाच्या योगानें विलासवतीचा देह शोभूं लागला.

तदनंतर तो गर्भ हळू हळू वाढूं लागला असतां मेघमाळा जशी स-मुद्राचें उदक पिऊन जड्त्वामुळें आकाशांत मंदमंद संचार करिते तशी ती विलासवती गर्भभारानें मंदमंद संचार करूं लागली; व तिला वारंवार जांभया येऊं लागल्या; आणि तिचे नेत्र किंचित् वक्र झाले, आणि ति-च्या आंगांत आळस भरूं लागला, आणि ती वारंवार ओकाऱ्या देऊं लागली, व श्वास टाकूं लागली. अशी त्या राणीची अवस्था पाहून, व तिची खाण्यापिण्यावर रुचि नाहींशी झाली असें पाहून, आणि वर्षा-काळच्या पयोधरांचीं ( मेघांचीं ) मुखें जशीं कृष्णवर्ण होतात तशीं तिच्या पयोधरांचीं ( स्तनांचीं ) मुखें म्हणजे अग्रें कृष्णवर्ण झालीं असें पाहून, आणि तिचें शरीर गर्भाच्या योगानें केतकीपुष्पाप्रमाणें पांढरें झालें असें पाहून, परीक्षा करणारा जो तिचा कुशल सेवकजन त्यानें त्या चिन्हांवरून हिला गर्भ प्राप्त झाला असें जाणलें.

तदनंतर त्या राणीच्या सर्व सेवकमंडळींत मुख्य व सर्वदा राजमंदिरांत राहून चतुर झालेली, आणि सर्वकाळ राजसहवासानें प्रौढता पावलेली, व सर्व प्रकारचीं मंगलकृत्यें करण्याविषयीं कुशल, अशी जी कुलवर्धना नांवाची वृद्ध दासी तिनें एके उत्तम दिवशीं सायंकाळीं अंतर्गृहांतील स-भामंडपांत बसलेला, व ज्याच्या सभोंवतीं सुगंधि तेलाचे हजार दिवे ज-ळत आहेत त्यामुळें हजारों नक्षत्रांनीं युक्त पूर्ण चंद्राप्रमाणें किंवा शेषा-च्या हजार फणांवरील हजार मण्यांच्या कांतिमध्यें बसलेल्या नाराय-णाप्रमाणें शोभणारा, आणि ज्याच्या भोंवतीं हजारों मांडलिक राजे ब-सले आहेत, आणि ज्याच्या जवळ सेवकजन उभा राहिला आहे, आणि शुकनास प्रधानास जवळ बसवून त्याच्याशीं कांहीं विश्वासाच्या गुह्य-गोष्टी बोलत आहे, असा जो तारापीड राजा त्याच्या जवळ जाऊन आणि कानाशीं लागून त्यालाच ऐकूं जाण्याजोगा विलासवती राणी-चा गर्भवृत्तांत हळूच निवेदित केला.

त्या समयीं जें पूर्वी कधींच ऐकिलें नव्हतें, व ज्याची मनांत संभा-वनाही नव्हती, असें त्या कुलवर्धना नामक वृद्धदासीचें भाषण ऐकून राजास असें वाटलें कीं हिनें माझें सर्वांग अमृतरसानें सिक्त केलें. त्या-च्या शरीरावर रोमांच उभे राहिले. मुखांत हास्य येऊन मुख विक-

सित झाल्यामुळें राजाच्या ह्रदयांत भरून राहिलेला हर्षच काय दंतांच्या किरणसमुदायाच्या मिषानें बाहेर प्रसृत झाला, अशा प्रकारें तो राजा आनंदरसानें व्याप्त झाला. त्या क्षणींच ज्या नेत्रांतील बुबुळें चंचळ झालीं आहेत, व ज्यांच्या पापण्या आनंदाश्रूंनीं ओल्या झाल्या आहेत, अशा नेत्रांनीं त्या शुकनास प्रधानाच्या मुखाकडे राजानें पाहिलें. तेव्हां तो प्रधान आसनावरून उठून राजाच्या जवळ येऊन उभा राहिला. आणि पूर्वी कधींही झाला नव्हता असा मोठा हर्ष राजास झाला आहे असें पाहून, व त्या कुलवर्धना दासीचें मुखही हर्षानें किंचित् हास्ययुक्त झालें आहे असें पाहून, त्याच अर्थाचें मनांत चिंतन होत होतें म्हणून तो वृत्तांत जरी त्याला कळला नव्हता तरी त्याकाळीं योग्य असें दुसरें मोठ्या हर्षाचें कारण नाहीं असें समजून, आपण आपल्या मनांत तर्क करून हळूच विनयानें बोलूं लागला, महाराज, आपणास जें स्वप्न पडलें त्याचें फळ खरें झालें काय? कारण कीं त्या कुलवर्धनेचे नेत्र हर्षानें प्रफुल्लित दिसतात, व आपलेही नेत्र आनंदाचें वर्तमान ऐकण्याकरितां विस्तृत होतात, व आनंदाश्रूंनीं व्याप्त झालेले दिसतात. त्यांतलीं बुबुळेंही चंचळ झालीं आहेत, ह्यावरून कांहीं मोठ्या आनंदाची गोष्ट असावी असा माझा तर्क होतो. माझें मन त्या मोठ्या उत्सवाचें श्रवण करण्याविषयीं कौतुकानें उत्कंठित झालें आहे. ह्याजकरितां महाराजांनीं आनंदाचें कारण कोणतें तें सांगावें अशी माझी प्रार्थना आहे. असें त्या प्रधानाचें वचन ऐकून तो राजा किंचित् हांसून बोलूं लागला. ह्या कुलवर्धनेनें जें काय सांगितलें तें जर खरें असलें तर स्वप्नाचें फळ खरें व आनंदाचें कारणही खरें. परंतु मला तें खरें वाटत नाहीं, कारण, आमचें एवढें भाग्य कोठें आहे कीं असल्या प्रियवचनांच्या श्रवणास आम्हीं पात्र व्हावें. म्हणून ही कुलवर्धना जरी खरें बोलणारी आहे तरी आपणास अशा कल्याणाची असंभावना मानणारा मी हिचें वचन खोटें असें मानितों. तर ऊठ आपणच जाऊन हिचें वचन खरें किंवा कसें तें विलासवतीसच पुसूं म्हणजे काय तें समजेल. असें बोलून सर्व राजमंडळास निरोप देऊन तो राजा उठून उभा राहिला आणि त्यानें आपल्या आंगावरचे अलंकार काढून त्या कुलवर्धना दासीस दिले. तेव्हां राजानें आपणास प्रसाद दिला म्हणून तिनें आपलें

मस्तक भूमीस लावून राजास प्रणाम केला. तदनंतर अतिशयित हर्षानें भरलेल्या अंतःकरणानें गमनाविषयीं ज्यास त्वरा केली आहे, आणि नील कमळाचें अनुकरण करणारा जो दक्षिण नेत्र त्याच्या स्फुरणानें ज्यास आनंदित केलें आहे, असा तो राजा त्या काळीं आपल्या सेवेकरितां बरोबर घेण्यास योग्य असे कांहीं सेवकजन बरोबर घेऊन, ज्यांच्या ज्वाला वाऱ्यानें चंचल होत आहेत अशा आपल्या पुढें चालणाऱ्या मशालींच्या प्रकाशानें शुकनास प्रधानासहित अंतःपुरांत गेला. मग विलासवती राणीचें जें निवासगृह होतें त्या निवासगृहांत शिरला. तेथें पाहतो तों गर्भरक्षणास योग्य अशा पदार्थांची चांगली सिद्धता चतुर सेवकांनीं करून ठेविली आहे; व नवा चुना देऊन भिंती शुभ्र केल्या आहेत; त्या भिंतींवर मंगल सूचक चित्रें काढिलीं आहेत; जागजागीं मंगल प्रदीप प्रज्वलित केलेले आहेत, व द्वाराच्या दोहों बाजूंस जलपूर्ण स्वर्णकलशांची स्थापना केली आहे; वर पांढरा स्वच्छ चांदवा बांधून त्याला मोत्यांची झालर लाविली आहे, आणि भोंवतालीं मणिमय दीप ठेविले आहेत त्यामुळें उष्णता नसून अंधकाराचें निवारण होत आहे. अशा प्रकारच्या निवासगृहामध्यें मध्यभागीं एक मोठा उत्तम प्रकारचा मंच ठेविला आहे, ज्याच्या भोंवतीं रंगवल्ली काढल्या आहेत, उशाकडे रत्नमय जलपूर्ण कलश ठेविले आहेत. व ज्याच्या खुरांस औषधींचीं मूळें व भूर्जपत्रें व मंतरलेले दोरे बांधले आहेत, व भोंवतालीं बाळंत विडाचे टाहळे लावले आहेत, व ज्याचे खूर उंच उखळ्यांवर ठेवले आहेत, व ज्यावर चंद्रकांतीसारखी स्वच्छ पांढरी चादर घातली आहे, असा जो पर्वताच्या शिलातळा प्रमाणें विस्तीर्ण व गर्भिणीस निद्रा करण्यास योग्य हस्तिदंताचा मंचक, त्यावर जी निजली आहे; व भोंवतालीं दासींची मंडळी सेवातत्पर उभी आहे. व ज्याच्या दशा गोरोचनानें रंगविल्या आहेत, अशीं नवीन पांढरीं वस्त्रें जिणें अंगावर घेतलीं आहेत, अशी राणी विलासवती राजानें दुरून पाहिली.

तदनंतर राजा आला असें सेवकांनीं सांगतांच पलंगावरून विलासवती उठावयास लागली; तों तिचा सेवकजन मोठ्या त्वरेनें पुढें सरून तिला हात देऊं लागला, व ती आपला डावा हात गुडघ्यावर ठेवून व उजवा हात दासीच्या खांद्यावर ठेवून उठूं लागली. इतक्यांत राजा

पुढें होऊन बोलला कीं, हे प्रिये, इतका आदर कशास पाहिजे? पुरे पुरे, असें बोलून झटकर तिच्या सहवर्तमान त्याच मंचकावर बसला, आणि शुकनास प्रधानही जवळच दुसरा एक मंच सोनेरी रंगाचा होता त्यावर बसला.

तदनंतर तो राजा त्या सर्व लक्षणांवरून आपली स्त्री विलासवती गर्भिणी आहे असें अनुमान करून अतिशयित हर्षित अंतःकरणानें युक्त होत्साता तिची थट्टा करूं लागला कीं, हे प्रिये, हा शुकनास विचारतो कीं, कुलवर्धनेनें येऊन जें सांगितलें तें तसेंच आहे ना? असें राजाचें भाषण ऐकून ती विलासवती त्यावेळेस किंचित् अस्पष्ट हास्य करून खालीं मुख करून बसली. मग राजा पुनः पुनः तेंच विचारूं लागला असतां ती बोलली कीं, मला उगीच वारंवार अत्यंत लज्जित करणें हें काय! मी कांहींच जाणत नाहीं. असें बोलून खालीं मुख घालून मोठ्या अनुकंपेनेंच काय राजाकडे पाहूं लागली. तेव्हां राजा किंचित् हास्य करून पुनः तिच्याशीं बोलूं लागला, हे प्रिये, जर माझ्या भाषणानें तुला लज्जा प्राप्त होते, तर मी हा उगाच बसतों. पण जो तुझ्या शरीराचा रंग पूर्वी इतका पिवळट होता कीं, शरीरास लावलेलें केशर वासानें मात्र समजत असे, तो रंग सांप्रत पांढऱ्या चांफ्याच्या पुष्पाप्रमाणें पांढुरका झाला आहे, त्याचा प्रतिबंध कसा करशील? आणि ज्या स्तनांचीं अग्रें कृष्णवर्ण झालीं आहेत त्यामुळें मुखांत नील कमळें धरणारे चक्रवाक पक्षीच काय, किंवा ज्यांच्या मुखांवर तमाल वृक्षाचे पल्लव ठेविले आहेत असे सुवर्ण कलशच काय, अशा प्रकारच्या स्तनांचें गोपन कसें करशील? आणि ज्या मध्यभागाची कांती प्रतिदिवशीं अधिक अधिक पुष्ट होत चालली आहे, व ज्यानें कृशता टाकल्यामुळें त्रिवळीच्या रेषा बुजत चालल्या आहेत, अशा मध्यभागाचा प्रतिबंध कसा करशील? अशा प्रकारचें राजाचें भाषण ऐकून विलासवती फारच लज्जित झाली. असें पाहून तो शुकनास प्रधान गालीं गालीं हांसून बोलला कीं, महाराज, कां उगीच देवीस आयास देतां? ही देवी आपल्या या भाषणानें फार लज्जित होत आहे. तर कुलवर्धनेनें सांगितलेल्या गोष्टीच्या संबंधाचें भाषण आतां पुरे करावें. अशा प्रकारच्या गोष्टी बोलत कांहीं वेळ तेथें राहून मग तो शुकनास प्रधान उ-

ढून आपल्या घरास गेला. तदनंतर राजानें त्याच निवासगृहामध्यें त्या विलासवती राणी सहवर्तमान रात्र घालविली.

पुढें त्या विलासवतीस जे जे डोहळे झाले ते ते त्या राजानें परिपूर्ण केले. तेणेंकरून ती अत्यंत आनंदयुक्त झाली. मग नवमास पूर्ण भरल्यावर एका उत्तम दिवशीं, तिची प्रसूति होण्याची वेळ जवळ आली असतां, ज्योतिषी मंडळीनें घटका घालून व छाया, पाहून सूक्ष्मकाळ साधून लग्नाचा निश्चय केला. अशासमयीं उत्तम ग्रहयोग आले असतां जसा मेघमालेपासून विद्युद्रूप अग्नि उत्पन्न होतो तसा त्या विलासवतीपासून सर्व लोकांच्या चित्तास आनंद देणारा पुत्र उत्पन्न झाला.

त्यावेळेस राजवाड्यांतील सर्व सेवकजन इकडे तिकडे धांवूं लागला. त्यामुळें वाड्यांतली भूमि हालल्याप्रमाणें झाली. सर्व नगरांतही मोठी उत्साहाची धूम चालली. हजारों चोपदार पुत्रोत्सवाचें वर्तमान राजास कळविण्यासाठीं मोठ्या त्वरेनें निघाले. ज्याच्या त्याच्या मनांत मी अगोदर कळवून इनाम मिळवीन. तेव्हां ते वाटेंत अडखळून पडूं लागले; व लोकांची दाटी झाल्यामुळें अंतःपुरांत निरंतर वागणारे कुबडे, खुजे, किरात, ते चेंगरून गेले; व स्त्रिया पूर्ण पात्रें हातांत घेऊन इकडे तिकडे फिरूं लागल्या, तेव्हां त्यांच्या भूषणांचा मोठा मनोहर शब्द झाला, व त्यांचीं वस्त्रें भूषणें भुईवर लोळूं लागलीं. अशा प्रकारचा मोठा उत्सव चालल्यामुळें तें सर्व नगर आणि विशेषेंकरून राजगृह दणाणून गेलें.

तदनंतर मंदरपर्वतानें मथित केलेल्या समुद्राच्या ध्वनीसारखा गंभीर असा दुंदुभींचा ध्वनि होऊं लागला. आणि राजवाड्यांत मृदंग, शंख, काहली, नगारे, कर्णे, तुताऱ्या इत्यादि वाद्यांचा अतिशयित मोठा ध्वनि होऊं लागला; व मंगळकारक वाद्यांचा उत्तम प्रकारें गजर होऊं लागला. व हजारों लोकांचा कलकल शब्द झाला. अशा प्रकारें झालेले उत्सवासंबंधी ध्वनि ऐकून थोरांपासून लहानापर्यंत सर्व प्रजा अत्यंत हर्षित होऊन उन्मत्तासारख्या नृत्य करूं लागल्या. आणि चंद्रोदयानें जसा समुद्र वाढतो तसा राजपुत्राच्या जन्मानें कलकलशब्दयुक्त महोत्सव वाढला.

तदनंतर तो राजा पुत्र झाल्याचें वर्तमान सांगणाऱ्यांस यथायोग्य

विपुल धनें वस्त्रें देऊन पुत्रमुखदर्शनाविषयीं उत्कंठित असतांही त्याचवे-ळेस गेला नाहीं. कारण कीं पुत्राचें मुख उत्तम मुहुर्तावर पहावें असें आहे, म्हणून ज्योतिष्यांनीं सांगितलेल्या उत्तम मुहूर्तावर निघून सर्व सेवकजनांचें निवारण करून शुकनास प्रधानास बरोबर घेऊन ज्या निवासगृहांत विलासवती प्रसूत झाली होती त्या गृहांत गेला. पाहिलें तों द्वाराच्या दोहोंभागीं दोन रत्नखचित मंगलकलश जलपूर्ण करून ठेविले आहेत. गंधें, पुष्पें, फळें, पल्लव, दूर्वा इत्यादि मंगल पदार्थांनीं तें गृह सुशोभित केलें आहे. आणि अनेक ठिकाणीं मंगलदीप ठेविले आहेत. वृद्ध वृद्ध स्त्रिया सूतिकेच्या भोंवतालीं बसल्या आहेत. एकीकडे चौरंगावर षष्ठीदेवीची व कार्तिकस्वामीची व जीवंतिकादेवीची स्थापना केली आहे. शांतिपाठ म्हणणारे ब्राह्मण मंत्रित उदक शिंपडीत आहेत. वृद्धवृद्ध स्त्रिया एकत्र जमून बाळंतिणीच्या उद्देशानें मंगलगीतें गात आहेत. एकीकडे पुण्याहवाचनाची सिद्धता करून ठेविली आहे. आणि बालकाच्या रक्षणार्थ बलिप्रदानें ठेविलीं आहेत. एकीकडे विष्णुसहस्रनामाचे पाठ चालले आहेत. बाहेरच्या आंगास नग्नशस्त्रधारी रक्षक पुरुष उभे आहेत.

अशा गृहांत प्रवेश करून राजानें चित्तास आल्हाद देणारा असा आपला पुत्र पाहिला. तो त्यासमयीं विलासवतीनें आपल्या मांडीवर घेतलेला होता. त्या बालकाच्या अंगकांतीनें दीपांची प्रभा नष्ट केली. त्या बालकाच्या आंगावर गर्भसंबंधी रक्तिमा होता, त्यामुळें सकाळच्या बालभानूसारखा किंवा संध्याकाळच्या पूर्णचंद्रासारखा किंवा पृथ्वीच्या दर्शनार्थ अवतरलेल्या मंगल ग्रहासारखा शोभत होता. त्याचीं अंगें कल्पवृक्षाच्या कोमल पल्लवांनीं किंवा फुललेल्या आरक्त कमल पुष्पांनीं किंवा पोंवळ्यांच्या किसलय खंडांनीं किंवा बालोष्णाच्या भागांनीं किंवा माणकांच्या किरणांनीं निर्मिलीं आहेत काय असें वाटण्याजोगीं आरक्तवर्ण होतीं. आणि जन्मतः उत्पन्न झालेलीं भूषणेंच काय असें वाटण्याजोगीं शोभायमान जीं महापुरुष लक्षणें तीं त्या बालकाच्या आंगीं होतीं. आणि कांहीं दिवसांनीं हा आपला पति होणार म्हणून आनंदित झालेल्या राज्यलक्ष्मीनें ज्याला आलिंगन दिलें आहे काय असा देदीप्यमान दिसत होता. अशा प्रकारचा पुत्र पाहून आपणास बहुत

दिवसांनीं व बहुत प्रयत्नांनीं पुत्र लाभ झाला म्हणून आनंदभरित होत्सा ता राजा एकसारखी टक लावून त्या पुत्राकडे पाहूं लागला. तेव्हां राजाचे नेत्र स्तब्ध झाले व आनंदाश्रूंनीं भरून गेले. तेव्हां असें वाटलें कीं हा राजा नेत्र विकसित करून त्यांनीं पुत्रमुखाचें प्राशनच करीत आहे काय, किंवा त्याला स्पर्शच करीत आहे काय? अशा प्रकारें तो राजा पुत्रमुख पाहून पराकाष्ठेचा आनंद पावला, आणि त्यानें आपणास कृतकृत्य असें मानिलें.

तदनंतर शुकनास प्रधानही आपले मनोरथ पूर्ण झाले म्हणून आनंदित होत्साता सावकाशपणें त्या बालकाचीं अंगें प्रत्यंगें न्याहाळून पाहून आनंदानें राजाशीं बोलूं लागला, कीं, महाराज, हा बालक गर्भांत राहून पीडित झाल्यामुळें ह्याच्या अंगांची शोभा जरी स्पष्ट दिसत नाहीं तरी जीं चिन्हें सार्वभौम राजास असावीं तीं सर्व ह्याच्या अंगावर दिसत आहेत, तेणेंकरून ह्याचें माहात्म्य प्रकट झालें आहे. पहा, ह्याच्या चंद्रकलेसारख्या वक्राकृति ललाटावर भिवयांच्या मध्यभागीं बारीक लवेचा भोंवरा आहे. ह्याचे नेत्र शुभ्र कमलासारखे सुशोभित असून कर्णापर्यंत विस्तृत आहेत. ह्याच्या मुखाचा सुवास प्रफुल्लित कमलासारखा येत आहे. ह्याची नासिका चांपेकळीसारखी सरळ असून दीर्घ आहे. ह्याचा अधरोष्ठ आरक्त कमलासारखा लाल आहे. ह्याचे हस्तही आरक्तवर्ण असून विष्णूच्या हस्तांप्रमाणें शंख चक्रांकित आहेत. ह्याचे बाहू सरळ असून जानुपर्यंत लांब आहेत. ह्याचे पाय कोमल पल्लवा सारखे मृदु असून त्यांजवर ध्वज, रथ, अश्व, छत्र, व कमल ह्यांचीं रेखारूप चिन्हें आहेत, तेणेंकरून हे पाय सर्व राजांस वंद्य आहेत. आणि ह्याच्या रोदनाचा स्वरही दुंदुभीच्या नादाप्रमाणें गंभीर ऐकूं येत आहे.

असें प्रधान राजाशीं बोलत आहे तोंच द्वारांत उभे राहिलेल्या लोकांनीं ज्यास सत्वर वाट करून दिली असा, व ज्याचें शरीर हर्षानें रोमांचित झालें आहे, मुख प्रसन्न दिसत आहे, व नेत्र प्रफुल्लित झाले आहेत, असा, मंगलक ह्या नांवाचा पुरुष, तेथें मोठ्या त्वरेनें आला, त्यानें राजास प्रणाम करून विनंती केली कीं, महाराज, आपली मोठी वृद्धि होत आहे, आपले शत्रु नष्ट झाले, आपण ह्या पृथ्वीवर चिरकाल राहावें, सर्व पृथ्वीवर आपला जय असो. आपल्या प्रसादानें सर्वांस पूज्य

आणि आपणास प्रिय जो शुकनास प्रधान त्याच्या मनोरमा नामक ज्येष्ठ पत्नीस रेणुकेला जसा परशुराम तसा पुत्र झाला. ही मोठ्या आनंदाची गोष्ट महाराजांस कळविली आहे.

तदनंतर तो राजा त्या पुरुषाचें अमृततुल्य मधुर वचन ऐकून आनंदानें प्रफुल्लित नेत्र होऊन बोलूं लागला कीं, कायहो ह्या कल्याणांच्या परंपरा! विपत्तीमागें विपत्ति आणि संपत्तीमागें संपत्तिच येतात अशी जी थोरांची म्हण आहे ती खरी आहे. असें बोलून शुकनास प्रधानाकडे वळून बोलला कीं, तूं जसा माझ्याशीं समान सुखदुःखें धरितोस तसें दैवही धरीत आहे, आणि तूं जसा माझ्याशीं अनुकूल वर्ततोस तसें दैवही अनुकूल वर्तत आहे. असें बोलून त्या राजानें मोठ्या प्रीतीनें व हर्षानें प्रधानास आलिंगून श्रद्धेनें त्याच्या आंगावरचा शेला देणगी म्हणून ओढून घेतला. आणि त्या पुरुषास प्रियवचन ऐकिल्याबद्दल पुष्कळ देणगी देण्याविषयीं आज्ञा केली.

तदनंतर तो राजा तेथून उठून लागलाच शुकनास प्रधानाच्या वाड्यांत जावयास निघाला. आणि प्रधानासही आपल्या बरोबरच घेतलें. तेव्हां राजाच्या पाठीसागून अंतःपुरांतील पुष्कळ स्त्रियाही तिकडे जावयास निघाल्या. त्यांची मार्गात इतकी दाटी झाली कीं एकमेकींचे अलंकार एकमेकींच्या अलंकारांस आपटून खणखण शब्द होऊं लागले. आणि अलंकारांचीं टोकें लागून एकमेकींचीं वस्त्रें फाटलीं, व श्रमानें घर्म आल्यामुळें बारीक वस्त्रें आंगास चिकटून गेलीं, आणि कर्णावरील पल्लव व मस्तकावरील पुष्पगुच्छ गळून खालीं पडले. त्या स्त्रियांच्या मागून वेश्यांगनाही हांसत, खेळत, नाचत, चालल्या. त्यांच्या मागें विकलांग, मुके, कुबडे, खुजे, किरात, बहिरे, जड, असे लोक नाचत चालले. कितीएक सेवकजन ही लगबगीनें चालले. कितीएक वृद्ध चोबदार हातांत काठ्या घेऊन अडखळत चालले. कितीएक वीणा मृदंगादि वाद्यें घेऊन वाजवीत चालले. कितीएक मनोरंजन करणारे लोक, कितीएक स्तुतिपाठ करणारे लोक, कितीएक गाणारे, कितीएक हावभाव करणारे, असे बहुत प्रकारचे लोक राजाबरोबर निघाले.

अशा थाटानें तो राजा शुकनास प्रधानाच्या वाड्यांत गेल्यावर तेथें त्यानें आपल्या राजवाड्यांतील उत्सवापेक्षां दुप्पट उत्साह करविला.

इकडे राजानें आपल्या वाड्यांत सहावे दिवशीं मोठ्या समारंभाचा षष्ठीजागर करून दहावे दिवशीं ब्राह्मणांस कोटिशः गाई व सुवर्ण ह्यांचीं दानें दिलीं. आणि विलासवती राणीच्या मुखांत परिपूर्ण मंडल असा चंद्र प्रविष्ट झाला असें जें पूर्वीं स्वप्न पाहिलें होतें त्या स्वप्नास अनुकूल असें चंद्रापीड हें नाम पुत्रास ठेविलें. दुसऱ्या दिवशीं शुकनास प्रधानानें हा आपल्या पुत्राचे संस्कार करून राजाच्या संमतीनें ब्राह्मण जातीस योग्य असें वैशंपायन हें नांव ठेविलें. तदनंतर क्रमें करून चौल्यादि संस्कार होऊन त्या चंद्रापीडाचें शिशुत्व अतिक्रांत झालें.

तदनंतर त्या तारापीड राजानें आपल्या मुलाचें चित्त खेळाकडे न लागावें म्हणून नगराबाहेर शिप्रा नदीच्या कांठीं अर्धकोस लांबीचें देवालयाच्या आकाराचें एक सुशोभित विद्यामंदिर करविलें. त्याच्या सभोंवतीं पर्वताप्रमाणें उंच चुनेगच्ची कोट बांधविला. आणि त्याच्या बाहेर मोठा खंदक खणविला. त्या कोटास अतिशयित दृढ असे पुष्कळ दरवाजे करवून त्यांतील एक दरवाजा मात्र नेहमीं चालू ठेवावा अशी आज्ञा केली. त्या विद्यामंदिराच्या एका आंगास अश्वशाळा बांधविली, आणि दुसऱ्या आंगास व्यायामशाळा ( तालीमखाना ) करविली. अशा प्रकारचें विद्यामंदिर करवून सर्व विद्यांचे शिक्षक मोठ्या प्रयत्नानें मिळविले.

तदनंतर जसा सिंहाचा छावा सांपळ्यांत घालावा तसा वैशंपायनासहित चंद्रापीड पुत्र राजानें त्या विद्यामंदिरांत नेऊन ठेविला, आणि त्याचा बाहेर जाण्याचा प्रतिबंध करून संपूर्ण विद्या, कला, ह्यांचा अभ्यास करण्यासाठीं उत्तम दिवशीं त्या गुरूंच्या स्वाधीन केला. त्या वेळेस त्याचें सहा वर्षांचें वय होतें. त्याच्या संगतीस प्रायशः त्या गुरूंचे पुत्र ठेविले होते, आणि त्याचा बालक्रीडेचा प्रसंग अगदीं नाहींसा करून त्याचें मन विद्येकडेसच लागावें असा बंदोबस्त केला होता. अशा प्रकारच्या बंदोबस्तानें पुत्र विद्यामंदिरांत ठेवल्यावर राजा तारापीड विलासवतीसहित थोडासा सेवकजन बरोबर घेऊन प्रति दिवशीं तेथें जाऊन त्याचें अवलोकन करीत असे.

अशा प्रकारेंकरून राजानें विद्यामंदिरांत प्रतिबंध करून ठेवलेला चंद्रापीड वैशंपायनासहवर्तमान विद्याभ्यास करूं लागला. त्यांची बु-

द्धि व त्यांची धारणाशक्ति पाहून गुरूंस फार आनंद वाटे. ते मनांत म्हणत कीं आपलें कौशल्य प्रकट करणारे उत्तम पात्रभूत शिष्य आपणास मिळाले आहेत. म्हणून ते गुरु त्यांस मोठ्या उत्साहानें शिकवीत असत. चंद्रापीडानें आपलें चित्त दुसऱ्या विषयाकडे न जाऊं देतां अल्पकालांतच सकल विद्यांचें व सकल कलांचें ग्रहण केलें. निर्मळ आरशांत जसे सर्व पदार्थ प्रतिबिंबित होतात त्याप्रमाणें चंद्रापीडाच्या निर्मळ अंतःकरणामध्यें सर्व विद्या कला प्रतिबिंबित झाल्या. आणि त्या चंद्रापीडाच्या आंगीं सर्वलोकांस आश्चर्यकारक असें भीमसेनाप्रमाणें आजन्मसिद्ध बलाढ्यत्व होतें तें तो कसरत करीत असतां बाळपणांतच प्रकट झालें. तो चंद्रापीड बाळपणीं सहज खेळतां खेळतां हत्तीच्या छाव्याचे कान धरून त्यास खालीं वांकवीत असे. तेव्हां सिंहाच्या पिलानें आक्रमिल्याप्रमाणें त्या हत्तीस हालावयाचेंही सामर्थ्य राहत नसे. तो चंद्रापीड तरवारीच्या एका घावानेंच कमळाच्या देंठाप्रमाणें तालवृक्षाचे दोन तुकडे करी. क्षत्रियकुलहंता जो परशुराम त्याच्या बाणाप्रमाणें त्या चंद्रापीडाचे बाण पर्वतांचीं शिलातलें फोडीत असत. आणि तो दहा पुरुषांनीं उचलावयाजोगी मोठी पहार घेऊन कसरत करीत असे. त्याचा सोबती वैशंपायनही एका बलाढ्यत्व गुणावांचून बाकीच्या सर्व विद्या कला ह्यांनीं चंद्रापीडाप्रमाणें निपुण झाला होता. त्यामुळें, व शुकनास प्रधानाच्या गौरवामुळें, व एकेठायीं अभ्यास केल्यामुळें, व बरोबर वाढल्यामुळें, त्या चंद्रापीडाचें दुसरें अंतःकरणच काय असा तो वैशंपायन चंद्रापीडाचें परम विश्वासपात्रभूत मित्र झाल्यामुळें त्या चंद्रापीडास वैशंपायनावांचून क्षणभरही राहवत नसे आणि वैशंपायनही सूर्यास सोडून जसा दिवस राहत नाहीं तसा त्या चंद्रापीडास सोडून क्षणमात्रही निराळा राहत नसे.

अशा प्रकारें तो चंद्रापीड विद्याभ्यास करीत असतां त्यास तारुण्य प्राप्त झालें. तेव्हां अमृताच्या योगानें जसा क्षीरसागर किंवा चंद्राच्या योगानें जसा प्रदोषकाळ किंवा इंद्रधनुष्याच्या योगानें जसा वर्षाकाळ किंवा पुष्पांच्या योगानें जसा कल्पवृक्ष किंवा बालभानूच्या योगानें जसा कमलसमूह किंवा चित्रविचित्र वर्णांच्या पिसाऱ्यांच्या योगानें जसा मयूर शोभतो तसा तो तारुण्याच्या योगानें अधिक सुंदर दिसूं लागला.

तारुण्याचीं जीं जीं लक्षणें तीं तीं सर्व त्याच्या शरीरीं प्रकट झालीं. त्याच्या शरीरावर दिव्यकांति उत्पन्न झाली. अवसर पाहून सेवकजन जसा धन्याजवळ जातो तसा तारुण्याचा अवसर पाहून मदनही त्याशरीरांत प्रविष्ट झाला.

अशा प्रकारें क्रमेंकरून चंद्रापीडाचें यौवन प्रादुर्भावास आलें, व त्याचा संपूर्ण कलांचा अभ्यास समाप्तीस गेला, व सर्व विद्यांचें अध्ययन पूर्णतेस पावलें, व विद्यामंदिरांतून राजमंदिरांत जाण्याविषयीं गुरूचेंही अनुमोदन झालें, असें जाणून तारापीडराजानें त्यास आणावयासाठीं बलाहक नांवाचा सेनापति बरोबर सैन्य देऊन उत्तम दिवशीं विद्यामंदिरास पाठविला. तो सेनापति राजाज्ञेवरून विद्यामंदिरास गेला. तथ गेल्यावर द्वारपालांनीं सेनापति आला आहे असें चंद्रापीडास कळविल्यावर आंत प्रवेश करून भूमीस मस्तक लावून चंद्रापीडास प्रणाम करून त्यानें बसा म्हटल्यावर त्याच्या जवळ विनयानें योग्य आसनावर बसला तदनंतर तो सेनापति क्षणभर तसाच बसून मग चंद्रापीडापुढें थोडासा सरून विनयानें त्यास विज्ञापना करूं लागला. हे राजकुमरा, महाराजांनीं अशी आज्ञा केली आहे कीं, आमचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले. कांकीं, तूं सर्व विद्यांचें अध्ययन करून संपूर्णकलाही शिकलास व सर्व प्रकारच्या आयुधविद्येंत उत्तम प्रकारची प्रतिष्ठा पावलास. अशा प्रकारें तुझा अभ्यास पूर्ण झाल्यामुळें सर्व गुरूंनीं तुला विद्यामंदिरांतून निघून नगरांत येण्याविषयीं अनुमोदन दिलें आहे. तर नगरांतील सर्व लोक विद्याकलापरिपूर्ण अशा प्रकारच्या तुला, शिक्षित करून बंधनांतून सोडलेल्या हत्तीच्या छाव्याप्रमाणें, आणि सर्व कलांनीं परिपूर्ण होऊन उदयास आलेल्या चंद्राप्रमाणें, पाहून आनंद पावोत. अंतःपुरांतील सर्व स्त्रिया तुला पाहण्याविषयीं फार उत्कंठित झाल्या आहेत. तूं वयाच्या सहावे वर्षाच्या अंतीं विद्यामंदिरांत गेलास त्यास दहा वर्षें गलीं, तेव्हां प्रस्तुत तुझ्या वयास सोळावें वर्ष चाललें आहे. तर तूं आजपासून विद्यामंदिरांतून बाहेर निघून आपल्या दर्शनाविषयीं उत्कंठित झालेल्या अशा आपल्या सर्व मातांस दर्शन देऊन, व वडिलांस नमस्कार करून, प्रतिबंध रहित होऊन, राज्यसुखाचा यथेच्छ अनुभव घ्यावा; नव यौवनास योग्य असे विलास भोगावे; राजे लोकांचा सन्मान क-

रावा, ब्राह्मणांची पूजा करावी; प्रजांचें परिपालन करावें; आणि बंधुवर्गास आनंद द्यावा. तुझ्याकरितां महाराजांनीं त्रिभुवनांतलें एक रत्न व गरुड, पवन, ह्यांचा वेग धरणारा असा इंद्रायुधनामक अश्व पाठविला आहे. तो द्वाराबाहेर उभा आहे. हा अश्व महाराजांस पारसीक देशच्या राजानें मोठ्या प्रीतीनें दिलेला आहे. त्याला पाहून अश्वलक्षणज्ञ पुरुष असें बोलले कीं, उच्चैःश्रवानामक इंद्राच्या अश्वाचीं जीं लक्षणें तीं सर्व ह्या अश्वावर दिसत आहेत. ह्या सारखा अश्व भूमंडळावर पूर्वी कधीं झाला नाहीं व पुढेंही कधीं व्हावयाचा नाहीं. तर ह्या घोड्यावर बसून चलावें. आणि विनयसंपन्न, शूर, विद्वान, कलावान्, कुलक्रमागत असे हजारों राजपुत्र आपल्या सेवेसाठीं महाराजांनीं पाठविले आहेत ते घोड्यावर बसून आपणास प्रणाम करण्याविषयीं सतृष्ण होत्साते वाट पाहत बाहेर उभे आहेत, त्यांस दर्शन द्यावें. अशी विनंती करून तो सेनापति उगाच बसला.

तदनंतर तो चंद्रापीड आपल्या पित्याची आज्ञा शिरसामान्य करून त्या विद्यामंदिरापासून निघावें असें मनांत आणून गंभीर वाणीनें बोलला कीं, तें अद्भुत अश्वरत्न आंत आणावें. अशी त्याची आज्ञा होतांच सेनापतीनें बाहेर जाऊन तो इंद्रायुध अश्व आंत आणिला. तो असा होता कीं, लगामाच्या सोन्याच्या कड्यांस रेशमी काढण्या लावून दोन दोन पुरुषांनीं दोहों बाजूंस ओढून धरला आहे. त्याची उंची इतकी होती कीं, उंच पुरुषानें आपला हात वर उंच उचलिला तर कदाचित् त्याच्या पाठीस पोंहचेल. गर्विष्ठाप्रमाणें तो मानेचा आंकडा वळवून ठुमकत चालत आहे; आणि विद्यामंदिर भरून टाकणाऱ्या कठोर किंकाळण्यानें ज्याचें उदर कंपित होत आहे; आणि वेगाचा प्रतिबंध केल्यामुळें रोष येऊन ज्याचीं नासापुटें उच्चनीच व घुरघुर शब्दानें भयंकर दिसत आहेत. ज्याच्या अंगांत चपलता आणि वेग इतके दिसत आहेत कीं मोकळा सोडला तर त्रिभुवनाचें ही उल्लंघन करील कीं काय. ज्याचें शरीर इंद्र धनुष्याप्रमाणें अनेक रंगांनीं विचित्र वर्ण होतें; म्हणून ज्याच्या पाठीवर चित्रविचित्र रंगाचा गाशा घातला आहे अशा हत्तीच्या छाव्या प्रमाणें, किंवा गैरिकादि धातूंनीं विचित्र वर्ण झालेल्या शिवाच्या नंदीप्रमाणें, किंवा दैत्यांच्या रक्तानें भरलेल्या देवीच्या सिं-

हाप्रमाणें, दिसत असे. ज्याचे ओष्ठपुट वारंवार चंचल होत आहेत, आणि लगामाच्या चवळण्यानें ज्याच्या मुखांतून लाळेचा फेंस खालीं पडत आहे. ज्याचें मुख दीर्घ असून निर्मांस होतें, त्यामुळें कोरून सिद्ध केल्याप्रमाणें सुंदर दिसत असे, ज्याचे कान सतत उभे असून वर-चेवर हालत होते, ज्याच्या गळ्यांत सोन्याच्या सुतानें गुंफलेले रत्नांचे व मोत्यांचे हार घातले होते. ज्याच्या मानेवरचे केस लाक्षारसानें रंगविले होते. गळ्यांतील पाचेच्या हाराची हिरवी कांति सर्वांगावर पडल्यामुळें हा सूर्याच्या रथाचा अश्वच आकाशांतून खालीं उतरला आहे काय असें वाटे. इंद्रनील मण्यासारखे काळे व कठिण जे खुर ते जो वारंवार भूमीवर आपटीत आहे, गुडघ्यापासून खालीं ज्याचे पाय कोरून केल्यासारखे सडसडीत होते, गुडघ्याच्यावर मानेपर्यंत ज्याचें अंग पुष्ट मांसल असून गुळगुळीत साफ होतें, ज्याचें उरःस्थ-ळ विस्तृत आणि मान भरलेली होती, व दोन्ही पार्श्वभाग वर्तुळा-कृति होते, अशा प्रकारचा अति सुंदर व तेजस्वी अश्व चंद्रापीडानें पाहिला.

तदनंतर तो चंद्रापीड नामक राजपुत्र जरी स्वभावानें अतिगंभीर होता तरी त्या अश्वाला पाहून त्याच्या अंतःकरणामध्यें मोठें आश्चर्य उत्पन्न झालें. कारण कीं, त्या अश्वासारखा अश्व त्याच्या कधींच दृष्टीस पडला नव्हता. त्या अश्वाचा आकार दिव्यलोकीं राहण्यास यो ग्य होता. अश्वजातीस जीं लक्षणें उत्तम प्रकारचीं असावीं तीं सर्व त्यास होतीं. व त्याचें रूप सर्व उत्तम अश्वांच्या रूपांपेक्षांही अतिश-यित उत्तम होतें. तो अश्व पाहून चंद्रापीडाच्या मनांत असें आलें कीं, पूर्वी देव दैत्यांनीं समुद्राचें मंथन करून हें रत्न न काढितां दुसरीं कोण-तीं रत्नें अधिक काढिलीं? मेरुपर्वताच्या शिलातलाप्रमाणें विशाल जें ह्या अश्वाचें पृष्ठ त्याजवर आरोहण न करितां इंद्रानें त्रैलोक्य राज्याचें फल तरी कोणतें मिळविलें? हीच गोष्ट खरी कीं, उच्चैःश्रवानामक अश्व जो समुद्रांतून निघाला त्याला पाहूनच इंद्रास आश्चर्य वाटलें असें पाहून समुद्रानें अश्वाविषयीं इंद्रास ठकविलें. आणखी तो चंद्रापीड मनांत म्हणाला कीं, हा अश्व अजून नारायणाच्या दृष्टीस पडला नाहीं म्हणून-च तो [illegible] सोडीत नाहीं. आपली ही भोळ्या

आश्चर्याची गोष्ट आहे कीं सकल त्रिभुवनांत दुर्लभ अशीं ह्या अश्वासारखीं रत्नें माझ्या पित्याच्या संग्रहीं आहेत. तस्मात् माझ्या पित्याची राज्यलक्ष्मी देवेंद्राच्या संपदेपेक्षांही अतिशयित मोठी आहे. आणखी मला असें वाटतें कीं, हा अश्व मोठा तेजस्वी आणि बळिष्ठ आहे ह्यावरून ह्या अश्वाची आकृति देवतांनीं अधिष्ठित आहे. म्हणून ह्या अश्वावर आरोहण करण्याविषयीं मोठी शंका उत्पन्न होते. सामान्य अश्वाची आकृति अशा प्रकारची नसते. असेंही ऐकण्यांत आहे कीं देवताही ऋषीच्या शापानें आपलीं शरीरें सोडून दुसऱ्या शरीरांत प्रवेश करून राहतात. तसा हा अश्व निःसंशय कोणीतरी महात्मा असून कोणाच्या तरी शापानें ही दशा पावला आहे. अशी ह्याचा दिव्यपणा पाहून मनाची खातरी होते.

असा विचार करीत करीत तो राजपुत्र त्या अश्वावर आरोहण करण्याच्या इच्छेनें आसनावरून उठला, आणि आपल्या अंतःकरणांत त्या अश्वाचें चिंतन करून त्यास म्हणतो कीं, तूं कोण असशील तो ऐस, तुला नमस्कार असो. मी तुजवर आरोहण करतों. ही जी मजकडून तुझी अमर्यादा होईल तिची क्षमा कर. असें तो मनांत बोलला, तोंच तो इंद्रायुध नामक अश्व चंद्रापीडाचा अभिप्राय जाणून चंचलनेत्रांनीं चंद्रापीडाकडे पाहून खुरांनीं वारंवार भूतळास ताडण करूं लागला, आणि स्फुरण पावणाऱ्या नासापुटांच्या रंध्रांतून निघालेल्या घरघरध्वनीनें युक्त असा मधुर व कोमळ हिंसण्याचा शब्द करूं लागला, तेव्हां तशा शब्दानें आपणावर आरोहण करण्याची अश्वानें अनुज्ञा दिलीच काय असें जाणून त्या चंद्रापीडानें त्या इंद्रायुध नामक अश्वावर आरोहण केलें.

त्या अश्वावर आरोहण केल्यामुळें ज्यास त्रिभुवन ठेंगणें भासत आहे असा तो चंद्रापीड राजकुमार त्या विद्या मंदिरांतून बाहेर निघाला तों बाहेर उभें राहिलेलें अपरिमित सैन्य त्याच्या दृष्टीस पडलें. त्यांत अश्वसैन्यांतील सर्व अश्वांच्या खुरांचा शब्द व एकदांच हिंसण्याचा शब्द एवढा झाला कीं तेणेंकरून सर्व लोकांचे कर्ण बधिर झाले, आणि घोडेस्वारांनीं उंच केलेल्या भाल्यांचीं फळें सूर्यकिरणांच्या योगानें आकाशांत हजारों विजा चकमत आहेत असें वाटण्याजोगीं चमकूं लागलीं. आणि हजारों राजकुमारांच्या मस्तकांवर मयूरपिच्छांचीं छत्रें

होतीं, त्यामुळें हजारों इंद्रधनुष्यांनीं युक्त अशा मेघमंडळाप्रमाणें तें सैन्य दिसलें. त्यांतील अश्व चंचल असून त्यांचीं मुखें फेसानें भरलेलीं होतीं, त्यामुळें हा प्रळयकाळच्या समुद्राचा ओघच पसरला आहे काय अशा प्रकारचें अश्वसैन्य चंद्रापीडानें पाहिलें.

तदनंतर तें सर्व अश्वसैन्य चंद्रापीड आला असें पाहून, चंद्रोदय झाला म्हणजे जसें समुद्राचें उदक हालून जातें तसें हालून गेलें. आणि राजपुत्रांनीं आपल्या मस्तकावरचीं छत्रें एकीकडे करून चंद्रापीडास मी आधीं प्रणाम करीन अशा चढीओढीनें चंद्रापीडास वेढिलें. त्या दाटीमध्यें घोड्यांस घोडे लागून उधळूं लागले ते आटोपण्याविषयीं त्या राजकुमारांस मोठे आयास पडले. तदनंतर त्या बलाहक सेनापतीनें प्रत्येकीं राजपुत्रांचीं नांवें चंद्रापीडास कळविलीं. मग त्या राजपुत्रांनीं आपलीं मस्तकें नम्र करून चंद्रापीडास प्रणाम केले.

मग तो चंद्रापीड त्या सर्व राजकुमारांचा यथायोग्य सन्मान करून त्यांसहवर्तमान नगरांत जावयास निघाला. त्याच्या मागून वैशंपायन नामक प्रधानपुत्रही निघाला. तेव्हां चंद्रापीडास उष्ण लागूं नये म्हणून सेवकजनानें सोन्याच्या दांडीचें मोठें श्वेत छत्र चंद्रापीडाच्या मस्तकावर धरलें. त्या छत्रास मोठाल्या मोत्यांची झालर लाविली होती, व त्यावर सिंहाचें चित्र काढलें होतें. तें छत्र जणो राज्यलक्ष्मीचें निवासस्थानच काय असें शोभायमान होतें. चंद्रापीडाच्या दोहों आंगांस शुभ्र चंवऱ्या उडत होत्या, त्यांचा वारा लागून चंद्रापीडाच्या कानांतील भूषणें हालत होतीं. चंद्रापीडाच्या पुढें पायदळ चाललें होतें त्यामध्यें प्रायः तरुण व वीर असे हजारों पुरुष होते. आणि हजारों स्तुतिपाठकही जयजय, चिरंजीव, चिरंजीव, असा शब्द करीत व मंगलगायनें गात व स्तुतिपाठ करीत चालले होते. अशा थाटानें तो चंद्रापीड नगरांत जावयास निघाला.

मूर्तिमान् मदनाचा पुतळा असा तो चंद्रापीड राजकुमार नगरांत येतो असें नगरवासी लोकांस कळतांच जसा चंद्रोदय होण्याची वेळ आली म्हणजे चंद्रविकासी कमलांचा समुदाय विकसित होऊन चंद्राभिमुख होतो तसा लोकांचा समुदाय आपापले सर्व व्यापार सोडून हर्षानें चंद्रापीडास पहावयास बाहेर निघाला. आणि त्या राजकुमारास पाहून

बोलूं लागला कीं, ह्या काळीं हा अत्यंत रूपवान् राजकुमार असतांही सहा मुखांचा विद्रूप कार्तिकस्वामी आपणास कुमार म्हणवितो ही गोष्ट मोठ्या उपहासाची आहे. आणि किती हो आमचें पुण्य? कीं ह्या राजकुमाराची ही दिव्य आकृति आम्हीं प्रेमरसानें भरलेल्या व कौतुकानें प्रफुल्लित झालेल्या आपल्या डोळ्यांनीं निरभिनिबंध पाहात आहों. आमच्या जन्माचें साफल्य झालें. चंद्रापीडाच्या रूपानें हा नारायणच अवतरला आहे, ह्याला आमचा नमस्कार असो. असें बोलून त्या नगरवासी लोकांनीं त्या चंद्रापीडास दुरूनच नमस्कार केले. आणि नगरांतील हजारों खिडक्यांचीं दारें उघडल्यामुळें असें वाटलें कीं, चंद्रापीडाची स्वारी पाहण्याच्या कौतुकामुळें नगरानें आपले हजारों नेत्रच उघडले आहेत काय? आणि चंद्रापीड राजकुमार संपूर्ण विद्या शिकून विद्या मंदिरांतून निघून नगरांत येत आहे असें वर्तमान ऐकून नगरांतल्या संपूर्ण स्त्रिया आपापले सर्व व्यापार अर्धेच टाकून त्वरेनें व आनंदानें घरांतल्या उच्च उच्च स्थलावर चढून राजपुत्राची स्वारी पहावयास बसल्या. चंद्रापीडास पहावयासाठीं जेव्हां हजारों स्त्रिया निघाल्या तेव्हां त्यांच्या गळ्यांतल्या व हातांतल्या व पायांतल्या भूषणांचे शब्द एकत्र मिळून जो मोठा ध्वनि उत्पन्न झाला तो ऐकून लोकांस असा भास झाला कीं कामदेवाच्या विजयाचाच हा दुंदुभिध्वनि होत आहे.

ह्याप्रमाणें तरुणी स्त्रियांच्या दाटीनें सर्व नगर क्षणांत नारीमय होऊन गेलें. स्त्रियांच्या अंगकांति चोहोंकडे पसरल्यामुळें तें सर्व नगर लावण्यमय दिसूं लागलें. स्त्रियांच्या मुखकमलसमुदायानें आकाश व्याप्त झाल्यामुळें आकाशांत हजारों चंद्रबिंबें उगवलीं आहेत असें वाटूं लागलें. सूर्य किरण डोळ्यांवर न पडावे म्हणून स्त्रियांनीं आपले हात उताणे करून डोळ्यांपुढें धरल्यामुळें सर्व दिङ्मंडल कमलमय दिसूं लागलें. स्त्रियांच्या नाना रंगांच्या रत्नालंकारांवर सूर्याचे किरण पडून आकाशांत पसरल्यामुळें आकाशांत चोहोंकडे इंद्रधनुष्यें पडलीं आहेत असा भास होऊं लागला. त्या स्त्रिया चंद्रापीडास निरखून पाहूं लागल्या तेव्हां त्यांचे नेत्र प्रफुल्लित व निश्चल झाले, आणि त्यांचीं अंतःकरणें आदर्शमय किंवा स्फटिकमय किंवा उदकमय होतीं म्हणूनच काय त्यांमध्यें चंद्रापीडाची मूर्ति प्रतिबिंबित झाली, आणि त्यांस कामाभिलाष

होऊन उन्मत्ताप्रमाणें त्या एकमेकींस थट्टेचीं, विश्वासाचीं' त्वरेचीं, ई-ष्येंचीं, वक्रतेचीं, असूयेचीं, विलासाचीं, मदनाचीं, आणि सस्पृहतेचीं भाषणें करूंलागल्या. एक म्हणते, अगे त्वरितगमने, माझी वाट पहा; एक म्हणते, अगे दर्शनोन्मत्ते, आपलें पांघरावयाचें वस्त्र आटोप; अगे चपले, आपल्या तोंडावर आलेले केश तरी मागें सार; अगे मूढे, आपली चंद्रकोर नीट कर; अगे मदनांधे, वाटेंत पसरलेल्या पुष्पराशीस अडकून पडतेसना; अगे मदनानिश्चेतने, आपला केशपाश नीट बांध; अगे चंद्रा-पीडाच्या दर्शनाचें व्यसन बाळगणारे, आपलें कटिभूषण वर सार; अगे पापिणी, तुझा कानावरचा पल्लव गालावर लोंबत आहे तो काढून टाक; अगे अस्वस्थत्हृदये, तुझी फणी खालीं पडली ती उचलून घे; अगे यौ-वनोन्मत्ते, लोक पहातात ना? आपला स्तनभार झांक; अगे त्यक्त लज्जे, तुझें नेसणें शिथिल झालें ना? तें घट्ट बांध; अगे सौंदर्याभिमान बा-ळगणारे, लौकर ये; अगे कौतुकयुक्ते, मला पहावयास अवकाश दे; अगे असंतुष्टे, किती पाहतेस, पुरे कर; अगे चंचलचित्ते, आपल्या सेव-कजनाची तरी अपेक्षा धर; अगे पिशाच्चिके, तुझें उत्तरीय वस्त्र पडलें म्हणून लोक तुला हांसतात ना? अगे विषयांधे, सखीजनासही पाहत नाहींस काय; अगे मनोविकारपूर्णे, कारणावांचून चित्तास आयास दे-ऊन दुःखानें कां वांचतेस? चंद्रापीडास पहावयास चल; अगे मिथ्या नियम दाखविणारे, दुसरीकडे पाहण्याचें मिष कशाला करितेस, चं-द्रापीडाकडे खुशाल पहा; अगे तारुण्यललिते, तूं आपल्या स्तनभारानें मला पीडा कां देतेस; अगे अत्यंत कोपिष्ठे, पुढें हो मला जाऊंदे; अगे मत्सरकारिणी, तूं एकटीच कां खिडकी अडवितेस; अगे मदनपरवशे, तूं माझें पांघरूण आपल्या आंगावर ओढून घेतेस काय; अगे विषयम-द्यमत्ते, तूं आपणास आटोपून धर; अगे त्यक्तधैर्ये, सासूसासऱ्यां देखतच धांवतेस काय; अगे आनंदितस्वभावे, अशी व्याकुळ कां होतेस; अगे मुग्धे, तुझ्या शरीरावर कामज्वरानें रोमांच आले आहेत ते झांक; अगे असदाचरणे, अशी उतावळी कां होतेस; अगे विविधमानसविकारे, नानाप्रकारें मध्यभागास हालवून आयास देऊन व्यर्थ खेद कां पावतेस; अगे शून्यत्हृदये, आपण घरांतून बाहेर निघाल्याचें देखील भान तुला

नाहींना; अगे कौतुकभरिते, तूं श्वासोच्छ्वास करावयासही विसरलीस ना; अगे अंतःकरणांतील कल्पित समागमाच्या सुखानें डोळे उघड, हा राजपुत्र चालला ना; अगे कामबाणमूर्छिते, सूर्यकिरणांच्या निवारणार्थ मस्तकावर पदर घे, अगे पतिव्रतापणाच्या पाशांत दुःख पावणारे, पहावयाचें वस्तु न पाहतां आपल्या डोळ्यांस कां फसवितेस; अगे अधन्ये, परपुरुष न पहावा अशा व्रतानें आत्म्यास कां फसवितेस? तर आतां ऊठ लवकर, आणि ज्यानें आपला मकरध्वज घेतला नाहीं असा रतिविरहित हा साक्षात् भगवान् कामदेवच चालला आहे ह्याला पहा. पहा त्याच्या मस्तकावर श्वेतच्छत्र आहे. त्याला जाईच्या फुलांच्या माळा लावल्या आहेत, त्याच्या गालावर कर्णभूषणांच्या कांति पडल्या आहेत, ह्याला नुकतेंच तारुण्य प्राप्त झालें आहे, ह्याच्या मस्तकावर चवऱ्या उडत आहेत, हा राजपुत्र वैशंपायन नामक प्रधानपुत्राशीं कांहीं बोलत आहे, लोकांकडे पाहून हा किंचित् हांसत आहे. घोड्याच्या खुरांनीं उडालेली धूळ त्याच्या केशाग्रांवर बसली आहे ती बलाहक सेनापति आपल्या बारीक शेल्याच्या पदाशनें वरचेवर पुशीत आहे. पहा त्या राजपुत्रानें कमलासारखा कोमल असा आपला चरणपल्लव वांकडा उचलून घोड्याच्या खांद्यावर ठेविला आहे. जसा एखादा गज पुष्करानें शेवाळ घेण्याकरितां सोंड पुढें करितो, तसा हा राजपुत्र आपला हात उताणा करून विडा घ्यावयासाठीं पसरीत आहे. ती स्त्री धन्य होय, जी लक्ष्मीसारखी पृथ्वीची सपत्नी होऊन ह्या राजपुत्राचें करकमल आपल्या हातांत धरील. आणि ती विलासवतीनामक राजपत्नीही धन्य होय कीं, जिणें संपूर्ण भूमंडळाचा भार धरण्यास समर्थ असा हा चंद्रापीड आपल्या गर्भांत धरिला.

अशा प्रकारचीं भाषणें बोलणाऱ्या स्त्रियांनीं ज्याचें नेत्रद्वारा प्राशनच केलें काय, व त्यांच्या भूषणांच्या शब्दांनीं ज्यास आव्हानच केलें काय, व त्यांच्या अंतःकरणांनीं ज्यामागून गमनच केलें काय, व त्यांच्या रत्नमय अलंकारांच्या किरणरूप रज्जूंनीं ज्याचें बंधनच केलें काय, व त्यांनीं आपल्या नवीन तारुण्यरूप धनाची ज्यास नजरच केली काय, असा तो चंद्रापीड राजपुत्र हळू हळू राजवाड्याजवळ आला.

आणि तो चंद्रापीड जें पाळीपाळीनें उभ्या राहणाऱ्या हत्तिणींनीं व्याप्त, व अनेक श्वेतच्छत्रांनीं व्याप्त, व द्वीपांतरांहून आलेल्या शेंकडों दूतांनीं व्याप्त, अशा राजद्वाराजवळ जाऊन घोड्यावरून खालीं उतरला.

घोड्यावरून खालीं उतरल्यावर त्या चंद्रापीडानें आपल्या हाता नें वैशंपायननामक प्रधानपुत्राचा हात धरून नम्रपणानें पुढें चालणाऱ्या बलाहकनामक सेनापतीनें दाखविलेल्या मार्गानें राजमंदिरांत प्रवेश केला. त्यानें तें राजमंदिर पाहिलें तों, एकेठिकाणीं जमा होऊन राहिलेलें हें त्रिभुवनच काय असें वाटलें. द्वाराच्या दोहों बाजूंस हातांत सोन्याच्या काठ्या घेऊन व पांढरे पोषाख करून व पागोट्यांत पांढऱ्या फुलांचे तुरे खोंवून शेंकडों द्वारपाल कमरा बांधून चित्राप्रमाणें उभे आहेत. ज्या मंदिरांत उंच उंच गच्च्या चुना लावून शुभ्र केलेल्या हिमालय पर्वताच्या शिखरांप्रमाणें शोभत आहेत. ज्या मंदिरांत माड्यांवरील खिडक्यांतून बायका बसल्या आहेत त्यांच्या अलंकारांचें किरण जाल चोहोंकडे पसरलें आहे. ज्या मंदिरांत आयुधशाला पुष्कळ आहेत, तशींच क्रीडास्थानें पुष्कळ आहेत. ज्या मंदिराच्या चौकांत पाहरा करणाऱ्या सुशिक्षित हत्तिणी उभ्या आहेत, त्यांच्या पाठीवर भरगच्ची जरीच्या झुली घातल्या आहेत, व कानाजवळ चवऱ्या बांधलेल्या आहेत. त्याच चौकांत एका बाजूस मदोन्मत्त गंधमादननामक मोठा हत्ती बांधिला आहे, आणि त्याला रंजविण्याकरितां जवळ वीणा, वेणु, मृदंग, इत्यादि मधुर वाद्यांचे ध्वनि होत आहेत. आणि डोळे मिटून दांतावर सोंड ठेवून कर्ण स्तब्ध करून तो मधुर ध्वनि ऐकत आहे. त्या हत्तीच्या पाठीवर चित्रविचित्र रंगाची झूल घातली होती त्यामुळें गैरिकादिधातूंनीं चित्रित अशा विंध्याचलाप्रमाणें तो शोभत होता. त्याच्या गंडस्थलापासून सतत मदोदकाचे प्रवाह चालले होते. त्याच्या गंधास लुब्ध होऊन वर भ्रमर बसले होते. त्याच्या कानाजवळ सोन्याचे अंकुश खोंवलेले होते, ते त्याच्या कर्णभूषणांप्रमाणें शोभत असत. त्या हत्तीचें पुढलें अंग फार उंच होतें व मागलें अंग निंच होतें ह्यामुळें हा हत्ती पाताळांतूनच वर येत आहे काय असें वाटे. त्याच्या सोंडेचें पुष्कर रक्तोत्पलाप्रमाणें तांबडें होतें. व तो आपल्या बंधनस्तंभावर व सुवर्णमय बंधनरज्जूवर रममाण होता. ज्या मंदिरांत अनेक अश्व-

शाळा असून त्यांमध्यें उत्तम जातीचे भूषित केलेले राजप्रिय अश्व हजारों बांधलेले उभे आहेत; ज्या मंदिरांतील न्यायसभेंत केवळ धर्ममूर्तिच असे धर्माधिकारी पुरुष उत्तम वेष धरून वेताच्या आसनांवर बसले आहेत, आणि चित्रगुप्ताप्रमाणें लेखनकुशल असे हजारों कारकून व्यवहारसंबंधी लिहिणें लिहित बसले आहेत; ज्या मंदिरांत ठिक ठिकाणीं सेवकजन उत्तम पोषाक करून हातीं ढालतरवारी घेऊन राजाची स्वारी अभ्यंतर गृहांतून बाहेर केव्हां येते म्हणून वाट पाहात बसले आहेत; ज्या राजमंदिरांत हजारों मांडलिक राजे बसले आहेत; त्यांत कोणी सोंकट्या खेळत, कोणी बुदबळें खेळत, कोणी वीणा वाजवीत, कोणी तसबिरी काढीत, कोणी थट्टेचीं भाषणें करीत, कोणी अनेक प्रकारच्या कविता रचीत, कोणी सुभाषिताचे विचार करीत, कोणी वेश्यांशीं संभाषण करीत कोणी स्तुतिपाठकांचीं गायनें ऐकत, बसले होते. ज्या मंदिरांत वेश्यांगना खांद्यांवर सोन्याच्या दांड्यांच्या चंवऱ्या घेऊन इकडे तिकडे फिरत आहेत, व त्यांच्या पादभूषणांचे शब्द होत आहेत. ज्या मंदिरांत एकीकडे शिकारी कुत्रे सोन्याच्या सांखळ्यांनीं बांधले आहेत. ज्यांत शिकारखाने पुष्कळ आहेत, व बाळगलेले कस्तूरीमृग इकडे तिकडे फिरत आहेत, त्यांच्या सुवासानें दशदिशा भरून गेल्या आहेत. ज्या मंदिरांत अनेक देशांपासून, अनेक द्वीपांपासून, आणलेले चमत्कारिक पदार्थ, पक्षी, पशु, इत्यादि ह्यांचीं संग्रहालयें आहेत. ज्या मंदिराभोंवतीं अनेक जातींच्या फुलझाडांनीं व फळझाडांनीं व्याप्त असे बाग आहेत. ज्या मंदिरांत स्त्रियांचीं अंतःपुरें फार रमणीय आहेत. ज्या मंदिरांत पाण्याचे नळ वाहत आहेत व जागजागीं कारंजीं उडत आहेत; व जिकडे तिकडे कृष्णागुरूचे व दशांगाचे धूपाचे लोट चालत असल्यामुळें सर्व मंदिर सुगंधानें घमघमीत झालें आहे. ज्या मंदिरांत सोन्याचे व रत्नाचे ढीग पडले आहेत; आणि ज्या मंदिरांत चंद्रापीडाच्या दर्शनाविषयीं सर्व लोक, स्त्रिया, पुरुष, अति उत्कंठित झाले आहेत, अशा मंदिरांत त्या चंद्रापीडानें प्रवेश केला.

मंदिरांत प्रवेश करतांच द्वारपालांनीं त्वरेनें पुढें येऊन भूमीस हात लावून प्रणाम करून त्यास मार्ग दाखविला. त्या मार्गानें कांहींसा पुढें गेल्यावर, पूर्वीं येऊन चंद्रापीड राजपुत्र केव्हां येईल म्हणून वाट पाहत

बसलेले, हजारों राजे लोक, चंद्रापीड आला असें समजतांच अकस्मात् चहूंकडून उठून पुढें आले; आणि द्वारपालांनीं नांवें सांगितल्या क्रमानें चंद्रापीडास आदरपूर्वक प्रणाम करिते झाले. तो चंद्रापीड अंमळ पुढें गेला तों कुलपरंपरागत संप्रदाय जाणणाऱ्या अंतःपुरांतील वृद्ध वृद्ध स्त्रिया हातांत कुरवंड्या घेऊन अभ्यंतर गृहांतून बाहेर आल्या. त्यांनीं पावलो पावलीं त्यावरून लिंबलोण व मंगलदीप ओंवाळून उतारे उतरून टाकिले. अशा प्रकारें तो चंद्रापीड नानाप्रकारच्या प्राण्यांनीं व्याप्त असल्यामुळें दुसरीं भूवनेंच जणों अशी शंका देणारे राजमंदिराचे सात चौक वलांडून अभ्यंतरगृहांत तारापीडमहाराज बसला होता तेथपर्यंत गेला. ज्या तारापीडाच्या शरीररक्षणार्थ शस्त्रकवचधारी पुरुष चोहोंकडे उभे आहेत, आणि कलावंतिणी ज्यावर चंवऱ्या वारीत दोहोंबाजूस उभ्या आहेत, आणि जो शुभ्र आस्तरणाच्या शय्येवर बसला आहे, असा आपला पिता तारापीड महाराज चंद्रापीडानें दुरून पाहिला.

इतक्यांत द्वारपालांनीं राजास कळविलें कीं, महाराज, चंद्रापीड आला त्याकडे अवलोकन करावें. असें द्वारपालांचें वचन ऐकतांच शयनावरून कांहींसा उठून चंद्रापीडाचें आलिंगन करावें म्हणून दूरवर आपले हात ज्यानें पसरले आहेत, व ज्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरले आहेत, व ज्याच्या आंगावर रोमांच उठले आहेत, अशा प्रकारच्या तारापीड राजानें, येथे सत्वर असें बोलून मस्तक नम्र करून प्रणाम करणारा व विनयानें विनीत झालेला असा आपला पुत्र चंद्रापीड दोहों हातांनीं त्हृदयाशीं दृढ आलिंगिला.

तदनंतर राजानें आलिंगून सोडलेला चंद्रापीड आपल्या पित्याच्या पादपीठाजवळ भूमीवर बसावयास गेला, इतक्यांत तांबूलाचा डबा बाळगणाऱ्या दासीनें आपल्या आंगावरील शेल्याची घडी करून बसावयास घातली, ती एकीकडे कर असें हळूच बोलून आपल्या पादाग्रानें दूर करून तो भूतलावरच बसला. त्याच्या पाठीमागून पुत्राप्रमाणें ज्याला राजानें आलिंगन दिलें, असा वैशंपायननामक प्रधानपुत्रही त्या चंद्रापीडाच्या डाव्या बाजूस भुईवर बसला.

तदनंतर चंवऱ्या वारणाऱ्या कलावंतिणी कटाक्षदृष्टीनें ज्याकडे साभिलाष पाहात आहेत, असा चंद्रापीड आपल्या पित्याजवळ मुहूर्तमात्र

तटस्थ बसला असतां, पित्यानें त्यास आज्ञा केली कीं, मुला, तूं अंतः-पुरांत जाऊन तुला पाहण्याविषयीं अति उत्सुक झालेली जी तुझी जननी तिला वंदन कर, आणि तशाच इतर मातांसही आपल्या दर्शनानें आनंद दे. असें बोलून पित्यानें जाण्याची आज्ञा दिल्यावर तो चंद्रापीड मोठ्या विनयानें उठून आपणाबरोबर येण्यासाठीं निघालेल्या सर्व सेवकजनांचें निवारण करून एकट्या वैशंपायनाला मात्र बरोबर घेऊन अंतःपुरांत जावयास निघाला तेव्हां अंतःपुरांत वागणारे सेवकजन पुढें होऊन त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें तो अंतःपुरांत गेला.

आणि जिच्या भोंवतालीं पांढरे पोषाक केलेले वृद्ध चोबदार उभे आहेत, आणि सर्वसंगपरित्याग करून राहणाऱ्या, व इतिहासपुराणादिकांतल्या गोष्टी जाणणाऱ्या, व भगवीं वस्त्रें नेसणाऱ्या, अशा वृद्ध स्त्रिया भोंवतालीं बसून जिला करमणूक करीत आहेत; आणि स्त्रीवेष धरणारे षंढलोक जिची सेवा करीत आहेत, आणि सेवकीजन जिच्यावर चवऱ्या वारीत आहे; आणि कितीएक दासी जिच्या भोंवतीं वस्त्रें, आभरणें, पुष्पें, बुका, तांबूल, पंखे, उटीचें साहित्य, पाण्याच्या झाऱ्या असे पदार्थ हातांत घेऊन उभ्या आहेत; आणि जिच्या कंठांत घातलेला मोत्यांचा हार त्दृदय स्थलावर शोभत आहे, आणि पुढें ठेवलेल्या आरशांत पडलेलें आपलें प्रतिबिंब जी वारंवार पाहत आहे, अशा प्रकारची माता विलासवती बसलेली पाहतांच पूढें जाऊन चंद्रापीडानें तिला नम्र होऊन प्रणाम केला.

तदनंतर त्या मातेनें त्याला त्वरेनें उठवून आज्ञाधारक सेवकजन जवळ असतांही आपणच उठून स्वतः त्या पुत्रावरून लिंबलोण उतरून मंगलकृत्य केलें, आणि प्रेमानें स्तनांतून पान्हा फुटून आर्द्र झालेल्या त्दृदयाशीं त्याला धरून त्याच्या मस्तकाचें अवघ्राण करून बहुत वेळपर्यंत एकसारखें त्याचें आलिंगन केलें. तसेंच चंद्रापीडाप्रमाणें त्या वैशंपायनाचेंही यथायोग्य उपचारपूर्वक आलिंगन केलें, आणि ती आपण खालीं बसली. आणि तो चंद्रापीड मोठ्या विनयानें भूमीवरच बसूं लागला असतां त्याची इच्छा नसतांही त्याला मातेनें बलात्कारानें ओढून आपल्या मांडीवर बसविलें. मग सेवकजनानें मोठ्या त्वरेनें आणलेल्या आसनावर वैशंपायन बसला.

तदनंतर ती विलासवतीनामक माता त्या चंद्रापीडाच्या शरीरास पुनः पुनः आलिंगून त्याच्या ललाटास व वक्षस्थळास व दोन्ही खांद्यांस आपल्या तळहातानें वारंवार स्पर्श करून त्याच्याशीं बोलूं लागली कीं, मुला, तुझा पिता मोठा कठिण त्दद्याचा होय कीं, ज्यानें अशीही त्रिभुवनलालनीय तुझी मूर्ति इतके दिवस येवढ्या मोठ्या क्लेशांत पाडिली. मुला तूं इतके दिवस असा मोठा गुरूचा प्रतिबंध कसा सोसला ? हें मोठें आश्चर्य कीं तूं बाल असून कठोर पुरुषाप्रमाणें तुझें फार मोठें धैर्य, आणि तुझें त्ददयही बालक्रीडेचें कौतुक व चांचल्य सोडून एकसारखें विद्याभ्यासाकडे लागलें. गुरुजनावर तुझी सर्वथा लोकोत्तर भक्ति खरी. आपल्या पित्याच्या प्रसादानें समस्तविद्यासंपन्न झालेला तूं जसा आतां माझ्या दृष्टीस पडलास, तसा थोड्याच दिवसांनीं तुला अनुरूप वधूनें युक्त असा मी पाहीन. असें मातेचें भाषण ऐकून किंचित् हांसून लज्जेनें खालीं मुख करून चंद्रापीड बसला असतां त्याच्या गालाचें मातेनें चुंबन केलें.

तदनंतर तो चंद्रापीड थोडका वेळ तेथें बसून तेथून उठला, आणि क्रमानें राजाच्या सर्व अंतःपुरस्त्रियांस आपल्या दर्शनानें आनंदविता झाला. मग तेथून वैशंपायना सहवर्तमान निघून राजमंदिराच्या द्वाराजवळ उभा केलेला जो इंद्रायुधनामक अश्व त्यावर आरोहण करून शुकनास प्रधानाच्या भेटीस गेला. त्याच्या मागून पुर्वीप्रमाणें राजपुत्राचें मंडलही गेलें.

तदनंतर तो राजपुत्र शुकनास प्रधानाच्या मंदिराच्या द्वारप्रदेशाजवळ गेला. इतक्यांत त्याला पाहतांच द्वारपाल पुढें धांवून आले. त्यांनीं पुढें जाण्याविषयीं जरी निवारण केलें नाहीं, तरी तो पूर्वी राजद्वाराच्या बाहेरच जसा घोड्यावरून उतरला, तसा तेथेंही येऊन द्वाराबाहेरच घोड्यावरून उतरला. तो द्वार प्रदेश असा होता कीं, जेथें पाळीपाळीनें पाहरा करणारे प्रधानाचे शेंकडों हत्ती, व हजारों घोडे, व अनेक कार्यांच्या निमित्तानें आलेले जनांचे समुदाय, व प्रधानाच्या दर्शनाविषयीं उत्कंठित झालेले हजारों ब्राह्मण, आणि प्रधानाच्या भेटीकरितां अभ्यंतर गृहांत गेलेले हजारों मांडलिक राजे त्यांजकडील हजारों घोडे, हत्ती, व माणसे, ह्या सर्वांची एकच मोठी दाटी होऊन रा-

हिली आहे अशा द्वार प्रदेशाजवळ घोड्यावरून उतरून घोडा तेथेंच ठेवून वैशंपायनाचा हात धरून चंद्रापीड आंत जावयास लागला. तेव्हां द्वारपालांनीं पुढें येऊन मध्यें झालेल्या दाटीचें निवारण करून राजपुत्रास मार्ग दाखविला, त्या मार्गानें तो आंत गेला. त्यासमयीं हजारों राजे लोकांनीं आपलाले मुकुट खालीं करून त्यास प्रणाम केले, व चोपदारांनीं एकदांच मोठा जय शब्द केला, व भालदारांनीं आपापल्या काठ्या एकदम वर उचलल्या. त्यांस भिऊन लोक त्वरेनें चालूं लागले तेव्हां प्रधानाच्या मंदिराची भूमी हालून गेली. अशा प्रकारची शोभा पाहत पाहत तो राजपुत्र जेथें शुकनास प्रधान बसला होता तेथें गेला. पाहतो तों त्याच्या भोंवतालीं हजारों राजे लोक बसले आहेत, व हजारों सेवकजन भोंवतीं उभे राहिले आहेत. त्यांत कोणी त्यावर चंवऱ्या वारीत आहेत, व कोणी पंख्यानें वारा घालीत आहेत, त्यामुळें तो दुसरा राजाच काय असा शोभत आहे. त्यास पाहतांच चंद्रापीडानें जसा आपल्या पित्यास विनयानें प्रणाम केला तसाच त्या शुकनास प्रधानासही मोठ्या नम्रतेनें मस्तक नम्र करून प्रणाम केला.

तदनंतर शुकनास प्रधान राजपुत्र आपल्या दर्शनास आला असें पाहून मोठ्या त्वरेनें उठला. त्या बरोबर सर्व मांडलिक राजेही उठले. ज्याच्या नेत्रांत हर्षामुळें आनंदाश्रु आले आहेत असा तो प्रधान त्वरेनें राजपुत्राच्या सन्मुख जाऊन प्रथम राजपुत्राचें आलिंगन करून मग आपल्या वैशंपायन नामक पुत्राचें आलिंगन केलें तदनंतर प्रधानानें आलिंगून सोडलेला राजपुत्र आदरानें दिलेलें आसन एकीकडे सारून भूतलावरच बसला, त्याच्या मागून तो वैशंपायनही खालीं बसला. तेव्हां राजपुत्र भूमीवर बसला असें पाहून एका शुकनास प्रधाना वांचून बाकीचे सर्व राजे लोक आपापलीं आसनें सोडून भूमीवर बसले.

तदनंतर तो शुकनास प्रधान क्षणभर उगाच स्तब्ध बसून आंगावर रोमांच आल्यामुळें ज्याच्या हृदयांतला हर्षातिशय प्रकट झाला आहे. असा होत्साता चंद्रापीडाशीं बोलूं लागला. बापा चंद्रापीडा, ज्याची विद्या समाप्त झाली व ज्यास नुकतेंच तारुण्य प्राप्त झालें अशा तुझें अवलोकन करून मला असें वाटतें कीं, तारापीड महाराजास जें संपूर्ण भूमंडलाचें राज्य प्राप्त झालें त्याचें आज साफल्य झालें. त्यास झालेले

जे सर्व गुरुजनांचे आशीर्वाद ते संपन्न झाले आणि अनेक जन्मोपार्जित जें शुद्ध कर्म तें फलद्रूप झालें. व आज कुलदेवता प्रसन्न झाल्या. कां कीं, अपुण्यवंतास तुझ्या सारखा सकळ भुवनास विस्मयकारक असा पुत्र कोठून होणार. हें तुझें अल्पवय कोणीकडे, आणि ही लोकोत्तर शक्ति व अशेष विद्याग्रहणसामर्थ्य कोणीकडे. अहो, ह्या प्रजा धन्य होत कीं ज्यांचें पालन करण्याचा अधिकारी भरत भगीरथ ह्या राजांसारखा तूं उत्पन्न झालास. आणखी ह्या पृथ्वीनें तरी असें कोणतें विशुद्ध कर्म केलें कीं ज्याच्या योगानें तुझ्या सारखा भर्ता तिनें मिळविला. आणखी श्रीविष्णूच्या वक्षस्थळावरच राहण्याचा आग्रह धरणाऱ्या लक्ष्मीनेंही आपला मोठा तोटा करून घेतला कीं ती मूर्तिमंत तुझ्याकडे येत नाहीं. तर सर्व प्रकारें जसा नारायण महावराहावतार घेऊन आपल्या दाढेनें भूमीचा भार वाहतो, तसा तूं आपल्या पित्यासहवर्तमान कोटिकल्पपर्यंत आपल्या भुजांनीं पृथ्वीचा भार वाहावा. असें बोलून त्या प्रधानानें वस्त्रालंकारादि उपचारांनीं राजपुत्राचा पूजासत्कार करून त्यास जावयास निरोप दिला. मग प्रधानाचा निरोप घेऊन उठला आणि प्रधानाच्या स्त्रीगृहांत प्रवेश करून वैशंपायनाची माता आणि शुकनासाची स्त्री जी मनोरमा तिला भेटून तिचे आशीर्वाद घेऊन निघाला.

तदनंतर त्या राजपुत्रानें बाहेर येऊन इंद्रायुधनामक अश्वावर आरोहण करून आपल्या पित्यानें आपणाकरितां पूर्वींच सिद्ध करून ठेवलेल्या मंदिरामध्यें प्रवेश केला. तें मंदिर असें होतें कीं राजमंदिराचें प्रतिबिंबच काय असें सुशोभित होतें. ज्याच्या द्वाराजवळ जलपूर्ण कलश ठेविले आहेत, व द्वाराच्यावर पल्लवाच्या आणि पुष्पांच्या माळा बांधिल्या आहेत. ज्या मंदिरावर हजारों पांढऱ्या पताका शोभत आहेत. ज्यामध्यें मंगलवाद्यें वाजत आहेत. ज्यामध्यें सुगंधि पुष्पांचे समुदाय पसरले आहेत, आणि ज्यामध्यें उत्तम वेषाचें धारण करणारे सेवकजन सेवेविषयीं सिद्ध होऊन राहिले आहेत. अशा मंदिरामध्यें प्रवेश करून त्यांतील दिवाणखान्यांत मांडलेल्या एका मंचकावर मुहूर्तमात्र बसून त्या सर्व राजपुत्रमंडळीसहवर्तमान स्नान आदिकरून भोजनापर्यंत जे दिवसास करावयाचे विधि ते सर्व त्या चंद्रापीडानें केले. आणि अभ्यंतर गृहामध्येंच आपल्या निजावयाच्या जाग्याजवळ आपला बसावया-

चा जो इंद्रायुध नामक अश्व त्यास राहावयाची जागा करविली.

अशा प्रकारच्या व्यापारांत त्या राजपुत्राचा तो सर्व दिवस समाप्तीस गेला. त्या काळीं दिवस लक्ष्मीच्या पायांतील माणिकाचें भूषणच काय असें सूर्यमंडळ आकाश मंडळापासून खालीं पडलें, व त्याच्या मागून दिवससंबंधी सर्व प्रकाश पश्चिम दिशेस गेला, व सूर्यानें आपल्या करांनीं दिगंगनांच्या मुखांवरील सिंदूरच काय असा संध्याराग पुसून टाकिला, व चक्रवाक पक्ष्यांचे जोडे फुटून गेले, व सूर्य गेल्यामुळें प्रिय विरहानें सूर्यविकासी कमलिनी मुकलित झाल्या, व चंद्रविकासी कमळें प्रफुल्लित होऊं लागलीं. अशी अवस्था करणारा पश्चिम दिगंगनेच्या कर्णांतील भूषणरूप कमळच काय असा भगवान् सहस्ररश्मी सूर्य लोकांतरास गेला असतां, व अंधकार समुदाय दिशांस व्यापीत असतां, व सर्व पशु पक्षी आपापला व्यापार सोडून स्तब्ध राहिले असतां, व राजमंदिरांत जिकडे तिकडे दीप प्रज्वलित झाले असतां, व पाहरेकरी लोक आपापल्या जाग्यावर सावधपणानें उभे राहिले असतां, व उपाध्याय मंडळी राजास मंगल आशीर्वाद करून निघाली असतां, आणि राजेलोक निरोप घेऊन राजमंदिरांतून बाहेर पडले असतां, तो चंद्रापीडनामक राजपुत्र आपल्या बरोबर पुष्कळ मशाली पेठवून घेऊन पायांनींच राजमंदिरांत जाऊन पित्याजवळ मुहूर्त मात्र बसून मग आपल्या मातेचें दर्शन घेऊन पुन्हा आपल्या मंदिरांत आला, आणि जसा नारायण फणामणिमंडित अशा शेषशयनावर निद्रा करितो तसा रत्नकांतींनीं विचित्रवर्ण अशा आपल्या सुखशयनावर निजता झाला.

तदनंतर दुसरे दिवशीं पहांटेच्या रात्रीस तो चंद्रापीड उठून राजाची आज्ञा घेऊन अंःतकरणास कौतुक करणारी अशी अभिनव मृगया करण्याविषयीं अत्यंत उत्कंठित होऊन भगवान् सहस्र किरण सूर्य उदयास येण्याच्या पूर्वींच इंद्रायुध नामक अश्वावर आरोहण करून अरण्यांत जावयास निघाला. तेव्हां त्याजबरोबर गर्दभा प्रमाणें मोठाले शिकारी कुत्रे सोन्याच्या सांखळदंडांनीं बांधून आकर्षण करणारे, व व्याघ्रचर्माचीं कवचें घालणारे, व मस्तकास चित्रविचित्र वर्णांचीं वस्त्रें गुंडाळणारे, व लांब लांब दाढ्यामिशा बाळगणारे, व कमरबस्ते करणारे, व हातांत धनुष्यें घेणारे, व कोलाहल करणारे, भयंकर व बळकट असे कुत्र्यांचे

पाळक पुरुष, हजारों निघाले, आणि पुढें धांवूं लागले. त्यामुळें चंद्रापीडास मृगया करण्याविषयीं दुप्पट उत्साह प्राप्त झाला. आणि पुष्कळ हत्ती व पुष्कळ घोंडेस्वार व असंख्य पायदळही त्याज बरोबर निघालें. अशा थाटानें तो चंद्रापीड वनांत गेला.

वनांत गेल्यावर चंद्रापीडानें माणसांकडून कोलाहल करवून वनपशु पिटाळून बाहेर काढलें असतां त्यांच्या पाठीस लागून कर्णापर्यंत धनुष्य ओढून नाराचसंज्ञक बाणांनीं मदोन्मत्तगज, सिंह, चमरीमृग, रानडुकरें, हरिण इत्यादि नानाप्रकारचे हजारों वनपशु मारिले, आणि बलाढ्यपणाच्या योगानें कांहीं वनपशु जिवंत ही धरिले. असें करतां करतां सूर्य मध्यान्हीं आला. चंद्रापीडाचा घोडा धांवण्याच्या श्रमामुळें घमादकानें थबथबून गेला, आंगांतून फेंसाचे ठिपके गळूं लागले, लगामाच्या घर्षणानें मुखापासून रक्तबिंदु निघाले, आणि मस्तकावर लावलेले कोमल पल्लव व पुष्पगुच्छ पडून गेले. अशा घोड्यावर बसलेला चंद्रापीड ही घामानें भिजून गेला, व कवचावर वनपशूंच्या रक्ताचे बिंदु उडाल्यामुळें ज्याची कांति तांबडी झाली आहे, वनपशूंच्या पाठीमागून धांवतांना छत्र धरणारे दूर राहिल्यामुळें ज्यानें उष्णनिवारणार्थ आपल्या हातांत वृक्षाचा पल्लव धरिला आहे, व जो वनलतांच्या अनेकवर्ण रेणूंनीं धूसरवर्ण झाल्यामुळें मूर्तिमंत वसंतऋतुच काय असा शोभत आहे, व अश्वखुरांनीं उडालेल्या धुळीनें ज्याचा ललाटप्रदेश व्याप्त झाला आहे, व पायदळ दूर राहिल्यामुळें ज्याचा अग्रभाग शून्य झाला आहे, आणि वेगवंत अश्वांवर बसून बरोबर चाललेले कांहीं थोडे राजपुत्र ह्यांजबरोबर असा सिंह, असा रानडुकर, असा वनमहिष, असा शरभ, असा हरिण, अशाप्रकारें तोच मृगयावृत्तांत बोलत आहे, अशा प्रकारचा तो चंद्रापीड त्या वनांतून आपल्या मंदिरास आला.

मंदिरास आल्यावर त्या चंद्रापीडानें अश्वावरून उतरून सेवकांनीं त्वरेनें आणलेल्या आसनावर बसून आंगांतील कवच काढून मृगयेचा पोषाख काढून टाकला, आणि चोहोंकडून विंझण्यांचा वारा चालू झाल्यामुळें श्रमरहित होऊन मुहूर्तमात्र विश्रांति घेतली.

तदनंतर जिच्यामध्यें रत्नमय, रौप्यमय, सुवर्णमय, असे शेंकडों घट जलपूर्ण करून ठेविले आहेत, व जिच्यामध्यें स्नानकरावयास बसावया-

साठीं सुवर्णाचा चौरंग ठेविला आहे, अशा स्नानशाळेंत तो चंद्रापीड गेला. तेथें स्नानविधि करून निर्मळ शरीर होऊन स्वच्छ वस्त्रें नेसून शालनाम्याच्या रुमालानें मस्तक वेष्टून अंगराग लावण्याच्या स्थलावर जाऊन बसला. इतक्यांत राजानें पाठविलेल्या व विलासवती राणीनें पाठविलेल्या व दुसऱ्या राजस्त्रियांनीं पाठविलेल्या दासी पेटाऱ्यांत घातलेले नाना प्रकारचे अलंकार व वस्त्रें व पुष्पें व अंगराग, घेऊन आल्या, आणि त्या चंद्रापीडा पुढें उभ्या राहिल्या मग आणलेले सर्व पदार्थ पेटाऱ्यांतून काढून क्रमानें राजपुत्रापुढें ठेवित्या झाल्या. तदनंतर तो चंद्रापीड ते सर्व उपचार घेऊन त्यांतील अंगराग प्रथम वैशंपायनाच्या आंगास आपल्या हातानें लावून मग आपल्या आंगास लावून आपल्या जवळ जे राजपुत्र बसले होते त्या सर्वांस देऊन सर्वांसहवर्तमान यथायोग्य वस्त्रें पुष्पें अलंकार ह्यांचें धारण करून तारागणांनीं शोभणाऱ्या आकाशाप्रमाणें रत्नखचित हजारों पात्रांनीं शोभणाऱ्या आहार मंडपांत गेला.

तदनंतर तेथें तो चंद्रापीड मृदु आणि विचित्रवर्ण अशा आसनावर बसून जवळ बसलेला व भोज्य पदार्थांचें वर्णन करणारा जो वैशंपायन त्या सहवर्तमान, व यथायोग्य स्थानीं बसविलेले जे राजपुत्र त्यां सहवर्तमान, ह्याला हा पदार्थ वाढा असें आदरपूर्वक प्रसाद सुचवीत होत्साता भोजनविधि संपादिता झाला. तदनंतर आंचवून तांबूल घेऊन तेथेंच मुहूर्तमात्र बसून जेथें इंद्रायुध नामक अश्व बांधिला होता त्या ठिकाणीं तो गेला. तेथें उभ्या उभ्यांनींच ज्या गोष्टींमध्यें त्या अश्वाचेंच वर्णन प्रायः आहे अशा गोष्टी बोलून जवळ सेवकजन असतांहीं आपल्या हातानेंच त्या अश्वापुढें तृण टाकून तेथून निघून तो राजमंदिरांत गेला, आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें क्रमानें पिता आणि माता ह्यांचें दर्शन घेऊन आपल्या मंदिरांत गेला, आणि मित्रमंडळीसहवर्तमान हास्य क्रीडा विनोद करीत त्यानें तो दिवस घालविला.

तदनंतर दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सर्व अंतःपुरांतील सेवक मंडळीचा नायक व राजास परम मान्य असा कैलास नांवाचा चोबदार एक कन्या बरोबर घेऊन चंद्रापीडाकडे आला. ती कन्या अशी होती कीं, जी पूर्ववयांत वर्तणारी, जिला नुकतेंच तारुण्य प्राप्त झालें आहे,

जी राजगृहांत राहून प्रौढतेस पावली असून विनयसंपन्न, जिनें रक्तवस्त्राचा बुरखा घेतला आहे, जी आपल्या अंगलावण्याच्या प्रभेनें राजपुत्राचें मंदिर भरून टाकणारी, जी भूमंडलावर अवतरलेली चंद्रकलाच काय, व जी राजमंदिराची देवताच काय, जिच्या पायांत शब्दायमान नूपुरें शोभत आहेत, जिच्या जघनस्थलावर सुवर्णमय मेखला विराजमान आहे, जिचे स्तन पूर्णतेस आले नसतांही उन्नत दिसत आहेत, जिच्या गळ्यांतील नवरत्नहाराचे किरण चहूंकडे पसरत आहेत, जिचे ओंठ भक्षिलेल्या तांबूलानें रंगलेले आहेत, जिची नासिका सरळ असून उच्च आहे, जिचे नेत्र प्रफुल्लित शुभ्र कमलाप्रमाणें दिसत आहेत, जिच्या गालांवर रत्नकुंडालांची कांति पडली आहे. जिच्या ललाटावर चंदनाचा तिलक आहे, जिच्या आंगावर मोत्यांचे अलंकार आहेत, जिनें आपल्या अंगास केशराची उटी लाविली आहे, जिचें चालणें हस्तिनी सारखें मंदमंद होत आहे, जिचा मध्यभाग फार सूक्ष्म दिसत आहे, जिचा आकार महत्त्व सूचक आहे, अशा प्रकारची कन्या घेऊन आलेला चोबदार चंद्रापीड राजपुत्रानें पाहिला.

तदनंतर त्या चोबदारानें पुढें सरून भूमीस उजवा हात लावून चंद्रापीडास प्रणाम करून विज्ञापना केली कीं, हे राजकुमारा, महाराणी विलासवती आज्ञा करीत आहे कीं, पूर्वी महाराजानें कुलूत राजधानी जिंकून कूलूतेश्वराची पत्रलेखा नांवाची ही कन्या लहान असतांच बंदीजनाबरोबर आणून अंतःपुरांतल्या परिचारिकांमध्यें ठेविली होती ती मी, ही अनाथ राजकन्या आहे असें मनांत आणून, परम स्नेहानें आजपर्यंत पाळिली व वाढविली. तर आतां ही तुझी तांबूलकरंडक वाहणारी करावी असें जाणून तुजकडे पाठविली आहे. हिला तूं आपणापाशीं ठेवून घे. हिला सामान्य परिजना प्रमाणें पाहूं नये. आपल्या मुली प्रमाणें हिचें लालन पालन करावें. आपल्या चित्तवृत्ती प्रमाणें चापल्यापासून हिचें निवारण करावें. ही आपल्या शिष्ये सारखी पहावी, सुह्रदाप्रमाणें सर्व विश्वासाच्या कामांत ही अंतरंग करावी. मीं ही मुलगी फार दिवस वाढविली ह्याजमुळें हिजविषयीं माझा अत्यंत स्नेह वृद्धिंगत होऊन मुलीसारखें माझें चित्त हिजवर लागून राहिलें आहे, आणि हिजविषयीं माझा मोठा पक्षपात आहे. ही मोठ्या कुलीन

राजाच्या वंशांत उत्पन्न झालेली आहे. कांहीं दिवसांनीं हिचें नम्रत्व पाहून तुझी खातरी होईलच, परंतु माझी हिजवर फार प्रीति आहे, व तुला हिचें शील विदित नाहीं म्हणून असा इतका निरोप पाठविला आहे, तर तूं हिला आपल्या जवळ ठेवून सर्व प्रकारें तसा प्रयत्न कर कीं, जशी ही फार दिवसपर्यंत तुझी योग्य परिचारिका होईल. असा विलासवती राणीचा निरोप सांगून ती कन्या पुढें करून तो चोबदार उगाच उभा राहिला असतां, जिनें यथायोग्य रीतीनें प्रणाम केला आहे, अशा त्या पत्र लेखेकडे स्तब्ध दृष्टीनें चिरकाळ अवलोकन करून, जशी मातृश्रीची आज्ञा, असें बोलून त्या चंद्रापीडानें चोबदारास जावयास आज्ञा दिली.

तदनंतर त्या चंद्रापीडनामक राजपुत्राला पाहतांच त्याची सेवा करण्याविषयीं जिला पराकाष्टेची प्रीति उत्पन्न झाली आहे, अशा त्या पत्रलेखेनें त्या राजपुत्राचा पार्श्वभाग छायेप्रमाणें दिवसास व रात्रीस, तो राजपुत्र निजला असतां किंवा बसला असतां, किंवा उभा असतां किंवा फिरत असतां, किंवा राजमंदिरांत जात असतां, सोडला नाहीं; आणि ती दृष्टीस पडल्या दिवसापासून चंद्रापीडाचीही प्रीति तिजवर दिवसानुदिवस अधिक वाढत चालली, आणि प्रति दिवशीं तिजवर तो अधिक प्रसाद करूं लागला. शेवटीं त्या राजपुत्रानें सर्व विश्वासाच्या कामांत तिला आपल्या हृदयाप्रमाणें मानिलें.

अशा प्रकारें कांहीं दिवस गेले असतां त्या चंद्रापीडास यौवराज्याचा अभिषेक करावा असें मनांत आणून तारापीड राजानें द्वारपालांस अभिषेकाच्या साहित्याची सामग्री मिळविण्याविषयीं आज्ञा केली तदनंतर ज्यास यौवराज्याचा अभिषेक करण्याचा समय जवळ आला आहे, असा चंद्रापीड नामक राजपुत्र, एके समयीं, शुकनास प्रधानाच्या भेटीस गेला असतां, तो प्रधान आपल्या दर्शनास राजपुत्र आला आहे, असें पाहून तो राजपुत्र मुळचा विनयसंपन्न असतांही अधिक विनयसंपन्न करावा अशा इच्छेनें त्याशीं विस्तारें करून बोलता झाला.

हे बापा चंद्रापीडा, तूं जें जाणावयाचें तें सर्व जाणलें आहे, व सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें आहे, म्हणून तुला उपदेश करावयाजोगें कांहीं राहिलें नाहीं, तथापि तुला सांगतों. तारुण्याच्या योगानें जें तम ( अं-

धकार, पक्षीं अज्ञान ) उत्पन्न होतें तें सूर्यकिरणांनीं किंवा रत्नप्रभांनीं किंवा दीपप्रकाशांनीं नष्ट व्हावयाचें नाहीं, असें गहन असतें. आणखी लक्ष्मीच्या योगानें जो मद उत्पन्न होतो तो परिणामींही उपशम पावणारा नव्हे असा भयंकर असतो. तसेंच ऐश्वर्याच्या योगानें जें नेत्रांस आंध्य येतें तें अंजनशलाकेनेंही जावयाचें नाहीं असें कष्टकारक असतें. गर्वाच्या योगानें जो दाह उत्पन्न होतो तो शीतलोपचारांनीं शांत व्हावयाचा नाहीं असा तीव्र असतो. विषयरूप विषाच्या सेवनानें जो मोह उत्पन्न होतो तो मणिमंत्र औषधि ह्यांनीं दूर व्हावयाचा नाहीं असा प्रबळ असतो. विषयाभिलाषरूप मलाचा जो लेप बसतो तो जलक्षालनानें जावयासारखा नाहीं असा बळकट असतो. राज्यसुखरूप जी निद्रा प्राप्त होते ती रात्र सरली तरी जागृति होत नाहीं अशी घोर असते. म्हणून मी तुझ्याशीं निःशंकपणानें भाषण करितों. गर्भश्रीमंती, व नूतन तारुण्य, व अनुपम सौंदर्य व अमानुषशक्ति, हीं निश्चयेंकरून मोठ्या अनर्थपरंपरेस कारण आहेत. ह्यांपैकीं एक गुण जरी असला तरी तो सर्व प्रकारच्या अविनयाचें घर होतो. मग सर्व गुण एकत्र मिळाले असतां अविनयाचें घर म्हणून सांगावयास नको. जरी बुद्धि शास्त्ररूप जळानें प्रक्षाळित केल्यामुळें निर्मळ झाली असली, तरी ती यौवनाच्या आरंभीं प्रायः मलिन होते. रजःकणयुक्त वावटळीसारखी जी तरुण पुरुषाची रजोगुणी प्रकृति ती त्याला कोणीकडे उडवून नेईल ह्याचा नियम नाहीं. तरुण पुरुषाचीं इंद्रियें हींच हरिणें तीं विषयरूप मृगजळास भुलून दुष्टपरिणामदशेस पावतात. तारुण्याच्या योगानें ज्याचें अंतःकरण तुरट झालें त्या पुरुषास विषयभोग उदकाप्रमाणें मधुर लागतात. विषयांचेठायीं झालेला अत्यासंग पुरुषास सन्मार्गापासून भ्रष्ट करितो. हे चंद्रापीडा तुझ्यासारखे जे पुरुष आहेत तेच अशा उपदेशास पात्र होतात. स्फटिक मण्यांत जसे चंद्राचे किरण प्रविष्ट होतात तसे त्यांच्या निर्मल अंतःकरणांत उपदेशाचे गुण सुखानें प्रविष्ट होतात. गुरूचें वचन उत्तम जरी असलें, तरी अयोग्य पुरुषाच्या कर्णांत शिरलें असतां त्यास शूल उत्पन्न करितें. तेंच योग्य पुरुषाच्या कानांस भूषण होतें. चंद्र जसा अंधकाराचें निवारण करितो तसा गुरूचा उपदेश सर्वदोषांचें निवारण करितो. त्वां अजून विषयर-

ह्याचें अस्वादन केलें नाहीं, म्हणून तुला उपदेश करण्याचा हाच काळ योग्य आहे. कारण कीं, ह्रदय कामबाणांच्या प्रहारांनीं जर्जरित झालें म्हणजे त्या ह्रदयांतून उपदेश भिन्न पात्रांतून जल गळतें तसे गळून जातात. ज्यांची प्रकृति दोषयुक्त होते त्यांस उत्तम कुल किंवा शास्त्रश्रवण हीं विनय उत्पन्न होण्यास कारण होत नाहींत. गुरूचा उपदेश हा पुरुषांस संपूर्ण मलांचें क्षालन करण्याविषयीं समर्थ असें जलस्नानच होय, व जरा दोषरहित वृद्धत्व होय, व मेदोवृद्धिरूप दोषरहित पुष्टिच होय, व सुवर्ण विकाररहित आभरणच होय; व ज्योतीवांचून प्रकाशच होय, व त्रास न देणारा जागरच होय हे सर्व प्रकार राजेलोकांस विशेषेंकरून असतात, कांकीं त्यांस उपदेश करणारे विरळ आहेत. प्रायः सर्वजन भयानें किंवा लोभानें राजाच्या वचनास अनुमोदन देणारेच असतात. गर्वाच्या सुजेनें ज्यांच्या कानांचीं भोंकें बुजून गेलीं असे राजेलोक कोणाचें वचन ऐकत नाहींत, आणि ऐकूनही मदोन्मत्त गजाप्रमाणें डोळे झांकून गुरूपदेशाचा तिरस्कार करून गुरूच्या चित्तास खेदमात्र देतात. त्यांचीं धनेंही त्यांस खोटा अभिमान व उन्माद उत्पन्न करणारीं होतात, आणि राजलक्ष्मीही राज्यरूप विषाच्या योगानें मोह आणि आलस्य देणारी होते.

हे चंद्रापीडा, तुला आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा आहेच. तर तूं प्रथम ह्या लक्ष्मीकडे विचार दृष्टीनें पहा, ही कशी आहे. उत्तम योद्ध्यांच्या खड्गमंडलरूप कमलवनामध्यें विलास करणारी भ्रमरीच होय, अशी ही लक्ष्मी क्षीरसागरापासून निघाली तेव्हां ती आपल्या कितीएक बांधवांचे गुण घेऊन निघाली. ते असे, पारिजात वृक्षापासून लोभनीयता म्हणजे आवडतेपणा, चंद्रकलेपासून वक्रता, उच्चैःश्रव अश्वापासून चंचलता, कालकूट विषापासून मोहनशक्ति, मद्यापासून मादकता, कौस्तुभ मण्यापासून कठोरता. इतके गुण हिच्या आंगीं त्यांच्या सहवासानें आले आहेत असें वाटतें. ह्या जगांत हिच्यासारखें दुसरें कोणतेंही वस्तु परिचय न बाळगणारें असें नाहीं. ही अनार्या स्त्रीप्रमाणें प्राप्त झाली तरी मोठ्या कष्टानें पाळावी लागते. गुणरूप दृढ पाशांनीं बांधून ठेविली तरी पळून जाते. अत्यंत शूर अशा हजारों योद्ध्यांनीं तरवारीच्या पिंजऱ्यांत घालून ठेविली तरी निघून जाते. ही

कोणाचा परिचय राखीत नाहीं. बहुत दिवस राहिलेल्या स्थलाकडे पाहत नाहीं. सौंदर्याकडे पाहत नाहीं. कुलक्रमाचें अनुवर्तन करीत नाहीं. शीलाकडे पाहत नाहीं. चातुर्याची गणना करीत नाहीं. शास्त्राचा बोध ऐकत नाहीं. धर्माचा अनुरोध ठेवीत नाहीं. दानाचा आदर करीत नाहीं. विशेषज्ञतेचा विचार करीत नाहीं. आचाराचें पालन करीत नाहीं. सत्य जाणत नाहीं. कोणत्याही लक्षणास प्रमाणभूत करीत नाहीं. ही लक्ष्मी गंधर्व नगर पंक्तीप्रमाणें पाहतां पाहतां नष्ट होते. अपवित्र पदार्थाचा जसा स्पर्श न करावा, तसा गुणवान् पुरुषाचा स्पर्शही करीत नाहीं. तसेंच अमंगल पदार्थाचा जसा बहुमान न करावा, तसा उदारसत्व पुरुषाचा बहुमान करीत नाहीं.

मी तसा कोणी पुरुष पाहत नाहीं कीं जो अपरिचित लक्ष्मीनें परिपूर्ण आलिंगिला नाहीं, आणि त्याची वंचना केली नाहीं. अशा प्रकारची दुराचार जी लक्ष्मी तिनें कसे तरी दैवयोगास्तव स्वीकृत केलेले राजे सामर्थ्यहीन होतात, आणि सर्व प्रकारच्या अविनयाचें स्थान होतात. राजे राजपदारूढ झाले म्हणजे त्यांच्या आंगीं प्रायः सद्गुणांचा ऱ्हास होऊन दुर्गुणांची वृद्धि होते. तर अशा प्रकारें कुटिल व कष्टकारक हजारों व्यापारांनीं भयंकर असें जें हें राज्यतंत्र आणि महामोहरूप अंधकारानें व्याप्त असें जें यौवन ह्यांमध्यें, हे राजकुमारा, तूं असा प्रयत्न ठेव कीं, लोक आपली अगदीं थट्टा करणार नाहींत; व साधुजन निंदा करणार नाहींत, व गुरुजन धिक्कार करणार नाहींत; व सुहृज्जन विटंबना करणार नाहींत, व विद्वज्जन वाईट म्हणणार नाहींत; व विटजन प्रतारणा करणार नाहींत; व कुशल पुरुष उपहास करणार नाहींत, व जार पुरुष लुटणार नाहींत; व सेवकजन लांडग्याप्रमाणें तोडणार नाहींत; व धूर्तजन वंचना करणार नाहींत, व स्त्रिया फसविणार नाहींत, व लक्ष्मीचा डौल वाढणार नाहीं, व मद उन्माद देणार नाहीं, व मदन मोह करणार नाहीं, व विषयसुख आक्षिप्त करणार नाहीं. जरीं तूं स्वभावानें अत्यंत गंभीर असून तुझ्या पित्यानें मोठ्या प्रयत्नानें मोठा विद्वान् केलेला आहेस, आणि धनें तर चंचलस्वभाव व अज्ञान अशा पुरुषांसच उन्मत्त करणारीं आहेत, तरी तुझे गुण पाहून माझ्या मनास जो संतोष झाला आहे

तोच मजकडून बोलवितो, म्हणून मी तुला पुन्हा सांगतों, विद्वान्, ज्ञानी, महासत्वसंपन्न, कुलीन, अत्यंत गंभीर आणि महाप्रयत्नवान् अशा प्रकारच्या पुरुषालाही ती दुर्विनीत लक्ष्मी अत्यंत नीचत्वास आणिते. याजकरितां तुझा पिता तुला नवीन यौवराज्याभिषेक करणार आहे, त्या मंगलमहोत्सवाचा कल्याणकारक गुणांनीं अनुभव घेऊन कुलक्रमानें आलेला व पूर्वजांनीं चालविलेला जो राज्यकारभार तो त्वां चालवावा, आणि शत्रूंचीं मस्तकें वांकवावीं, आपल्या बंधुवर्गास उच्चतेप्रत आणावें, आणि अभिषेक होतांच दिग्विजय करावयाकरितां चारी दिशांकडे फिरून तुझ्या पित्यानें जिंकलेली जी सप्तद्विपवती समुद्रवलया वसुंधरा पृथ्वी ती पुन्हा जिंकावी. कारण कीं प्रतापारूढ होण्याचा हा तुझा काळ आहे. आणि प्रतापारूढ झालेला राजा एका ठिकाणावर बसूनही सिद्धपुरुषाप्रमाणें त्रैलोक्याचें अवलोकन करणारा होतो. असें बोलून तो शुकनास प्रधान उगाच बसला.

तो शुकनास प्रधान असें बोलून उगा राहिला असतां तो चंद्रापीड राजपुत्र त्या निर्मळ उपदेशवाक्यरूप जळांनीं प्रक्षाळितच काय, किंवा उन्मीलितच काय, किंवा स्वच्छीकृतच काय, किंवा अभिषिक्तच काय, किंवा अलंकृतच काय, किंवा पवित्रीकृतच काय, किंवा उद्भासितच काय, असा होत्साता प्रीतांतःकरण होऊन मूहुर्तमात्र तेथें राहून आपल्या मंदिरास गेला.

तदनंतर कांहीं दिवस गेल्यावर उपाध्यायांनीं राज्याभिषेकाचें सर्व साहित्य व मंगलकारक सर्व पदार्थ जमविले असतां तारापीड राजानें आपल्या हातांत मंगलकलश घेऊन शुकनासप्रधानासहवर्तमान व हजारों राजेलोकांसहवर्तमान सर्व तीर्थांपासून, व सर्व नद्यांपासून, व सर्व समुद्रांपासून, आणलेलें जें जल तें सर्व औषधि, सर्व फलें, सर्व मृत्तिका, सर्व रत्नें ह्यांनीं युक्त करून व मंत्रानें पवित्र करून आपल्या आनंदाश्रूनें मिश्रित अशा त्या जलानें उत्तम दिवशीं आपला पुत्र चंद्रापीड ह्यास राज्याभिषेक केला. अभिषेक होतांक्षणींच जशी एखादी लता पूर्वी ज्या वृक्षावर आरूढ झालेली असते त्या वृक्षास न सोडतां दुसऱ्या जवळच्या वृक्षावर आरूढ होते, तशी राजलक्ष्मी तारापीड राजास न सोडतां अभिषेकजलानें आर्द्रशरीर अशा चंद्रापीडावर आरूढ झाली. तदनंतर सर्व अंतः-

पुरस्त्रियांस बरोबर घेऊन आलेल्या विलासवती राणीनें प्रेमेंकरून ज्याच्या सर्वांगास शुभ्रवर्ण चंदनाचें विलेपन केलें आहे, व ज्याच्या मस्तकावर शुभ्र पुष्पांचा तुरा लावला आहे, व ज्याच्या देहास गोरोचन लाविलें आहे, व ज्याच्या कर्णावर दूर्वा, पल्लव, ह्यांचें भूषण ठेविलें आहे, व चंद्राप्रमाणें पांढरें स्वच्छ असें पट्टवस्त्रांचें युग्म ह्याचें ज्यानें धारण केलें आहे, व उपाध्यायानें ज्याच्या हातांत कंकण बांधिलें आहे, व नक्षत्रांसारख्या तेजस्वी मुक्ताफळांचा हार ज्याच्या वक्षस्थळावर लोंबत आहे, व श्वेतपुष्पांचे हार ज्याच्या खांद्यापासून पायांपर्यंत लोंबत आहेत, आणि तारापीड राजा आपल्या हातांत वेत्रदंड घेऊन स्वतः ज्या पुढें उभा राहून लोकांचें निवारण करीत आहे, असा चंद्रापीडनामक राजकुमार सभामंडपांत येऊन सुवर्णपर्वताच्या शृंगावर जसा चंद्रमा आरूढ होतो, तसा सुवर्णमय सिंहासनावर आरूढ झाला.

सिंहासनारूढ झाल्यावर चंद्रापीडानें सर्व राजमंडळाचा यथायोग्य सन्मान करून मुहूर्तभर त्या सिंहासनावर स्थिति केली. तों इतक्यांत दिग्विजयासाठीं प्रस्थान करण्याचा सूचक आणि प्रळयकाळच्या मेघांच्या गर्जनेप्रमाणें मोठा गंभीर असा दुंदुभिध्वनि झाला. तो दुंदुभि वाजतांच त्याच्या ध्वनीनें सर्व दिशांचीं अंतरें भरून गेलीं. तो ध्वनि ऐकून शेषाचें मस्तक कांपलें, दिग्गजांस भय पडलें, सूर्याचे रथाचे अश्व भ्रांत झाले, लोकपालांचे कर्ण बधिर झाले, अशा प्रकारें तो नाद त्रिभुवनांत पसरला.

तो दुंदुभीचा नाद ऐकतांच ज्याच्या भोंवतीं राहिलेल्या लोकांच्या मुखापासून जयजयकार शब्द चालला आहे, असा तो चंद्रापीड सिंहासनावरून शत्रूंच्या संपत्तींसहवर्तमान चलित झाला. चंद्रापीड उठतांच त्याच्या भोंवतीं बसलेलें सर्व राजमंडळ मोठ्या गडबडीनें उठलें. तेव्हां जी मोठी दाटी झाली त्या दाटींत परस्पर घर्षण होऊन त्यांच्या गळ्यांतले मोत्यांचे हार तुटून मोत्यें चोहोंकडे विखरलीं त्यामुळें असें वाटलें कीं, दिग्विजयार्थ प्रस्थान करणाऱ्या चंद्रापीडावर मंगलार्थ उडविलेल्या लाह्याच ह्या पसरल्या आहेत काय. अशा त्या राजमंडळानें वेष्टित होत्साता सभामंडपांतून निघाला, आणि प्रस्थानकालीं घालावयाचे जे अलंकार ते सर्व जिला घातले आहेत, व जी माहातानें त्वरेनें आणून पुढें उ-

भी केली आहे, अशा हत्तिणीवर प्रथम चित्रलेखेला चढवून मग आपण माहाताच्या हस्ताचा अवलंब करून अंबारींत बसून त्या चंद्रापीडानें दिग्विजयार्थ प्रस्थान केलें. तेव्हां सर्व राजे पुढें होऊन नगरद्वाराजवळ उभे राहून चंद्रापीडाची स्वारी येण्याची वाट पाहत होते. ते चंद्रापीड नगरद्वारा बाहेर येतांच मोठ्या त्वरेनें पुढें होऊन त्या चंद्रापीडास प्रणाम करून चंद्रापीडाबरोबर चालते झाले. आणखी त्याच्या मागेंच मोठा जो मदोन्मत्त गंधमादन नामक गज तो चालविला होता, आणि पुढें इंद्रायुध नामक अश्व चालविला होता, आणि भूमीवर चालणारा समुद्रच काय अशा प्रकारचें विस्तीर्ण सैन्य त्याजबरोबर चाललें होतें. अशा समारंभानें तो चंद्रापीड हळूहळू प्रथम पूर्व दिशेकडे चालता झाला.

अशा प्रकारें तो चंद्रापीड सैन्य घेऊन दिग्विजयार्थ निघाला असें समजतांच वैशंपायननामक प्रधानपुत्र प्रस्थानकाळीं करावयाचीं सर्व मंगळकृत्यें करून दुकूलवस्त्रें नेसून पांढरीं पुष्पें आंगावर घालून व पांढरें चंदन आंगास लावून आपल्या बरोबर पुष्कळ सैन्य व राजमंडळ घेऊन श्वेतच्छत्राचें धारण करून जणो दुसरा युवराजच असा शोभणारा होत्साता शीघ्रगमन करणाऱ्या हत्तिणीवर आरूढ होऊन त्वरेनें चंद्रापीडाच्या मागोमाग जाऊन त्याचा निकटवर्ती झाला. जिकडे तिकडे युवराजाची स्वारी निघाली असा शब्द ऐकून त्वरेनें धांवणारें जें सैन्य त्याच्या भारानें त्याक्षणीं सर्व धरणी कंपित झाली. त्यावेळेस चंद्रापीडास सामोरे येणारे व प्रणाम करणारे जे दुसरे राजेलोक त्यांच्या मस्तकांवरील मुकुटांच्या व बाहूंवरील भूषणांच्या कांतींनीं दशदिशा व्यापून गेल्या. त्यांच्या मस्तकांवरील छत्रें जरी श्वेत होतीं तरी चित्रविचित्र मुकुटरत्नांच्या कांतींनीं कर्बुरवर्ण होऊन मयूरपिच्छांनींच केलीं आहेत अशीं शोभूं लागलीं.

त्याकाळीं क्षणमात्रेंकरून सर्व भूतल अश्वमय झालें, सर्व दिग्मंडल गजमय झालें, अंतरिक्ष छत्रमय झालें, आकाशतल ध्वजमय झालें, वायु गजगंधमय झाला, सर्व देश राजमय झाले, दिशा चामरमय झाल्या आणि सर्व त्रिभुवन जयजयशब्दमय झालें. आणखी समुद्राच्या चंचल लाटांप्रमाणें जिकडे तिकडे धांवणाऱ्या अश्वपंक्ति व गजपंक्ति ह्यांच्या योगानें, व मेघगर्जनेप्रमाणें गंभीर जे दुंदुभीचे ध्वनि होत होते त्यांच्या

योगानें, व गज अश्व ह्यांचे जे कठोर शब्द वारंवार होत असत त्यांच्या योगानें व सैन्याच्या धांवण्यानें सर्व दिशांस व्यापणारा जो धुरळा उठला त्याच्या योगानें, व मदोन्मत्त गजांच्या गंडस्थळापासून सतत पडणारी जी मदोदकवृष्टि तिच्या योगानें, व भूलोकास व्यापणारा जो सैन्याचा कलकलाट त्याच्या योगानें, हा महाप्रलयकालच काय प्रादुर्भूत झाला असें वाटूं लागलें.

त्याकाळीं जसें नव्या उदकानें प्रफुल्लित कमलवन व्याप्त होतें तसें क्षीरसमुद्राच्या फेंसाप्रमाणें पांढरा जो भूमीवरचा उडालेला धुरळा त्यानें आकाशतल व्यापून गेलें, सूर्याचें बिंब निष्प्रभ झालें, व आकाशगंगेचें पाणी गढूळ झालें. तो धुरळा पाहून असें वाटलें कीं चंद्रापीडाच्या सैन्याच्या अतिशयित भाराचें सहन होईना ह्मणून धुरळ्याच्या मिषानें पृथ्वी स्वर्गलोकासच चालली काय.

तदनंतर कांहीं वेळानें मदस्रावी गजांच्या कर्णवातांनीं, चोहोंकडे पसरणाऱ्या दानोदकांच्या वृष्टींनीं, व गजांच्या शुंडादंडापासून चोहोंकडे पसरणाऱ्या अंबुकणांच्या वृष्टींनीं, व घोड्यांच्या हेंसण्यांनीं इतस्ततः पसरणाऱ्या लाळेच्या कणाच्या समुदायांनीं तो धुरळा शांत झाला असतां पुन्हा सर्व दिशा प्रकाशित व स्वच्छ झाल्या तेव्हां तें सर्व सैन्य समुद्राच्या उदकांतून काय वर निघालें असें वाटलें. असें तें अपरिमित सैन्य पाहून तो वैशंपायन प्रधानपुत्र आश्चर्ययुक्त होऊन चोहोंकडे दृष्टि देऊन चंद्रापीडाशीं बोलूं लागला, हे युवराज चंद्रापीडा, महाराज तारापीड ह्यानें कोणतें जिंकिलें नाहीं, कीं जें तूं जिंकिशील; व त्यानें कोणत्या दिशा वश केल्या नाहींत, कीं ज्या तूं वश करशील; व कोणते किल्ले हस्तगत केले नाहींत, कीं जे तूं हस्तगत करशील; व कोणतीं द्वीपांतरें आपलींशीं केलीं नाहींत, कीं जीं तूं आपलींशीं करशील व त्यानें कोणतीं रत्नें संपादित केलीं नाहींत, कीं जीं तूं संपादित करशील. त्यानें जो सर्वत्र जय मिळविला तोच त्वां मिळविला. पित्यासारखाच तुझा प्रभाव आहे. कांकीं कोणते राजे तुला नम्र झाले नाहींत ? कोणत्या राजांनीं तुझ्या सेवेकरितां मस्तकीं अंजलि रचिला नाहीं ? कोणत्या राजांनीं आपल्या ललाटप्रदेशांनीं तुझ्या अंगणाची भूमि प्रणामांनीं गुळगुळीत केली नाहीं ? कोणत्या राजांनीं आपल्या मुकुटांचे मणि तु-

ङ्या पादपीठावर घांसले नाहींत ? कोणी आपल्या हातांत वेताच्या छड्या धरल्या नाहींत, व कोणी तुजवर चामरें वारलीं नाहींत, व कोणी जयशब्द उच्चारला नाहीं ? तर सर्वांनीं ते ते व्यापार केले. आणखी पहा, कीं, समुद्रोदकाप्रमाणें भूमंडलास व्यापणारीं जीं आपापलीं सैन्यें त्यांच्या योगानें गर्व वाहणारे आणि दशरथ, भगीरथ, भरत, दिलीप, अलर्क, मांधाता, ह्यांच्यासारखे प्रतापी, आणि कुलीनपणाचा अभिमान बाळगणारे, आणि मूर्धाभिषिक्त, असे हजारों राजे आपल्या मस्तकांनीं तुझ्या चरणरजांचें धारण करीत आहेत. आणि त्या राजांचीं सैन्यें सर्व दिशा व्यापून उभीं राहून तुझ्या सेवेंत तत्पर आहेत. पहा ज्या ज्या दिशेकडे पहावें त्या त्या दिशेस सैन्यच दृष्टीस पडतें; तर हें रसातलांतूनच काय बाहेर पडतें, किंवा त्यातें पृथ्वीच प्रसवते काय, किंवा दिशाच ओकतात काय, किंवा आकाशमंडळच वर्षतें काय, असें वाटतें. आणि अपरिमित सैन्याच्या भारानें आक्रांत झालेली पृथ्वी महाभारतांतील युद्धप्रसंगाचें स्मरण देत आहे असें मी मानितों. मला हें मोठें आश्चर्य वाटतें कीं, ही पृथ्वी सैन्याच्या भारानें कुलपर्वतांचे बंध तुटून सहस्रधा शकलीभूत होत नाहीं; अथवा सैन्याच्या भारानें पीडित झालेल्या पृथ्वीचें धारण करतांना शेषाच्या भित्तीसारख्या विस्तृत ज्या फणा त्या फुटून जात नाहींत.

असें तो वैशंपायन चंद्रापीडाशीं बोलत असतां तो युवराज चंद्रापीड जिच्यामध्यें मोठमोठीं बहिर्द्वारें केली आहेत, व जिच्यामध्यें तृणमय प्राकाराचीं हजारों मंदिरें आहेत, व जिच्यामध्यें हजारों रमणीय परभवनें केलेलीं आहेत, व शोभायमान शुभ्रवस्त्राचे शेंकडों मंडप केले आहेत, अशा प्रकारच्या निवासभूमीस ( मुकामाच्या स्थानास ) आला. मग त्या ठिकाणीं उतरून चंद्रापीडानें आणि इतर सर्वांनीं स्नान भोजन इत्यादि जीं जीं योग्य कर्में करावयाचीं तीं सर्व केलीं. तदनंतर सर्व राजांनीं व प्रधानांनीं नानाप्रकारच्या गोष्टी सांगून जरी त्या चंद्रापीडाच्या अंतःकरणास करमणूक केली, तरी पित्याच्या वियोगानें ज्याच्या चित्तास खेद होत आहे, अशा त्या चंद्रापीडानें तेथें राहून दुःखानें तो दिवस घालविला. दिवस गेल्यावर रात्रीं आपल्या शय्येजवळ घातलेल्या शय्येवर बसलेल्या वैशंपायनाबरोबर आणि दुसऱ्या बाजूस गा-

लीच्यावर बसलेल्या पत्रलेखेबरोबर ज्या भाषणांत कांहीं पित्याचा संबंध कांहीं मातेचा संबंध, व कांहीं शुकनास प्रधानाचा संबंध अशा प्रकारचीं भाषणें करीत करीत फारशी निद्रा न घेतां प्रायशः जागेपणानेंच तो चंद्रापीड ती रात्र घालविता झाला. अशा प्रकारें प्रतिदिवशीं प्रातःकाळीं उठून दरमजलेस वृद्धिगत झालेल्या सेनासमुदायाच्या योगानें पृथ्वीला जर्जरित करणारा, व पर्वत कंपित करणारा, व नद्या जलरहित करणारा, व सरोवरें कोरडीं करणारा, व अरण्यें चूर्णित करणारा, व विषमस्थलें सम करणारा, व दुर्ग खंडित करणारा, व निम्नस्थलें पूरित करणारा, व पूर्ण स्थलें निम्न करणारा, असा तो चंद्रापीड मजल दरमजल चालता झाला. अशा प्रकारें हळू हळू आपल्या इच्छेनें भ्रमण करणारा तो चंद्रापीड उद्धत पुरुषांस नम्र करीत, व भ्यालेल्यांस आश्वासन देत, व शरणागतांचें रक्षण करीत, व जार पुरुषांचें व चोरांचें उन्मूलन करीत, व शत्रूंचा उच्छेद करीत, व जागजागीं राजपुत्रांचें अभिषेकपूर्वक स्थापन करीत, व उत्तम पदार्थांचा संग्रह करीत, व मांडलिक राजांपासून नजरा व करभार घेत,व देशांची व्यवस्था करीत, व जागजागीं आपल्या चिन्हाचें स्थापन करीत, व परमेश्वराचें कीर्तन करीत, व आज्ञापत्रें लिहीत, व ब्राह्मणांचें पूजन करीत, व ऋषींस वंदन करीत, व आश्रमाचें पालन करीत, व आपणावर प्रजांचा अनुराग संपादीत, व आपला पराक्रम प्रकट करीत, व प्रताप स्थापीत, व कीर्ति प्रसृत करीत, व आपल्या गुणांचा विस्तार करीत, व सच्चरितांचें प्रख्यापन करीत, व आपलें पौरुष प्रदर्शित करीत, व वेलदोड्यांच्या वनांचें मर्दन करीत, व आपल्या सैन्याच्या रेणूंनीं संपूर्ण समुद्राचीं उदकें गढूळ करीत करीत, सर्व पृथ्वीभर फिरला.

त्यामध्यें त्यानें प्रथम पूर्वदिशा जिंकिली, तदनंतर दक्षिणदिशा जिंकिली, तदनंतर पश्चिमदिशा जिंकिली, तदनंतर उत्तरदिशा जिंकिली. अशा क्रमानें तीन वर्षांत त्या चंद्रापीडानें चतुःसमुद्रवलयांकित भूमंडळावर भ्रमण करून सर्व पृथ्वीचे भाग द्वीपांसुद्धां आपलेसे केले. तदनंतर सर्व भूमंडळ जिंकणारा अशा चंद्रापीडानें भूमंडळावर भ्रमण करतां करतां कोणा एका काळीं कैलास पर्वताजवळ संचार करणारे जे हेमजट नांवाचे किरात त्यांचें सुवर्णपुरनामक निवासस्थान पूर्व समुद्रा-

च्या जवळ होतें तें जिंकून घेऊन फिरतां फिरतां श्रम पावलेलें जें आपलें सैन्य त्यास विश्रांति व्हावी म्हणून कांहीं दिवसपर्यंत सैन्यासह्वर्तमान तो तेथेंच राहिला.

तो चंद्रापीड त्या सुवर्णपुरस्थानांत राहत असतां एकेदिवशीं इंद्रायुधनामक अश्वावर आरोहण करून मृगया करण्यासाठीं सैन्यापासून निघाला. तेव्हां त्या चंद्रापीडानें वनांत संचार करतांना पर्वताच्या शिखरावरून खालीं उतरून आलेलें किन्नरयुग्म ( किन्नरजातीच्या स्त्रीपुरुषांचें जोडपें ) पाहिलें. तें पूर्वी त्यानें कधींच पाहिलें नव्हतें, म्हणून त्या चंद्रापीडास मोठें कौतुक वाटून त्याला धरावें अशी त्यास इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्या चंद्रापीडानें अश्वाची प्रेरणा करून त्या किन्नरयुग्माच्या जवळ जाण्यासाठीं प्रयत्न केला तरी, त्या किन्नरयुग्मानें कधीं मनुष्य पाहिलें नव्हतें त्यामुळें त्याला पाहून तें किन्नरयुग्म भिऊन तेथून दूर पळालें. तेव्हां त्याच्या पाठीमागून चंद्रापीडानें आपला घोडा हांकला. घोडा मोठ्या वेगानें त्या किन्नरयुग्माच्या मागून धांवत चालल्यामुळें तो चंद्रापीड आपल्या सैन्यापासून एकटाच दूर गेला. आणि आतां धरीन, आतां धरीन, हें धरलें पहा, हें धरलें पहा, असें मनांत म्हणत म्हणत त्या किन्नरयुग्मानें ज्याचें चित्त आकर्षिलें आहे असा होत्साता असहाय असतांही अश्वाच्या धांवण्याच्या अतिशयित वेगामुळें एका मुहूर्तांत त्या प्रदेशापासून पंधरा योजनें दूर गेला. तेव्हां आपणास धरावयास आपल्या पाठीस मनुष्य लागलें आहे असें त्या किन्नरयुग्मानें जाणून चंद्रापीड पाहत असतां असतां समोरच्या एका पर्वताच्या उच्चशिखरावर आरोहण केलें, आणि तें दिसेनासें झालें.

तदनंतर तें किन्नरयुग्म पर्वतावर चढून जाऊन दिसेनासें झालें असें पाहून पुढें जाणें सोडून त्या किन्नर युग्मावरील दृष्टि काढून भूमीकडे पाहिलें तों अश्वाला चालण्या जोगा मार्ग कोठेंच नाहीं. तेव्हां अश्वावरून खालीं उतरून त्यास हातांत धरून त्या पर्वताच्या शिखरावरून आलेल्या दगडांनीं व्यापलेल्या भूमीवरून तो अडखळत अडखळत चालला. आणि त्या अश्वाचें व आपलें शरीर अत्यंत श्रमामुळें आलेल्या धर्मानें आर्द्र झालें असें पाहून क्षणभर विचार करून आपल्या ठिकाणीं

हांसून चिंतन करूं लागला, असें कीं, अहो! मी लहान मुलाप्रमाणें व्यर्थ इतका आयास कां केला! हें किन्नरयुग्म धरून किंवा न धरून काय कर्तव्य आहे बरें? धरलें तरी काय फळ मिळणार व न धरलें तरी काय हानि होणार! काय हो हा मूर्खतेचा प्रकार, काय ह्या तुच्छ कर्म करण्याविषयीं आदर, व काय हो माझा निरर्थक व्यापाराविषयीं आग्रह, आणि काय हो ही माझी मूर्खत्वाच्या आचरणाविषयीं आसक्ति! उत्तम फल देणारें जें मीं कर्म केलें तें सर्व व्यर्थ गेलें, आणि अवश्य कर्तव्य जें कर्म मीं आरंभिलें होतें तें सर्व विफल झालें. आणि मित्रकार्य जें करावयाचें तें निष्पन्न झालें नाहीं; आणखी जो राजधर्म आरंभिला तोही पुरता झाला नाहीं; आणखी पित्याचें जें कार्य आरंभिलें तेंही शेवटास गेलें नाहीं; आणि पृथ्वी जिंकावयाचा जो व्यापार आरंभिला तोही सिद्ध झाला नाहीं; आणखी मी पिशाचग्रस्ताप्रमाणें आपला सर्व परिवार सोडून इतक्या दूर प्रदेशास कशासाठीं आलों? आणि ह्या घोडतोंड्यांच्या पाठीस उगाच कशासाठीं लागलों? असा विचार करीत असतां इतराप्रमाणें माझा जीवच मला हास्य उत्पन्न करतो. मला हें समजत नाहीं कीं, माझ्या पाठीमागून जें सैन्य येत होतें तें किती लांब राहिलें आहे. हा इंद्रायुध अश्व वाऱ्या सारखा धांवणारा त्याच्या अतिवेगामुळें घोडतोंड्यांकडेसच पाहतांना वृक्ष, लता, गुल्म, पाषाण, ह्यांनीं व्याप्त अशा महावनभूमीवरून येतांना मी मार्गाकडे अवलोकनही केलें नाहीं. ह्यामुळें मार्ग ध्यानांत राहिला नाहीं. आतां परत जावें तरी कसें? कोणास मार्ग पुसावा तर ह्या प्रदेशांत कितीही प्रयत्नानें भ्रमण करून पाहिलें तरी कोणी मनुष्य भेटेल असें वाटत नाहीं. मग सुवर्णपुराचा मार्ग कोण सांगेल? असो. परंतु मीं लोकांच्या मुखानें अशी गोष्ट ऐकिली आहे कीं पृथ्वीवरच्या सर्व प्रदेशांमध्यें उत्तमभागीं शेवटची मर्यादा सुवर्णपुरच आहे, त्याच्या पलीकडे निर्मनुष्य अरण्य आहे. त्याच्या पुढें कैलास पर्वत आहे. आणि कैलास पर्वत तर हा जवळच आहे. तर आतां येथून माघारें परतावें, आणि आपणच एकट्यानें कल्पना करीत करीत केवळ दक्षिण दिशा धरून चालतें व्हावें. मग कसें घडेल तें घडो कारण आपण जे दोष करावे त्यांचें फळ आपलें आपणच अनुभविलें

पाहिजे. असा निश्चय करून त्या चंद्रापीडानें अश्वाचा लगाम डाव्या हातानें धरून तो अश्व माघारा परतविला.

तदनंतर त्या चंद्रापीडानें आणखी मनांत आणिलें कीं, हा सूर्यनारायण प्रखर तेजानें युक्त होत्साता आकाश मंडलाच्या मध्यभागीं आला आहे; आणि हा आपला इंद्रायुध अश्व फार परिश्रांत झाला आहे, तर ह्याला कांहीं दूर्वाग्रांचे ग्रास चारून एखाद्या सरोवरावर किंवा झऱ्यावर किंवा नदीवर नेऊन धुऊन व पाणी पाजून व आपणही पाणी पिऊन एखाद्या वृक्षाखालीं छायेमध्यें दोन घटका विश्रांति घेऊन मग पुढें जावें. असें म्हणून उदकस्थान शोधीत शोधीत इकडे तिकडे पर्यटन करीत असतां एक मार्ग त्याच्या दृष्टीस पडला. तो असा कीं, सरोवरा मधून नुकताच बाहेर निघालेला जो वन्यगजांचा समुदाय त्यांच्या पायांस लागून आलेल्या कर्दमानें ओला झालेला, व त्याच गजांनीं सोंडेनें ओढून आणिलेल्या शेवाळीनें व कमलवल्लींनीं व कमलपुष्पांनीं व कमलकंदांनीं व्याप्त झालेला, असा मार्ग पाहून चंद्रापीडास वाटलें कीं, ह्या मार्गानें गेलों असतां आपणास जलाशय सांपडेल. मग त्याच मार्गास अनुसरून कैलास पर्वताच्या अधोभागानें तो चंद्रापीड कांहीं एक मार्गाचा भाग उल्लंघून पुढें गेला. तो अधोभाग मोठाल्या उंच वृक्षांनीं व्याप्त होता, व गेरु मनशील इत्यादि धातूंनीं चित्रविचित्रवर्ण होता. अशा भागांतून जात असतां कैलास पर्वताच्या ईशान्य दिशेस मोठी दाट विस्तीर्ण अशी एक झाडी त्यानें पाहिली. तेव्हां समोरून आलेला पुष्पांच्या मधुर सुवासानें युक्त, व जलसंसर्गानें शीतल, व जलकणांनीं युक्त, व ज्याचा स्पर्श चंदनरसासारखा सुखकारक असा जो जलतरंगावरचा वारा, त्यानें ज्याचें आलिंगनच केलें काय असा, आणि कमलांतील मकरंदाचें प्राशन करून मत्त झालेल्या कलहंस पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं ज्यास आव्हानच केलें काय असा, जो चंद्रापीड त्यानें त्या झाडीमध्यें प्रवेश केला.

झाडींत प्रवेश करून इकडे तिकडे पाहतो तों अत्यंत मनोहर आणि दृष्टीस आल्हाद देणारें असें अच्छोद नामक सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें. त्या सरोवरांतील उदकाच्या अति स्वच्छत्वामुळें असे तर्क होत असत कीं, हें त्रैलोक्य लक्ष्मीचें मणिमय दर्पणच आहे, काय किंवा भूदेवीचें

स्फटिकमय गृहच आहे काय, किंवा दिशांचा स्रावच आहे काय, किंवा आकाशाचा जलाकार अवतारच काय, किंवा पातळ झालेला कैलास पर्वतच काय, किंवा द्रवलेला हिमालयच काय, किंवा रसतेस पावलेलें चांदणेंच काय, किंवा जलरूप झालेला शिवाचा अट्टहासच काय, किंवा त्रिभुवनाचा पुण्यराशि सरोवर रूपानें राहिला आहे काय, किंवा वैदूर्य मण्यांचा पर्वत उदकरूपानें परिणाम पावला आहे काय, किंवा शरत्कालच्या अभ्रांचा समुदाय द्रवीभूत होऊन एकत्र जमला आहे काय, किंवा वरुणाचा हा आरसेमहालच आहे काय, अथवा हें सरोवर मुनिजनांच्या मनांनीं किंवा सज्जनांच्या गुणांनीं किंवा हरिणांच्या नेत्रप्रभांनीं किंवा मुक्ताफलांच्या किरणांनींच निर्मिलें आहे काय. आणि तें सरोवर जलानें परिपूर्ण भरलेलें असतांही सकल पदार्थ त्यांत प्रतिबिंबित झाल्यामुळें तें जलरहितच आहे असें वाटे. आणि वायूनें उडविलेल्या तरंगसंबंधी जलकणांच्या समुदायांत हजारों इंद्रधनुष्यांची प्रभा दिसत असे त्यामुळें सरोवराच्या रक्षणार्थ इंद्रानेंच हीं धनुष्यें पाठविलीं आहेत काय असें वाटे. त्या सरोवरामध्यें अनेक जातींचीं, अनेक रंगांचीं, असंख्य कमलपुष्पें प्रफुल्लित झालीं होतीं. आणि तटसंबंधी जीं तमालवृक्षांचीं वनें त्यांच्या प्रतिबिंबांनीं त्या सरोवराचा अभ्यंतर प्रदेश अंधकार युक्त दिसत होता त्यामुळें हीं रसातलाचीं द्वारेंच काय असें वाटे. ज्या सरोवरामध्यें नीलकमलांनीं व्याप्त असे कांहीं प्रदेश होते. ते पाहून दिवस असून रात्रि झाली अशा भ्रांतीनें चक्रवाक पक्ष्यांचे जोडे वियुक्त होऊन तेथून जात असत. ज्या सरोवरामध्यें वारंवार मुनिजन स्नान करीत असत, व सिद्ध, गंधर्व, देवांगना, जलक्रीडा करीत असत, ह्यामुळें ज्याचें उदक पवित्र झालें होतें. समुद्राप्रमाणें ज्या सरोवराच्या उदकावर वायूच्या योगानें मोठमोठ्या लाटा उठत असत. ज्या सरोवरामध्यें मीन, कूर्म, मकर, इत्यादि चलचर प्राण्यांचे समुदाय सर्वत्र संचार करीत होते. आणि ज्या सरोवराच्या तीरावर हंस, राजहंस, धार्तराष्ट्र, क्रौंच, चक्रवाक, बक, मयूर, इत्यादि अनेक प्रकारचे पक्षी विहार करीत होते. आणि ज्याच्या तटाच्या जवळील प्रदेशांत अनेक जातींचे वृक्षांचीं वनें होतीं, व त्यांत अनेक जातींचे

पशु व पक्षी आनंदानें फिरत होते. अशा प्रकारचें विस्तीर्ण व अगाध सरोवर चंद्रापीडानें पाहिलें.

तदनंतर तो चंद्रापीड तें सरोवर पाहतांक्षणींच श्रमरहित होऊन आपल्या मनांत म्हणतो कीं, ह्या घोडतोंड्यांच्या पाठीस लागणें जरी निष्फल होतें, तरी हें सरोवर दृष्टीस पडल्यामुळें तें सफल झालें. कां कीं त्या योगानें पहावयास योग्य जे पदार्थ त्यांचा शिरोभाग मीं पाहिला. रमणीय पदार्थांचा शेवट माझ्या दृष्टीस पडला. आल्हाद देणारे पदार्थ त्यांचा अवधि म्यां पाहिला. मनोहर पदार्थांची सीमा आणि प्रीति करण्याचे जे पदार्थ त्यांची परिसमाप्ति आज म्यां पाहिली. आणि दर्शनीय पदार्थांची अवसानभूमि माझ्या दृष्टीस पडली. मला असें वाटतें कीं, ह्या सरोवराचें जल उत्पन्न करून अमृतरस उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवानें आपली सृष्टि दुबार केली. कारण कीं, हें जलही अमृताप्रमाणें सर्व इंद्रियांस आल्हाद देण्याविषयीं समर्थ आहे. पहा कीं, अत्यंत स्वच्छत्वामुळें नेत्रांस प्रीति उत्पन्न करितें, शीतलत्वामुळें त्वचेस स्पर्शसुख देतें, कमलांच्या सुगंधानें घ्राणेंद्रियास तृप्ति करितें, आणि हंसांच्या मधुर शब्दांनीं कर्णेंद्रियांस आनंद देतें, आणि स्वादुत्वानें रसनेंद्रियास आल्हाद देतें. मला असें खचित दिसतें कीं ह्या सरोवराच्या दर्शनाच्या लोभानेंच भगवान् उमापति हा कैलासपर्वत धरून जवळ राहिला आहे. तो विष्णु तरी अमृतरसासारखें मधुर असें ह्या सरोवराचें जल सोडून लवणाच्या रसानें कटु जें समुद्राचें उदक त्यांत शयन करितो, हें त्याला योग्य नाहीं. आणखी मला असें वाटतें कीं, हें सरोवर पूर्वीं नव्हतें म्हणून प्रलयकालीं महावराहाच्या दांताच्या ढुसणीला भ्यालेली पृथ्वी, अगस्त्यमुनीनें प्राशिल्यामुळें ज्याचें उदक अगदीं उणें झालें अशा समुद्रामध्यें शिरली. नाहींतर पातालापर्यंत खोल ज्याचें उदक अशा ह्या सरोवरामध्यें निमग्न होऊन जर ती राहिली असती तर एका वराहाची काय कथा, हजारों महावराह जरी पृथ्वीच्या पाठीस लागले असते तरी ती त्यांस सांपडली नसती आणखी मला निश्चयेंकरून वाटतें कीं प्रलयकालीं चतुर्दश भुवनें वृष्टिजलांत बुडवून टाकणारे जे कालमेघ ते ह्याच सरोवरापासून उदक नेऊन नेऊन उदकाचा संग्रह करीत असतील. आणखी मी असें मानितों कीं, पूर्वीं संपूर्ण ब्रह्मांड जलमय होतें तें सर्व एकत्र

जमून तें ह्या सरोवराच्या मिषानें राहिलें आहे. असें मनांत आणणारा तो चंद्रापीड त्या सरोवराच्या दक्षिण तीरास जाऊन घोड्यावरून खालीं उतरला. त्या दक्षिण तीरचा प्रदेश वालुकामय होता. त्या प्रदेशांत विद्याधरांनीं जागजागीं वालुकेचीं लिंगें करून कमलपुष्पांनीं पूजिलीं होतीं. शिवाचे गण त्या सरोवरांत स्नान करून बाहेर निघाल्यावर सर्वांगास भस्म लावीत, त्यामुळें जिकडे तिकडे भस्म पडलें होतें-जलमाणसें जवळच्या शिलातलावर बसून ऊन घेत होतीं. त्या ठिकाणीं चंद्रापीडानें घोड्यावरचें खोगीर काढून त्यास वाळवेंत लोळविलें. आणि सरोवरांत नेऊन त्यास पाणी पाजिलें. नंतर बाहेर आणून त्याचा लगाम काढून सोन्याच्या सांखळीनें त्यास एका वृक्षाच्या मुळाशीं बांधून ठेविलें. आणि सरोवराच्या तीरावर उगवलेलें हिरवें गवत सुरीनें कापून आणून त्या अश्वापुढें टाकिलें.

तदनंतर तो चंद्रापीड आपणही त्या सरोवराच्या उदकांत उतरला, आणि हातपाय धुऊन चातकाप्रमाणें जलमय आहार करून, व चक्रवाक पक्ष्याप्रमाणें मृणाल खंडांचें आस्वादन करून, व चंद्राप्रमाणें कराग्रांनीं कुमुदांचा स्पर्श करून, व नागाप्रमाणें जलतरंगावरच्या वायूचें अभिनंदन करून, व विरही पुरुषाप्रमाणें कमलिनीचीं पानें उरःस्थळावर ठेवून विश्रम होत्साता उदकांतून बाहेर निघाला.

तदनंतर तो चंद्रापीड एका लतामंडपांत विस्तीर्ण शिलातलावर कमलपत्रांची शय्या करून, व आपल्या उत्तरीय वस्त्राची गुंडळी उशास घेऊन, विश्रांत होण्यासाठीं आडवा पडला. मग मुहूर्त मात्रानें विश्रांत झाल्यावर त्या चंद्रापीडानें त्या सरोवराच्या उत्तर तीरच्या प्रदेशावर निघालेला, व त्या इंद्रायुध अश्वानें आपलें खाणें सोडून सन्मुख होऊन मान वर करून व कान निश्चल उभे करून ऐकिलेला, व वीणेच्या झंकारशब्दानें मिश्रित झालेला असा अलौकिक गायनध्वनि ऐकिला.

गायनध्वनि ऐकून चंद्रापीड आपल्या मनांत विचार करूं लागला कीं, जेथें मनुष्य संचार देखील नाहीं त्या प्रदेशांत हा गायनध्वनि निघत आहे हें आहे तरीं काय ? तें त्यास मोठें कौतुक वाटल्यामुळें तो शय्येवर उठून बसला, आणि ज्या दिशेकडून तो गायनध्वनि ऐकूं येत होता त्या दिशेकडे पाहूं लागला. परंतु तो प्रदेश फार दूर ह्यामुळें मोठ्या प्रयत्नानें

जरी पाहिलें तरीं कांहीं दृष्टीस पडलें नाहीं. केवळ तो गायनध्वनि मात्र ऐकूं येत होता.

तदनंतर तो चंद्रापीड, त्या कौतुकाच्या स्वाधीन झाल्यामुळें, गायनाचा ध्वनि कोठून निघत आहे तें ठिकाण जाऊन पहावें, असें मनांत आणून इंद्रायुध नामक अश्वावर खोगीर घालून त्यावर आपण आरूढ झाला; आणि गानप्रिय हरिणें त्याच प्रदेशाकडे जात होतीं, त्यांच्या मागून सप्तपर्ण, बकुल, लवंग, वेलदोडे, तमाल इत्यादि वृक्षांनीं व्याप्त, व भ्रमरकुलांच्या गुंजारवांनीं शब्दायमान, अशा ज्या त्या सरोवराच्या पश्चिम तीरावरील वनपंक्ति, त्यांच्या मधल्या मार्गानें त्या गायनध्वनीच्या धोरणानें चालता झाला. आणि समोरून येणारा व मंद सुगंध शीतल असा जो कैलासपर्वत संबंधी वारा त्यानें आनंदित होत्साता जेथून तो गायनध्वनि उत्पन्न झाला त्या प्रदेशास अनुक्रमें जातजात जाऊन पोंहचला.

तदनंतर त्या चंद्रापीडानें त्या प्रदेशास चंद्रप्रभ नांवाचें प्रसिद्ध जें सरोवर त्याच्या पश्चिम तीरास चंद्रिके प्रमाणें ज्याची शुभ्र कांति अशा कैलास पर्वताच्या पायथ्यास एका सपाटीच्या मेदानांत चोहोंकडून वृक्षसमुदायांनीं वेष्टित असें, भगवान् चंद्रचूड शूलपाणि जो महादेव त्याचें शून्य म्हणजे निर्जन एक देवालय पाहिलें. मग घोड्यावरून खालीं उतरून देवालयांत प्रवेश केल्यावर चौखांबी मंडपाच्या मध्यभागीं सिंहासनावर बसलेली, व श्वेतकमलपुष्पांनीं पूजिलेली, व मुक्तारत्नांनीं निर्मिलेली, अतएव शुभ्रकांतीनें विराजमान, अशी त्रिभुवनपूज्य चराचर गुरु जो भगवान् महादेव ह्याची चाँर मुखांची व तीन नेत्रांची मूर्ति, त्यानें पाहिली.

तदनंतर त्या महादेवाच्या दक्षिण मूर्तीचा आश्रय करून ब्रह्मासनावर अभिमुख बसलेली, व पाशुपत दीक्षेचें धारण करणारी, अशी एक कन्या चंद्रापीडानें पाहिली. ती अशी होती कीं, आपल्या शरीराच्या शुभ्र कांतीनें भोंवतालचे सर्व प्रदेश शुभ्रच करीत आहे. तिचें शरीर शुभ्रवर्ण कांतीनें चोहोंकडून व्याप्त झालें होतें, ह्यामुळें स्फटिकाच्या गृहांत बसल्याप्रमाणें, किंवा दुग्धरसांत मग्न झाल्याप्रमाणें, किंवा अतिसूक्ष्म व अतिशुभ्र जें चीनदेशोद्भव वस्त्र त्यानें आच्छादित झाल्याप्रमाणें, किं-

वा आदर्शांत प्रतिबिंबित झाल्याप्रमाणें दिसत होतें. आणि शरत्काळ-च्या शुभ्र मेघांनीं आच्छादिलेल्या चंद्राप्रमाणें जिचे अवयव स्पष्ट दिसत नव्हते. पृथिव्यादि पंचतत्वें टाकून केवळ श्वेतसत्वगुणानेंच काय हिचें शरीर निर्माण ईश्वरानें केलें आहे असें वाटे. तिनें सर्व शरीरास शुभ्र भस्माचें उद्धूलन केलें होतें त्यामुळें ती अशी दिसत होती कीं, शिवानें मदनाचा दाह केला त्याचें शरीर पुन्हा पूर्ववत् आपणास प्राप्त व्हावें म्हणून महादेवास प्रसन्न करावयासाठीं आंगास भस्म लावून शिवव्रत धारण करून मदनाची स्त्री रतिच शिवाऽराधन करीत बसली आहे. किंवा राहूच्या भयानें महादेवास शरण आलेली चंद्राची मूर्तिच काय आहे. किंवा कैलास पर्वताची लक्ष्मीच काय रावणानें कैलास पर्वत हालविल्या मुळें खालीं पडली होती ती भयानें शिवासंनिध आली आहे. किंवा सकल शुभ्रवर्ण पदार्थांच्या शुभ्रपणाची मूर्तिमंत इयत्ताच अशी ती कन्या होती. तिच्या मस्तकीं जटा होत्या, त्यांचा वर्ण पिंगट तांबूस होता, त्यामुळें असें वाटे कीं ह्या जटा बालभानूच्या किरणांनीं किंवा विद्युल्लतेच्या तेजांनींच केल्या आहेत. त्या जटा इतक्या लांब होत्या कीं तिच्या खांद्यांवर पडून मांडीवर पडून भूमीवर पडून पसरल्या होत्या. आणि आंवळ्या एवढालीं मोठीं, व नक्षत्रासारखीं तेजस्वी, अशा बत्तीस मोत्यांचा कंठा तिच्या गळ्यांत होता, त्या योगानें तिचा कंठ फार शो-भत होता. तिच्या उरोभागावर जें कलशाकार स्तनयुग्म होतें त्याच्या योगानें हंसाच्या एक्या जोडप्यानें युक्त अशी श्वेतगंगाच काय अशी भासत होती. जिनें शुभ्र वल्कलांचें परिधान केलें होतें, आणि आज्ञां-कित सेवकाप्रमाणें विनीत असें यौवन तिला प्राप्त झालें होतें. तिचें शरीर जणो लावण्यानें विकतच घेतलें आहे. जिनें मनगटांत शंखाचीं वलयें घातलीं आहेत. आणि मांडीवर ठेवलेली हस्तिदंती वीणा उजव्या कराच्या कोमल अंगुलींनीं वाजवीत होत्साती शिवमूर्तीकडे दृष्टि लावून एकसारखी गायन करीत आहे. जी साक्षात् गंधर्वविद्याच. जिच्या गायनाच्या मधुर ध्वनीचें श्रवण करून त्या ध्वनीनें आकर्षिले होत्साते श्रवणाविषयीं लुब्ध होऊन आलेले मृग, वराह, वानर, गज, शरभ, सिंह, नाग, इत्यादि वनचर पशु एकत्र मिळून कर्णपुट निश्चल करून गायनयुक्त वीणेचा शब्द ऐकत भोंवतीं उभे राहिले आहेत. जी निर्मल,

निर्मम, निरहंकार, निर्मत्सर, आणि अमानुषाकृति अशी, आणि दिव्यत्वाच्या योगानें जिच्या वयाचें प्रमाण होत नाहीं, तरी अठरा वर्षांपेक्षां कांहीं कमी जिला वय आहे अशी दिसणारी ती कन्या चंद्रापीडानें पाहिली. तेव्हां तो पुढें जाऊन प्रथम भक्तिपूर्वक महादेवास प्रणाम करून त्या दिव्य स्त्रीकडे मेषोन्मेष रहित निश्चल नेत्रांनीं पुन्हा पाहूं लागला.

तदनंतर त्या कन्येच्या विलक्षण कांतीनें, व अत्यंत शांतीनें, आणि अद्भुतरूपसंपत्तीनें, ज्यास अति विस्मय उत्पन्न झाला आहे, अशा त्या चंद्रापीडाच्या मनांत असें आलें कीं, काय हो आश्चर्य सांगावें! ह्या जगामध्यें प्राणिमात्रास मनांत न आणितांही प्राप्त होणाऱ्या अशा नानाप्रकारच्या गोष्टी अकस्मात् पुढें येतात. पहा, मी मृगया करावयास निघालों तों साहजिक घोडतोंड्यांचा जोडा दृष्टीस पडला, त्याच्या पाठीस लागून इकडे आलों, तों अत्यंत मनोहर असून मनुष्यांस अगम्य आणि दिव्य जनास संचारयोग्य असा हा पृथ्वीचा भाग दृष्टीस पडला, आणि जलाचा शोध करतां करतां त्हृदयास आनंदकारक व सिद्धजनांनीं संसेव्य असें सरोवरही पाहिलें. तदनंतर त्या सरोवराच्या तीरीं विश्रांति घ्यावयास बसलों असतां अमानुष गीतही ऐकूं आलें. तें गीत कोठें होत आहे, याचा शोध करावा म्हणून निघालों तों मनुष्यास जिचें दर्शन दुर्लभ अशीही दिव्य कन्या पाहिली. हिच्या दिव्यतेविषयीं मला अगदीं संशय नाहीं. हिची आकृतीच हिच्या अमानुषत्वाचें अनुमान करविते. आणखी अशा प्रकारच्या गायनाचा संभव मर्त्यलोकांत कोठून होणार. तर, जर ही अकस्मात् माझ्या दर्शनमार्गांतून निघून जाणार नाहीं, अथवा कैलासपर्वताच्या शिखरावर चढून जाणार नाहीं, किंवा आकाशांत उडून जाणार नाहीं, तर तूं कोण, तुझें नांव काय, आणि कोणत्या कारणास्तव प्रथम वयांत असून असें हें व्रत धरित आहेस. असें सर्व हिला पुढें जाऊन विचारीन. हें मोठें आश्चर्याचें स्थान आहे. असा निश्चय करून त्याच स्फटिकमंडपिकेच्या एक्या स्तंभाच्या आश्रयास तिच्या गायनाच्या समाप्तीची वाट पाहत बसला.

तदनंतर गीतावसान झाल्यावर वीणा खालीं ठेवून ती उठली, आणि महादेवास प्रदक्षिणा व नमस्कार करून पुन्हा खालीं बसली. आणि मान वळवून स्वभावानें शुभ्रवर्ण व तपःप्रभावानें प्रौढ अशा दृष्टीनें

त्या चंद्रापीडाकडे पाहूं लागली. तेव्हां असें वाटलें कीं, ही चंद्रापीडाचें आश्वासनच करीत आहे, किंवा आपल्या पुण्यांनीं त्याला स्पर्शच करीत आहे, किंवा तीर्थजलांनीं त्याचें प्रक्षालनच करीत आहे, किंवा आपल्या तपश्चर्येच्या योगानें त्यास पवित्रच करीत आहे, किंवा वरप्रदानच देत आहे. अशा प्रकारें त्या चंद्रापीडाकडे पाहून ती कन्यका त्याशीं बोलूं लागली, तें असें कीं अतिथीचें येणें फार चांगलें झालें. हे महाभाग्यवंता, तूं ह्या भूमीवर कसा आलास? तर आतां उठावें, आणि माझ्या पाठीमागून येऊन अतिथि सत्कार अनुभवावा. असें तिचें भाषण ऐकून हिनें भाषणेंकरूनच आपणावर अनुग्रह केला असें मानून तो चंद्रापीड उठून प्रणाम करून, हे भगवति, जशी आज्ञा करतेस तसेंच असो, असें बोलून मोठ्या नम्रतेनें शिष्याप्रमाणें तिच्या मागून चालला. आणि चालतां चालतां मनांत संभावना करतो कीं, वाहवा, मला पाहून ही अंतर्धान पावली नाहीं, ह्यामुळें कौतुकानें प्रश्न करण्याविषयीं जी माझ्या मनांत आशा उत्पन्न झाली ती सफळ होण्याचा संभव आहे. तपस्विजनांमध्यें दुर्लभ अशा दिव्यरूपानें संपन्न ही कन्यका मोठ्या दाक्षिण्यानें माझा इतका मोठा सत्कार करीत आहे, ह्याजवरून मला असें वाटतें कीं, जर मीं हिची प्रार्थना केली तर ही आपली सर्व वार्ता मला सांगेल ह्यांत संशय नाहीं असें मनांत चिंतन करीत करीत तिच्या मागून शंभर पावलें पावेतों गेला. तों त्या चंद्रापीडानें समोर एक गुहा पाहिली. ज्या गुहेच्या द्वारप्रदेशापुढें दिवसासही रात्रीची भ्रांति देणारी अशी तमाल वृक्षांची दाटी होती. जिचा आसमंतात् भाग लता वृक्ष ह्यांच्या प्रफुल्लित पुष्पांवर इतस्ततः भ्रमण करणाऱ्या मत्त भ्रमरांच्या गुंजारवांनीं नादित झाला होता. जिचा अंतःप्रदेश उंचावरून शिलातलावर पडणाऱ्या उदकाच्या सूक्ष्म कणांनीं व्याप्त झाल्यामुळें हिमाछादित प्रदेशाप्रमाणें अति शीतळ झालेला होता. जिच्या दोहों बाजूंस शुभ्रवर्ण उदकाचे पाझर गळत होते त्यामुळें असें वाटे कीं तिच्या दोहों कानांवर शुभ्रचामररूप भूषणेंच बांधिलीं आहेत. त्या गुहेमध्यें एकीकडे मणिमय कमंडलू ठेविले आहेत, एक्या आंगास योगपट्टिका लोंबत आहे. एकीकडे काळीच्या अग्रास अडकविलेल्या नारळीच्या काथ्यानें

केलेलीं पायतणें ठेविलीं आहेत, एकीकडे आंगास लावावयाच्या भस्मानें भरलेला भोंपळा ठेविला आहे, एक्या बाजूस वल्कलमय शय्या घातलेली आहे, आणि चंद्रासारखें शुभ्र असें शंखाचें केलेलें भिक्षापात्र एके बाजूस पडलें आहे.

तदनंतर तो चंद्रापीड त्या गुहेच्या द्वाराजवळ एका शिलातलावर बसला. इतक्यांत ती कन्या गुहेंत जाऊन आपल्या वल्कलमय शय्येच्या उशाकडे आपली काखेंतली वीणा ठेवून, पानाच्या एका द्रोणांत झऱ्याचें पाणी धरून घेऊन चंद्रापीडास अर्घ्य देण्याच्या उद्देशानें त्याच्या पुढें आली. तें पाहून चंद्रापीडानें भाषण केलें कीं, पुरे पुरे, फार संकोच होतो. इतका प्रयास कशास पाहिजे. हे भगवति प्रसन्न हो. अत्यादर करावयाचा सोड. तुझें केवळ दर्शनच सर्व पापाचें प्रशमन करावयास व सर्व प्रकारें पवित्रता संपादावयास समर्थ आहे. आतां आपण खालीं बसावें. असें तो चंद्रापीड बोलला तरी त्या कन्यकेच्या अत्याग्रहामुळें तिनें केलेल्या अतिथिपूजेचा अतिनम्र होऊन चंद्रापीडानें स्वीकार केला.

ह्याप्रमाणें चंद्रापीडाचें आतिथ्य करून ती कन्यका त्याच्या जवळच दुसऱ्या एका शिलातलावर बसली, आणि क्षणभर उगीच राहून तिनें त्या चंद्रापीडास त्याचें वर्तमान विचारिलें. तेव्हां चंद्रापीडानें दिग्विजयास निघाल्यापासून किन्नरांच्या मागें लागून त्या स्थळास येण्यापर्यंत सर्व आपलें वर्तमान तिला सांगितलें. तें त्याचें वर्तमान ऐकून घेऊन ती कन्या तेथून उठली, आणि भिक्षापात्र हातीं घेऊन आश्रमाजवळच्या वृक्षांखालीं गेली. तेव्हां तिचें भिक्षापात्र वृक्षांपासून आपोआप गळालेल्या पक्क फळांनीं भरलें. तें फलपूर्ण पात्र घेऊन आश्रमास येऊन हीं फळें भक्षावीं म्हणून तिनें चंद्रापीडाची प्रार्थना केली. तेव्हां चंद्रापीडाच्या मनांत आलें कीं तपश्चर्येला म्हणून कांहीं एक असाध्य नाहीं. ह्यापेक्षां दुसरें कोणतें आश्चर्य असावें, कीं हे अचेतन वृक्ष सचेतनाप्रमाणें फळें देऊन हिचा आपणावर अनुग्रह व्हावा असें इच्छितात. हें मोठें अदृष्टपूर्व आश्चर्य आम्हीं पाहिलें. असा परम विस्मय पावल्यावर त्या चंद्रापीडानें आपला इंद्रायुधनामक अश्वही त्या स्थळास आणून त्याजवरचें खोगीर काढून जवळच्या एका वृक्षास तो बांधिला.

आणि झऱ्याच्या उदकानें स्नान करून अमृतरसाप्रमाणें मधुर अशीं तीं फळें भक्षिलीं, आणि हिमाप्रमाणें शीतल असें जें त्या झऱ्याचें उदक त्याचें प्राशन करून आचमन केलें, आणि त्या कन्येचा जलफलमूलमय आहार होत आहे तों पर्यंत एकांतीं वास केला.

तदनंतर ती कन्यका फलाहार करून व संध्याकाळचें कर्म यथाविधि संपादून येऊन शिलातळावर स्वस्थ बसली आहे असें पाहून तो चंद्रापीड त्या कन्यकेच्या समीप हळू हळू जाऊन तिच्या पुढें बसला. आणि क्षणभर काळ गेल्यावर तिच्याशीं बोलूं लागला कीं, हे भगवती, तुझ्या प्रसादाची प्राप्ति झाली ह्यामुळें वाढलेल्या कौतुकानें व्याकुळ झालेला, व मनुष्य जातीच्या स्वभावास सुलभ असा जो हलकेपणा तो माझी इच्छा नसतां बळेंच मला प्रश्न करण्याविषयीं योजितो. कारण कीं, प्रभूचा प्रसाद थोडा जरी झाला तरी तो अधीर पुरुषास धैर्य उत्पन्न करितो, आणि दोघांचें राहणें एके ठायीं थोडा वेळ जरी झालें तरी तें परिचय उत्पन्न करितें. आणि प्रवासांत थोडा जरी उपचार झाला तरी तो स्नेह उत्पन्न करितो. ह्याजकरितां भगवतीस जर कांहीं अडचण नसेल किंवा अत्यंत खेदास कारण नसेल तर भगवतीनें आपलें वर्तमान सांगून मजवर अनुग्रह करावा असें मी इच्छीत आहें. आपलें दर्शन झाल्यापासून ह्या गोष्टीविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे कीं भगवतीनें आपल्या जन्मेंकरून देव, ऋषि, गंधर्व, गुह्यक, अप्सरा, ह्यांतून कोणत्या कुलावर अनुग्रह केला आहे ? आणि कुसुमासारखें सुकुमार व मनोरम अशा नवयौवनांत व्रतग्रहण कशासाठीं केलें आहे ? हें नवीन वय कोणीकडे आणि हें कठीण तप कोणीकडे ? तसेंच हें अद्भुत लावण्य कोणीकडे आणि ही इंद्रियांची उपशांति कोणीकडे ? हें सर्व मला अद्भुतासारखें दिसतें. आणखी मी आपणास असा प्रश्न करतों कीं, ज्या आश्रमपदांत अनेक सिद्ध, साध्य इत्यादि वास करितात अशीं सुरलोकासारखीं दिव्य आश्रमपदें सोडून ह्या अमानुष वनामध्यें भगवती एकाकिनी कोणत्या हेतूनें राहत आहे. आणखी हाही एक प्रकार चमत्कारिक आहे कीं, त्याच पंचभूतांनीं रचलेलें शरीर अशा प्रकारचा शुभ्रपणा धरीत आहे. तर असा चमत्कार अन्यत्र आम्हीं कोठें पाहिला नाहीं किंवा ऐकिला नाहीं. तर ह्याविषयीं जें आम्हांस मोठें आ-

श्चर्य झालें आहे तें आपलें सर्व वर्तमान सविस्तर सांगून घालवावें. असें चंद्रापीडाचें भाषण ऐकून ती कन्यका कांहीं न बोलतां मुहूर्तभर स्तब्ध राहून आपल्या अंतःकरणांत कांहीं ध्यान करून दुःखाचा उच्छ्वास टाकिती झाली. त्यासमयीं तिच्या नेत्रांतून टपटप अश्रूंचे बिंदु पडूं लागले. ते जणो तुटलेल्या हारापासून मोत्येंच गळत आहेत असें भासले ते अश्रुबिंदु निर्मळ गालांवरून वल्कलानें आच्छादिलेल्या स्तनांवर पडून त्यांनीं सर्व वल्कल भिजविलें. अशी ती कन्यका उगीच्या उगीच डोळे मिटून रोदन करूं लागली.

ती रोदन करूं लागली असें पाहून चंद्रापीड आपल्या मनांत त्याक्षणीं चिंतन करूं लागला कीं, अहो ! व्यसनप्राप्ति दुर्निवार आहे. ज्या आकृतीचा पराभव कशानेंही व्हावयाचा नाहीं त्या आकृतीचाही पराभव ती करिते. तस्मात् ज्यानें शरीराचा स्वीकार केला त्याला दुःखें स्पर्श करणार नाहींत असें नाहीं. सुखदुःखादिद्वंद्वांची प्रवृत्ति बलवत्तर आहे. हिच्या अश्रुपातानें मला आणखी एक मोठें नवल वाटतें कीं, अशा प्रकारच्या मूर्ति थोड्याशा कारणानें शोकास पात्र न व्हाव्या त्या कशा झाल्या. क्षुद्र आघातानें भूमि कंपित होत नाहीं. असें कौतुक मानून चंद्रापीडानें आणखी मनांत आणिलें कीं हिच्या शोकस्मरणास मीच कारण झालों. तस्मात् मी हिचा अपराधी आहें. असें चिंतन करून तो झटकर उठून जवळच्या झऱ्याचें पाणी मुख प्रक्षाळणाकरितां ओंजळींत आणून तिच्या पुढें उभा राहिला. तेव्हां त्याच्या मर्जीकरितां नेत्रांतून अश्रुप्रवाह चालला असतांही त्या जलानें मुख प्रक्षालन करून वल्कलाच्या पदरानें डोळे पुसून दीर्घ आणि उष्ण असा उच्छ्वास टाकून ती कन्यका चंद्रापीडाप्रत हळू हळू प्रत्युत्तररूप भाषण करूं लागली. हे राजपुत्रा, जी कठिण त्हदया, जी दुर्दैवा, जी पापरूपा, अशा माझे जन्मापासून वैराग्याचें वर्तमान ऐकून तुला काय फळ आहे ? कांहीं नाहीं. तथापि जर तुला ऐकण्याचें मोठें कौतुक वाटत असेल तर सांगतें, ऐकावें, असें म्हणून ती कन्यका चंद्रापीडराजपुत्रास आपलें वर्तमान सांगूं लागली.

देवलोकीं अप्सरा म्हणून कन्यका आहेत, त्या तुला प्रायः ऐकून ठावक्या असतीलच. त्या अप्सरांचीं कुळें चवदा आहेत. त्यांत एक

ब्रह्मदेवाच्या मनापासून उत्पन्न झालें; एक वेदांपासून झालें; एक अग्नी-पासून उद्भवलें; एक वायूपासून झालें; एक अमृतमंथनसमयीं समुद्रांतून निघालें; एक जलापासून उद्भवलें एक सूर्यकिरणांपासून निघालें; एक चंद्रकिरणांपासून निघालें; एक भूमीपासून उद्भवलें; एक विद्युल्लतेपासून निष्पन्न झालें; एक मृत्यूनें निर्मिलें; एक मदनानें उत्पन्न केलें; हीं बारा कुळें आणि दक्षप्रजापतीच्या कन्यांतील ज्या मुनि व अरिष्टा ह्या दोन कन्या त्यांपासून गंधर्वांच्या संबंधानें दोन कुळें उत्पन्न झालीं. अशीं सर्व मिळून चवदा कुळें झालीं. त्यांमध्यें शेवटीं सांगितलेलें जें कुलद्वय त्यांत मुनिकन्येला चित्रसेनादि पंधरा पुत्र झाल्यावर सर्व भावांपेक्षां गुणानें अधिक असा सोळावा चित्ररथ नामक पुत्र उत्पन्न झाला. ज्याचा पराक्रम त्रिभुवनांत प्रख्यात आहे असा असून, सर्व देव ज्याच्या पादकमलाचें वंदन करतात, त्या देवेंद्रानें ज्याला आपला सुहृत्‌ असें म्हणून ज्याची योग्याता वाढविली, ह्यामुळें सर्व गंधर्वांचें आधिपत्य त्यानें पूर्व वयांतच मिळविलें. त्याचें राहण्याचें स्थळ म्हणशील तर येथून जवळच भारत वर्षाच्या उत्तरसीमेवर किंपुरुषनामक वर्षामध्यें, हेमकूटनामक पर्वत आहे तो होय. त्या पर्वतावर चित्ररथाच्या बाहूंनीं संरक्षित केलेलीं अशीं गंधर्वांचीं शेंकडों हजारों कुळें राहत आहेत. त्यानेंच चैत्ररथनामक अत्यंत मनोहर असें हें वन निर्मिलें आहे. आणि हें अच्छोद नामक विस्तीर्ण सरोवर खणिलें आहे. आणखीं हा भगवान्‌ भवानीपति येथें स्थापित केला आहे. आतां अरिष्टा म्हणून जी दुसरी दक्षकन्या तिला तुंबुरुप्रभृति सहा पुत्र झाले, त्यांत वडील व जगांत प्रसिद्ध असा हंस ह्या नांवाचा गंधर्व झाला, त्याला त्या चित्ररथानेंच गादीवर बसवून त्या कुळाचें आधिपत्य त्याला दिलें. तो हंस अद्यापि राज्यपदारूढ असून अपरिमित गंधर्वांसहवर्तमान त्याच हेमकूट पर्वतावर राहत आहे. चंद्रकिरणांपासून जें अप्सरांचें कुल उत्पन्न झालें त्या कुलामध्यें एक गौरी नांवाची कन्या दुसरी गौरीच अशी, व त्रिभुवनाच्या नेत्रांस आल्हाद करणारी अतिरूपवती अशी उत्पन्न झाली. तिच्याशीं दुसऱ्या गंधर्व कुळाचा अधिपति जो हंस त्यानें, गंगेशीं सागरानें संबंध करावा तसा संबंध केला. तेव्हां ती गौरी, मदनाच्या योगानें जशी रति किंवा शरत्समयाच्या योगानें जशी कमलिनी तशी हंसाच्या अनुरूप स-

मागमानें फार आनंद पावली, आणि त्याच्या सर्व अंतःपुराची स्वामिनी झाली.

तदनंतर तशीं गुणवंत जीं गौरी आणि हंस स्त्रीपुरुषें त्यांस केवल शोक द्यावयासाठीं विगतलक्षणा व दुःखसहस्रास पात्रभूत अशी मी एकच कन्या झालें. माझ्या पित्याला दुसरें अपत्य नव्हतें म्हणून त्यानें पुत्र जन्माहून अधिक माझ्या जन्माचें कोड, कौतुक, केलें. दहा दिवस उत्तम प्रकारचा समारंभ करून बारावे दिवशीं माझ्या पित्यानें माझें महाश्वेता असें यथार्थ नाम ठेविलें. तदनंतर ती मी पित्याच्या घरीं बाल्यावस्थेंत अव्यक्त मधुर शब्द करणारी व वीणेप्रमाणें गंधर्वांच्या मांडीवर बसणारी होत्साती ज्यामध्यें स्नेह, शोक, आयास ह्यांचें ज्ञान नाहीं असें मनोहर शिशुत्व घालविती झालें. तदनंतर क्रमाक्रमानें माझ्या शरीराचे ठायीं नव यौवनानें पद ठेविलें.

तदनंतर, ज्या दिवसांत नवीन कमलवनें प्रफुल्लित होतात, व आम्रवृक्षांस मोहर येतो, व मदनाचा उत्सव लोक करितात, व वृक्षांस नवीन पल्लव फुटतात, व भ्रमरांचे समुदाय पुष्परस घेत व गुंजारव करीत वृक्षांवरून फिरतात, व विरहिजनास दुःख होतें, व विषयिजनास सुख होतें, अशा चैत्रमासांतील दिवसांमध्यें एके दिवशीं मी आपल्या आईबरोबर अतिरमणीय अच्छोदनामक सरोवरावर स्नानासाठीं गेलें.

तदनंतर येथें स्नानार्थ येणाऱ्या पार्वतीनें जीं सरोवराच्या कांठच्या शिलातलावर महादेवाचीं लिंगें नंदी, भृंगी, रीटी, ह्या गणांसहित काढलेलीं होतीं, त्यांस वंदन करून पलीकडे अनेकविध पुष्पवृक्षांनीं सुशोभित असा एक लतामंडप पाहिला, त्याच्या भोंवतीं पुष्पित झालेले आम्रवृक्ष पाहिले, ज्यांवर कोकिलपक्षी बसले आहेत, व ज्यांपासून मकरंदरस खालीं गळत आहे. आणखी मयूरांचा शब्द ऐकून भुजंग ज्यांवर लपून बसले आहेत अशा शीतळ चंदन वृक्षांची राई ज्याठिकाणीं आहे. आणखी, जागजागीं वनदेवतांनीं बसावयाचे वेलींचे झोंपाळे मोठमोठ्या वृक्षांस जेथें लोंबत आहेत. आणखी भूमीवर पडलेल्या पुष्परजांत उमटलेलीं राजहंसांचीं पावलें जेथें दिसत आहेत. अशा त्या रमणीय प्रदेशाचें अवलोकन करण्यासाठीं उत्कंठेनें आपल्या सखीजनासहवर्तमान मी संचार करूं लागलें.

मी इतस्ततः भ्रमण करीत असतां एके प्रदेशाचेठायीं अकस्मात् वायूच्या योगानें समीप आलेला, आणि वनांतील नानाविध पुष्पांचा गंध लोपविणारा, आणि सर्व दिशांकडे पसरणारा, आणि घ्राणेंद्रियाची तृप्ति करणारा, आणि ज्याच्यामागून लोभानें भ्रमरांचे समुदाय पुढें पुढें धांव घेत आहेत, आणि जो मनुष्यलोकास योग्य नव्हे, देव लोकासच योग्य, असा विलक्षण सुगंध माझ्या घ्राणेंद्रियास येऊन पोहोंचला. तेव्हां हा दिव्य सुगंध कोठून आला बरें? असें मला मोठें कौतुक वाटल्यामुळें मी डोळे मिटून गंध घेत क्षणभर उभी राहिलें. मग त्या गंधानें माझें जणो आकर्षणच केलें काय, अशी होत्साती मी त्या सुगंधाचें स्थान शोधून पाहण्याच्या कौतुकानें कांहीं पावलें पुढें चालून गेलें; तों त्याच सरोवरावर स्नान करावयासाठीं शिष्यासहवर्तमान आलेला असा एक ऋषिकुमार म्यां पाहिला. तो असा होता कीं, महादेवानें मदन जाळिला त्याच्या शोकानें दुःखित झालेला जो मदनाचा सखा वसंत तोच हामूर्तिमंत होऊन तपश्चर्या करीत आहे काय, किंवा सकल कला परिपूर्ण मंडलाची प्राप्ति होण्याकरितां व्रतनियम धरणारा महादेवाच्या मस्तकावरचा चंद्रच काय, किंवा महादेवास वश करून घेण्याकरितां व्रतानुष्ठान करणारा साक्षात् मदनच काय, असें वाटावया जोगा; आणि त्याच्या आंगीं इतकें तेज होतें कीं हा जणों विद्युल्लतेच्या पिंजऱ्यांत बसला आहे, किंवा सूर्यमंडळांत प्रविष्ट झाला आहे, किंवा अग्नीच्या ज्वाला समुदायांत राहिला आहे काय, असें वाटण्या जोगा, आणि त्याच्या अंगाची कांति प्रकाशित दीपप्रकाशाप्रमाणें पिंगट वर्ण होती, तिच्या योगानें सर्व वनप्रदेश ज्यानें सुवर्णमय केला असा, आणि ज्याच्या मस्तकीं गोरोचनेच्या रसानें रंगविल्याप्रमाणें पिंगटवर्ण जटा होत्या. आणि गंगाप्रवाहाप्रमाणें शुभ्रवर्ण भस्माचा त्रिपुंड्र ज्याच्या कपाळावर शोभत होता. आणि शापगृहावरचें तोरणच काय अशा ज्याच्या भुंवया दिसत होत्या. ज्याचे डोळे इतके विस्तीर्ण व सुशोभित होते कीं सर्व हरिणांनीं ज्यांस आपल्या नेत्रशोभेचा विभागच दिला आहे असें वाटे. ज्याची नासिका दीर्घ असून उच्च होती, व ज्याचे ओष्ठ आरक्तवर्ण व ज्याच्या मुखावर श्मश्रु रोमावली उत्पन्न न झाल्यामुळें ज्याच्या भोंवतीं भ्रमरपंक्ति नाहीं अशा बालकमलाप्रमाणें ज्याचें मुख शोभमान होतें.

आणि कुंडलाकृति केलेला कामाच्या धनुष्याचा गुणच काय, अशा प्रकारचें शुभ्र यज्ञोपवीत ज्याच्या कंठांत शोभत होतें. आणि जो एका हातानें बकुल फलाच्या आकाराचा कमंडलु आणि दुसऱ्या हातानें स्फटिक मण्यांनी मिश्रित अशी रुद्राक्षांची माळ धरणारा. ज्याची नाभि नद्यांतील उदकाच्या भोंवऱ्याप्रमाणें शोभणारी होती, व ज्याच्या उदरावर कृष्णवर्ण सूक्ष्म रोमराजी होती. व सूर्याच्या परिवेषमंडलासारखी ज्याच्या कटिप्रदेशीं मुंजातृणाची मेखला शोभत होती. व स्वच्छ, सूक्ष्म, आणि रक्तवर्ण, अशा वल्कलांचें परिधान ज्यानें केलें होतें. व ज्यानें आपल्या काखेंत पळसाचा दंड धरिला होता, असा. आणि जो ब्रह्मचर्याचा अलंकार, जो धर्माचें तारुण्य, जो सरस्वतीचा विलास, जो विद्यांचा स्वयंवर पतिच, व जो सर्व शास्त्रांचें संकेतस्थान, अशा प्रकारचा तो होता.

त्यानें आपल्या कानावर भूषणार्थ एक चमत्कारिक पुष्पमंजरी ठेविली होती, ती माझ्या दृष्टीस पडली. तशी पुष्पमंजरी मीं पूर्वीं कधींच पाहिली नव्हती. तेव्हां मीं आपल्या मनांत असें आणिलें कीं, अन्य सकल पुष्पांच्या सुगंधाचा पराभव करणारा जो विलक्षण सुगंध म्यां अनुभविला तो त्याच पुष्पमंजरीचा असावा. असा निश्चय करून त्या तरुण ऋषिकुमाराकडे पाहून मनांत म्हटलें कीं, कायहो ही रूपातिशय निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या कौशल्याची परिपूर्णता ! कारण कीं ज्याच्या रूपसौंदर्याचा त्रिभुवनामध्यें डंका वाजत आहे अशा मदनास मागें सारणारा असा मुनि मायामय दुसरा मदनच त्यानें उत्पन्न केला आहे असें वाटतें. नेत्रांस आनंद देणारे जे चंद्र, कमल, इत्यादि सुंदर पदार्थ ते सर्व ह्याच्या रूपावरून ओंवाळून टाकावे. कृष्णपक्षांत चंद्राच्या कला क्षीण होतात त्याविषयीं लोकांत असें म्हणणें आहे कीं, त्या कला सूर्य आपल्या किरणांनीं शोषून घेतो. पण हें म्हणणें खरें वाटत नाहीं. बहुधा त्या चंद्राच्या कला ह्या ऋषिकुमाराच्याच शरीरांत प्रविष्ट होतात. असें न म्हणावें तर ज्यांत क्लेश बहुत अशा तपश्चर्येच्या कर्मांत हा ऋषिकुमार निरंतर वर्तत असतां ही लावण्यसंपत्ति निर्विकारपणें येथें राहिली कशी ? असें मी चिंतन करीत असतां पुष्पांतील मकरंद रसाच्या मदानें एकाद्या भ्रमरीस जसें पराधीन करावें तसें गुणदोषाचा

विचार न करणारा व केवळ रूपाचाच पक्षपात धरणारा व नव यौवना वस्थेस सुलभ असा जो पंचबाण मदन त्यानें मला पराधीन केलें.

तेव्हां माझें सर्वांग स्तब्ध झालें, आणि निश्चल व स्पृहायुक्त अशा दृष्टीनें मी त्या ऋषिकुमाराकडे टक लावून पाहूं लागलें. कोणी म्हणेल कीं, ही त्यास शरणच आली आहे, अशा करितां कीं कामानें माझा पराभव केला म्हणून माझें रक्षण करावें असें म्हणावयाकरितां त्या समयीं, अहाहा, काय हें अयोग्य व अत्यंत लज्जास्पद व उत्तम कुलांतल्या कुमारीजनास अनुचित कर्म मीं आरंभिलें आहे ! असें जाणत असून ही इंद्रियांस स्वाधीन ठेवण्याविषयीं मी असमर्थ झालें. मला असें समजेना कीं, त्या ऋषिकुमाराच्या रूपसंपत्तीनें, किंवा आपल्या मनानें, किंवा मदनानें, किंवा यौवनानें, किंवा साहजिक प्रीतीनें, किंवा अन्य कोणीं, हा उपदेश केला; आणि त्याजकडे एकसारखें फारवेळपर्यंत पाहत मी उभी कशी राहिलें.

त्या समयीं जणो इंद्रियांनीं उचलून त्याच्या समीप न्यावयास चालविली, व हृदयानें पुढें ओढिली, व कामानें मागून लोटिली, अशी मी झालें असतां माझा कांहींच प्रयत्न चालेनासा झाल्यामुळें मीं कसें तरी आत्म्याचें धारण केलें. तदनंतर कामाचे सर्व विकार, रोमांच, घर्म, कंप, इत्यादि माझ्या शरीरांत संचरले आणि अनुराग हृदयामध्यें प्रविष्ट झाला.

त्या काळीं माझ्या मनांत अशी गोष्ट आली कीं, ज्याचें हृदय शांत ज्याला विषयवार्ताही अवगत नाहीं, अशा ह्या ऋषिकुमारावर मला आणून टाकिलें हें अयोग्य कर्म मदनानें आरंभिलें. त्यामुळें स्त्रीजनांचें हृदय अत्यंत मूढ आहे, कारण कीं, अनुराग करावा कोठें, न करावा कोठें, हें त्यास कळत नाहीं, येवढेंमात्र लोकांत प्रसिद्धीस आलें. अहो अत्यंत देदीप्यमान असें तेजाचें व तपाचें स्थान कोणीकडे, आणि प्राकृत जनास आवडणारीं हीं मदनाचीं चेष्टितें कोणीकडे. कामानें मोहित केलेली जी मी त्या मला पाहून तो ऋषिकुमार निश्चयेंकरून आपल्या मनांत माझा उपहास करीत असेल. हें मला मोठें आश्चर्य वाटतें कीं, मी हें सर्व जाणत असतांही अंतःकरणांत झालेला कामविकार आटोपून धरण्यास समर्थ होत नाहीं. आतां समाधान इतकेंच कीं, पूर्वीं किती

एक कन्यका लज्जा सोडून आपण होऊन पतींच्या समीप गेल्या आहेत, आणि कितीएक स्त्रिया दुर्विनीत मदनानें उन्मत्तावस्थेस पावविल्या आहेत. मीच एकटी अशी झालें असें नाहीं. माझें अंतःकरण तर ह्या क्षणीं ह्या ऋषिकुमाराच्या अवलोकनानें अत्यंत व्याकूल झालें आहे, हें कितीही आटोपलें असतां आटोपलें जात नाहीं. तस्मात् कामविकार परम दुर्निवार आहे. आतां ह्या समयीं हाच विचार बरा कीं, जोंपर्यंत मी सावध आहें, आणि जोंपर्यंत माझें मदन दुश्चेष्टित ह्या ऋषिकुमारानें स्पष्टपणें जाणलें नाहीं, तोंपर्यंत ह्या प्रदेशापासून दूर जावें, ह्यांतच श्रेय आहे. नाहींतर कदाचित् हा ऋषिकुमार त्याला न आवडणारें जें माझें चेष्टित तें पाहून कुपित होत्साता मला शाप देईल. कारण कीं मुनिजनांची प्रकृति शीघ्रकोपी असते. असा मी आपल्या मनांत विचार करून त्या ऋषिकुमारापासून दूर जावें असें इच्छून आणि ही ऋषींची जाति सर्व जनांस वंद्य आहे असें मनांत आणून त्याकडे गेलेली दृष्टि मागें फिरवून नम्रपणानें त्या ऋषिकुमारास म्यां प्रणाम केला.

अशा प्रकारें मीं प्रणाम केला असतां काय चमत्कार झाला पहा! कामदेवाची आज्ञा उल्लंघावयास अशक्य असल्यामुळें, व चैत्रमास मदाचा उत्पादक असल्यामुळें, व तो वनप्रदेश अत्यंत रमणीय असल्यामुळें, व नूतन तारुण्य विचारशून्य असल्यामुळें, व इंद्रियें स्वभावतः चंचल असल्यामुळें, व विषयाभिलाष दुर्निवार असल्यामुळें व अंतःकरणवृत्ति अस्थिर असल्यामुळें, व भवितव्यता प्रबळ असल्यामुळें, व माझ्या दैवाच्या दुष्टत्वामुळें, किंबहुना अशा क्लेशाचे अनुभव मला व्हावयाचे होते ह्यामुळें, म्हणा, जसा वायु एखाद्या दीपास चंचल करतो, तसें मदनानें, त्या ऋषिकुमाराचें चित्त चंचल केलें. त्यासमयीं त्याच्याही शरीरांत मदनाचे विकार प्रगट झाले. शरीरावर रोमांच उभे राहिले, अंगास घर्म सुटला, व कंप होऊं लागला. त्या कंपाच्या योगानें हातांतील स्फटिकाक्ष माला खालीं पडली. आणि मजकडे प्रीतिपूर्वक अवलोकन करण्याकरितां त्याचे विशाळ नेत्र प्रफुल्लित श्वेतकमळाप्रमाणें विस्तार पावले. माझ्या दर्शनानें ऋषिकुमार काममोहित झाला हें पाहून जी माझी अवस्था झाली ती सांगतां येत नाहीं. मी आपल्या मनांत असें आणिलें कीं, विलाससंबंधी ज्या अनेकविध लीला त्यांचा उपदेश क-

रण्याविषयीं आचार्य जो कामदेव तोच काय ह्या ऋषिकुमारास विलासांचा उपदेश करीत आहे. असें न म्हणावें तर विलासांच्या कृत्यांत ज्याची बुद्धि प्रविष्ट झाली नाहीं अशा प्रकारच्या ह्या ऋषिकुमाराची शृंगाररसातें स्रवणारी व अमृतासारखी मधुर व आनंदसुखानें किंचित् मुकुलित असून चंचल अशी दृष्टि कशी झाली? व इतकें निपुणत्व ह्यास कोठून प्राप्त झालें? ह्याच्या दृष्टीवरूनच ह्याच्या हृदयांतला अभिलाष स्पष्टपणें समजतो.

तदनंतर मीं अवसर पाहून त्या ऋषिकुमाराचा सोबती एक मुनिबालक जवळ होता त्याला प्रणाम करून प्रश्न केला, कीं, हे भगवन्, हा तरुण पुरुष कोणत्या ऋषीचा पुत्र, व ह्याचें नांव काय, आणि ह्यानें आपल्या कर्णावर भूषणार्थ जी पुष्पमंजरी ठेविली आहे ती कोणत्या वृक्षाची आहे? ज्या पुष्प मंजरीचा सुगंध चोंहोंकडे पसरणारा असून अति मनोहर आहे. अशा लोकोत्तर सुगंध म्यां आपल्या नासिकेनें कधींही अनुभविला नाहीं. ह्याचें माझ्या अंतःकरणास मोठें कौतुक वाटतें. असें माझें भाषण ऐकून तो मुनिबालक किंचित् हास्य करून बोलला कीं, हे बाले, हें तूं कशाला पुसतेस, ह्यापासून तुला काय लाभ आहे? तुला ऐकण्याचें कौतुकच असेल तर सांगतों ऐक.

ज्याची कीर्ति त्रिभुवनांत प्रसिद्ध, ज्याचें तप मोठें, सुरांचे सिद्धांचे समुदाय ज्याच्या चरणास वंदन करतात, असा देवलोकीं राहणारा श्वेतकेतु म्हणून एक प्रसिद्ध महामुनि आहे. त्या भगवंताचें रूप देवलोकींच्या दैत्यलोकींच्या नागलोकींच्या सुंदर स्त्रियांच्या हृदयांस आनंद करणारें, आणि त्रिभुवनांत अति सुंदर जो नलकूबर त्याच्या रूपापेक्षांही अधिक सुंदर, असें आहे. तो महामुनि कोणे एके समयीं देवपूजेकरितां कमलपुष्पें काढावीं म्हणून भागीरथीच्या प्रवाहामध्यें उतरला. ते समयीं सर्वकाळ कमलवनांत राहणारी, ज्याला हजार पांकळ्या अशा पांढऱ्या कमळावर बसलेली, जी देवी कमला तिनें गंगाप्रवाहांत उतरणाऱ्या त्या महामुनीला पाहिलें तेव्हां त्याचें लोकोत्तर सौंदर्य पाहून त्या देवीला अतिशयित आनंद झाला, आणि तिचें अंतःकरण कामविकारानें युक्त झालें. ती त्या श्वेत कमलासनावर बसलेली असतां मुनीच्या दर्शनमात्रेंकरूनच समागमाचें सुख पावून कृतार्थ झाली. आणि त्या

क्षणींच त्या श्वेतकमलापासून एक कुमार उत्पन्न झाला. तदनंतर त्या देवीनें त्या कुमारास अंकावर घेऊन श्वेतकेतु महामुनीस जवळ बोलावून हे भगवन् हा आपला पुत्र घ्यावा असें म्हणून तो कुमार त्या महामुनीला दिला. महामुनीनें तो कुमार घेऊन जातकर्मादि सर्व क्रिया करून तो पुंडरीककमलापासून उत्पन्न झाला म्हणून त्याचें पुंडरीक हेंच नांव ठेविलें. पुढें कांहीं काळ गेल्यावर त्यास ब्रह्मचर्यव्रत देऊन संपूर्ण विद्यासमूह पढविला. तो हा.

आतां त्याच्या कर्णावर जी भूषणार्थ पुष्पमंजरी ठेविलेली आहे ती देवदैत्यांनीं क्षीरसागराचें मंथन केलें त्यासमयीं जो पारिजात नामक कल्पवृक्ष आंतून निघाला त्याची आहे. ती मंजरी ह्यास कशी प्राप्त झाली म्हणशील तर सांगतों. आज चतुर्दशी शिवतिथि आहे म्हणून कैलास पर्वतावर राहणारा जो अंबिकापति महादेव त्याची पूजा करावी म्हणून देव लोकापासून मजसहवर्तमान हा ऋषिकुमार नंदन वनाच्या जवळून जात असतां नंदनवनाची देवता पारिजातपुष्पांची मंजरी हातीं घेऊन पुढें आली, आणि प्रणाम करून बोलली, कीं, हे भगवन् त्रिभुवन सुंदरा, हा अलंकार ह्या आकृतीला योग्य आहे ह्यासाठीं कृपाकरून ही पुष्पमंजरी घ्यावी, आणि आपल्या कर्णावर स्थापित करावी. येणेंकरून पारिजात वृक्षाचें जन्म कृतार्थ होवो. असें ती वनदेवता बोलत आहे तों, हा माझा वयस्य आपल्या रूपाच्या स्तुतीचें भाषण ऐकून लज्जित होत्साता खालीं दृष्टि करून ती पुष्पमंजरी नघेतां वनदेवतेचा अनादर करून तसाच पुढें गमन करावयास प्रवृत्त झाला. आपल्यामागें वनदेवता येत आहे असें पाहून मीं त्याला म्हटलें, हे सख्या, ह्या वनदेवतेच्या प्रीतिदानाचा स्वीकार करण्यास काय दोष आहे ? असें बोलून ह्या इच्छित नसतांही मीं तो पुष्पमंजरी वनदेवतेच्या हातांतून घेऊन बळेंच ह्याच्या कानावर ठेविली. ह्याप्रमाणें ह्याचा व ह्याच्या कर्णावरील मंजरीचा वृत्तांत मीं तुला सांगितला.

असें तो दुसरा ऋषिबालक बोलत असतां तो तरुण ऋषिकुमार किंचित् हास्य करून मला म्हणाला, अगे कौतुकवती, ह्या प्रश्नाचा व्यर्थ आयास तूं कशाला करतेस ? जर हिचा सुवास तुला अतिप्रीतिकर असेल तर ही घे. असें बोलून त्यानें माझ्या समीपयेऊन आपल्या कानावर-

ची पुष्पमंजरी हातानें काढून माझ्या कानावर ठेविली. त्यासमयीं त्याच्या करतलाचा स्पर्श माझ्या गालाला प्राप्त झाला त्या सुखाच्या लोभास्तव माझें हृदय जणो पुढें सरलें. आणि तोही माझ्या गालाच्या स्पर्शसुखानें इतका मोहित झाला कीं, त्याच्या हाताचीं बोटें कंपित होऊन रुद्राक्षाची माळ लज्जेसहवर्तमान खालीं गळाली तीही त्यानें जाणली नाहीं. इतक्यांत ती माळ भूमीवर पडली नाहीं तों मध्येंच झेलून घेऊन त्याच्या आलिंगन सुखाचा अनुभव घेण्यासाठींच काय कौतुकानें मीं आपल्या कंठांत घातली.

अशा प्रकारचा आम्हा उभयतांचा परस्पर प्रेमा पाहून माझी छत्र धरणारी दासी मला म्हणाली, हे राजपुत्रि, राणीसाहेबांचें स्नान होऊन घरास जाण्याची वेळ जवळ आली, तर आपण आपला स्नानविधि सत्वर करावा. असें तिचें भाषण ऐकतांच, जशी एखादी नवी धरलेली हत्तीण पहिल्याच अंकुश प्रहारानें आकर्षिली जाते तशी तिच्या वचनानें मी आकर्षिली जाऊन त्याच्या लावण्यामृतपंकांत रुतलेलीच काय अथवा त्याच्या गालावरील रोमांचरूप कंटकांत अडकलेलीच काय अथवा मदनाच्या शरपंजरांत सांपडलेलीच काय अथवा सौंदर्यगुणांत ओंवलेलीच काय अशी आपली दृष्टि मोठ्या कष्टानं कशी तरी त्याच्या मुखापासून काढून स्नान करावयासाठीं तेथून जावयास निघालें. मी निघून चालती झालें असें पाहून त्या ऋषिकुमाराचें धैर्य सुटलें. तेव्हां त्याचा धैर्यभ्रंश झाला असें समजून दुसरा ऋषिबालक कांहींसा प्रीतिकोप दाखवून त्याशीं बोलूं लागला, कीं, हे सख्या पुंडरीका, प्राकृतजन ज्या मार्गाचा अवलंब निरंतर करतात, तो मार्ग तुझ्या सारख्यास योग्य नाहीं. साधु पुरुषांचें धैर्य हेंच धन आहे, तर प्राकृत जनासारखा घाबरा कां झालास ? आणि धैर्य सोडणाऱ्या आपल्या अंतःकरणाचा निरोध कां करीत नाहींस ? तुझ्या इंद्रियांस आज हा अपूर्व विकार कोठून प्राप्त झाला, ज्या विकारानें तुझी ही अशी अवस्था करून टाकिली ? अरे तें तुझें धैर्य कोणीकडे गेलें ? तो तुझा इंद्रियांचा जय कोठें गेला ? तुझी ती अंतःकरण आंवरण्याची शक्ति कोणीकडे गेली ? तुझी ती अत्यंत शांतवृत्ति कोठें आहे ? आणि कुलक्रमानें प्राप्त झालेलें तें तुझें ब्रह्मचर्य कोठें गेलें ? तुझें तें विषय वैराग्य कोठें आहे ? व गुरूचे उपदेश कोणीकडे टा-

किले, व शास्त्र श्रवणें कोणीकडे गेलीं ? तसेंच सुखाविषयीं पराङ्मुखता, व तपश्चर्यैविषयीं अभिनिवेश, व भोगाविषयीं अप्रीति, व यौवनाचें दमन हीं तुझीं आहेत कोठें ? अरेरे, सर्व प्रकारें ती प्रज्ञा निष्फळ झालीना ! तो धर्मशास्त्राचा अभ्यास फुकट गेलाना ! तो संस्कार निरर्थक झालाना! अरे, गुरूचा उपदेश, विवेक, प्रबुद्धता, ज्ञान, ह्यांणीं तुजवर ह्यासमयीं कांहींच उपकार केला नाहीं. कारण, तुझ्यासारखे पुरुष देखील अशा विषयसंबंधानें मलिन होतात, व प्रमादानें पराजित होतात, तेव्हां काय बोलावें ! अरे, तुझ्या हातांतून अक्षमाला खालीं गळून पडली, आणि ती तिनें नेली हेंही तुला समजलें नाहीं, हें मोठें आश्चर्य ! काय हो हा बेशुद्धपणा ! माळा तर नेलीच, पण तुझें हृदयही त्या नीच स्त्रीनें हिरावून घेऊन चालविलें आहे, तें तरी आटोपून धर. जाऊं देऊं नको.

तेव्हां तो ऋषिकुमर त्या दुसऱ्या ऋषिकुमाराचें भाषण ऐकुन कांहींसा लज्जायुक्त होऊन त्यास पुन्हा बोलला, कीं, हे सख्या कपिंजला, मजविषयीं तूं भलती शंका कां करितोस ? ह्या द्वांडग्या कन्येनें माझी अक्षमाला घेतली, हा तिचा अपराध मी सोसणार नाहीं असें बोलून खोटाच कोप आणून भुंवया वक्र करून मला म्हणाला, कीं, अगे चपलस्वभावे, माझी अक्षमाला मला दिल्यावांचून एथून हाललीस तर खबरदार. असें बोलून माझ्या मुखाकडे दृष्टि लावून तो उभा राहिला असतां मीं आपल्या गळ्यांतली मोत्यांची माळ काढुन घेऊन, ही घे आपली अक्षमाला असें म्हणून, ती त्याच्या हस्तामध्यें टाकिली; आणि जरी माझें घर्मोदकानें स्नान झालें होतें, तरी स्नान करावयास पाण्यांत उतरलें. स्नान झाल्यावर जशी नदी उलटी माघारी वळवावी तशी सखीजनानें बलात्कारानें मला वळविल्यावर मी त्या ऋषिकुमाराचें चिंतन करीत आपल्या आईबरोबर घरास गेलें. आणि कन्यांतःपुरांत मीं प्रवेश केला. त्या वेळापासून त्याच्या विरहामुळें व्याकुळ होऊन मी आलें किंवा तेथेंच राहिले, मी एकटी आहें किंवा परिजनयुक्त आहें, मी बोलत आहें किंवा मौन धरून बसलें आहें, जागी आहें किंवा झोंपीं गेलें आहें, हास्य करीत आहें किंवा रोदन करीत आहें, सुख आहे किंवा दुःख आहे, उत्कंठा आहे किंवा व्यथा आहे, व्यसन आहे किंवा उत्सव आहे, दिवस आहे किंवा रात्रि आहे, हें कांहींच मला समजलें

नाहीं. मला मदनवृत्तांत माहीत नव्हता ह्यामुळें मी कोठें जात आहें, काय करीत आहें, इत्यादि माझें मला समजेनासें झालें. मग सखीजनाचें विसर्जन करून आणि परिजनाचा प्रवेश बंद करून सर्व व्यापार सोडून मी एकटीच अंतःपुराच्या प्रासादावर आरोहण करून मणिमुक्ताभूषित जें गवाक्ष त्यांत मुख घालून ज्या दिशेस तो ऋषिकुमार होता त्याच दिशेकडे पहात राहिलें. त्या ऋषिकुमाराच्या राहण्यानें ती दिशा अलंकृतच आहे काय, किंवा पुष्पित आहे काय, किंवा रत्ननिधीनें अधिष्ठित आहे काय, किंवा अमृतरसानें भरलेली आहे काय, किंवा पूर्ण चंद्रोदयानें सुशोभित आहे काय, असें मी मानिलें; आणि त्या दिशेकडून येणाऱ्या वायूस व सुगंधास व पक्ष्यांच्या शब्दांस त्या ऋषिकुमाराची वार्ता विचारावी अशी इच्छा धरिली. मदनाच्या योगानें त्या ऋषिकुमाराचा पक्षपात होऊन असें मनांत आलें कीं, त्या ऋषिकुमारास तपाचे क्लेश अतिप्रिय आहेत म्हणून आपण तेच स्वीकारावे. त्यानें स्वीकारल्यामुळें ऋषिवेष फार उत्तम आहे, यौवनानें त्याचा आश्रय केल्यामुळें यौवन हें फार सुंदर आहे, पारिजातपुष्पांच्या मंजरीनें त्याच्या कर्णाचा आश्रय केल्यामुळें ती मंजिरी फार मनोहर आहे, त्याच्या राहण्यामुळें देवलोक फारच रम्य असेल, त्याची रूपसंपत्ति पाहून मदन केवळ दुर्जय आहे असें वाटलें. दूरस्थ असून कमलिनी जशी सूर्यास, किंवा समुद्रवेला जशी चंद्रास, किंवा मयूरी जशी मेघास, अभिमुख असते, तशी मी त्या ऋषिकुमाराच्या अभिमुख होऊन त्याच्या विरहानें आतुर झालेले माझे प्राण त्यांनीं वर निघून जाऊं नये म्हणून रक्षाबंधनच काय अशी ती रुद्राक्षमाला मी आपल्या कंठामध्यें घातली; आणि कानावर ठेवलेली पारिजातमंजरी जणो त्याच्या गुजगोष्टी सांगावयासच कानाशीं लागली आहे तिच्या योगानें, व त्याचा हस्तस्पर्श झाल्यामुळें जें सुख झालें त्या योगानें, अंगावर रोमांच उठले, अशी होत्साती मी त्याजकडे लक्ष लावून निश्चळ उभी राहिलें.

तदनंतर, माझें तांबूलपात्र बाळगणारी तरलिकानामक माझी दासी माझ्याबरोबर स्नान करावयास गेली होती. ती माझ्या मागून फार वेळानें येऊन माझी तशी अवस्था पाहून मला म्हणूं लागली, अगे राजकन्यके, जे दिव्य आकाराचे दोघे ऋषिकुमार अच्छोद सरोवराच्या तीरावर आ-

पण पाहिले, त्यांतला एक, ज्यानें तुझ्या कर्णावर कल्पवृक्षाच्या पुष्पांची मंजिरी ठेविली तो, दुसऱ्या ऋषिकुमराची दृष्टि चुकवून पुष्पित लतांच्या दाटीमधून येऊन मी पाठीमागून येत आहें असें पाहून तुझ्या उद्देशानें मला प्रश्न करिता झाला कीं, अगे बालिके, जिच्या बरोबर तूं आली होतीस ही कन्या कोण, कोणाची, हिचें नांव काय, आणि ही कोठें जात आहे ? असा त्यानें प्रश्न केल्यावर मी बोललें कीं, चंद्रकिरणापासून उत्पन्न झालेली जी गौरीनामक अप्सरा तिजपासून झालेली गंधर्वांचा मुकुटमणि जो हंसनामा गंधर्वराज त्याची ही कन्या होय. हिचें नांव महाश्वेता, ही गंधर्व राहण्याचें स्थान असा जो हेमकूट पर्वत त्याजवर जात आहे. असें माझें भाषण ऐकून तो मनांत कांहीं चिंतन करीत मुहूर्तभर उगाच उभा राहिला, आणि निश्चल दृष्टीनें मजकडे फार वेळ पाहून व उत्कंठा प्रदर्शित करून मजशीं पुन्हा बोलूं लागला, अगे बालिके, तुझी मुद्रा फार सौम्य दिसते, ह्यावरून तूं गुणवती आहेस व अचपल आहेस असा निश्चय होतो. तर एखादी गोष्ट मी तुजपाशीं प्रार्थनापूर्वक बोललों असतां ती ऐकून घेऊन त्याप्रमाणें करशील असें मला वाटतें.

असें त्याचें भाषण ऐकून मीं मोठ्या नम्रतेनें हात जोडून आदरपूर्वक बोललें कीं, भगवन्, असें कां म्हणतां ? मी कोण, मी म्हणजे पदार्थ काय ? आपणासारखे जगत्पूज्य महात्मे आपल्या पवित्रदृष्टि आम्हांसारख्या क्षुद्र मनुष्यावर पाडतात तरी काय ? मग आज्ञा तर कोठून करणार ? तर आपलें जें काय कार्य असेल तें निःशंकपणानें मला सांगावें, आणि हाच ह्या जनावर अनुग्रह करावा. असें मी बोलल्यावर तो ऋषिकुमार संतोष पावून सखीप्रमाणें व उपकारिणीप्रमाणें व प्राणदात्रीप्रमाणें मला मानून व आपल्या अवलोकनानें आनंदित करून जवळच एक तमालवृक्ष होता त्याचा कोमल पल्लव काढून शिलातलावर तो चुरडून त्याचा रस काढून मत्तगजाच्या मदासारखा सुगंधी अशा त्या रसानें आपल्या उत्तरीय वल्कलाच्या पदराची एक पट्टिका फाडून काढून तिजवर आपल्या कनिष्ठिकेच्या नखाग्रानें कांहीं लिहून, ही पत्रिका तूं त्या कन्येला एकांतीं एकटी पाहून तिच्या हातीं द्यावी, असें बोलून माझ्या हातांत दिली, ती मीं आणिली आहे, ही पहा, असें बोलून तिनें

तांबूलपात्रांतून ती पत्रिका काढून मला दाखविली. ती पाहतांच मला इतका आनंद झाला कीं ऋषिकुमारसंबंधी जो आलाप दासीच्या मुखानें निघाला तो केवळ शब्दमय असतांही अंतःकरणांत स्पर्शसुखच काय करीत आहे, आणि तो कर्णेंद्रियाचा विषय असतां सर्वांगांवर रोमांच उत्पन्न झाल्यामुळें सर्वांगांत प्रविष्टच झाला काय, आणि तो मदनाच्या प्रवेशाचा मंत्रच काय, असें वाटून त्यानें आवेशयुक्त होऊन तिच्या हातांतून ती पत्रिका घेऊन तिजवर लिहिलेली ही आर्या म्यां पाहिली.

## आर्या.

बिससितमुक्ताहारें लागुनि लोभास हंस जो गेला ॥
तद्वन्मानसजन्मा माझाही दूरगे तुवां नेला ॥ १ ॥

## अर्थ.

कमलतंतूंप्रमाणें शुभ्रवर्ण जो मोत्यांचा हार त्याच्या योगानें लोभास गुंतून मानसजन्मा हंस जसा दूर नेला जातो तसा माझा मानसजन्मा म्हणजे काम तो कमलतंतूंप्रमाणें गौरवर्ण जी तूं त्या त्वां लोभवून दूर नेला.

अशा अर्थाची त्या पत्रिकेवर लिहिलेली आर्या म्यां वाचली. त्या योगानें माझ्या अंतःकरणास अत्यंत कामविकार होऊन दोषविकारांची वृद्धि झाली; आणि उन्मत्तासारखी किंवा पिशाचग्रस्तासारखी विवश होऊन अति विव्हल झालें. आणि ती माझी दासी मोठ्या भाग्याची असें मीं मानिलें, कारण कीं, तिला ऋषिकुमाराचें दुसऱ्यानें दर्शन प्राप्त झालें. ऋषिकुमाराशीं तिचें संभाषण झालें, ह्यामुळें ती जगांत मोठी धन्य आहे असें मानिलें, व ती माझी दासी असतां मी तिच्याशीं पूज्य बुद्धीनें आदरपूर्वक बोलूं लागलें. सखीप्रमाणें तिच्या गालाला व केशांला स्पर्श करून, अगे तरलिके, सांग बरें, तो ऋषिकुमार त्वां कसा पाहिला, आणि त्यानें तुझ्याशीं काय भाषण केलें, आणि तूं त्यापाशीं कितीवेळ पर्यंत होतीस, आणि तो कोठपावेतों आमच्या मागून आला ? असें मीं वेड्यासारखें पुनः पुनः तिला पुसिलें, आणि तिजसहवर्तमान त्या ऋषिकुमारासंबंधी गोष्टी बोलतां बोलतां त्या प्रासादावरच दिवस घालविला.

इतक्यांत सूर्याचें आरक्तबिंब गगनतलाच्या प्रांतभागीं उतरलें असतां, आणि सूर्याची आतपलक्ष्मी कामातुर स्त्रीप्रमाणें अनुरक्त होऊन सूर्यामागून गेली असतां आणि कमलांचीं पुष्पें मुकुलित झाल्यामुळें आंत भ्रमर गुंतून राहिले असतां, आणि चक्रवाक पक्ष्यांचे जोडे नियुक्त झाले असतां, माझी छत्र धरणारी दासी येऊन मला सांगूं लागली कीं, हे राजकन्ये, त्या ऋषिकुमारांपैकीं एक ऋषिकुमार द्वारप्रदेशापाशीं येऊन उभा राहिला आहे, आणि रुद्राक्षमाला मागावयास मी आलों आहें असें म्हणतो. ह्यावर जशी आपली आज्ञा.

असें मीं त्या छत्रधारिणी दासीचें भाषण ऐकिलें. त्यांत तिनें ऋषिकुमाराचें नांव घेतलें, तेवढ्यानेंच मी आपल्या ठिकाणावर बसलेली असतां द्वार प्रदेशापाशीं गेलें काय अशी होऊन जो आपणास प्रिय ऋषिकुमार तोच आला असेल अशी शंका झाल्यामुळें, एका चोपदाराला हाक मारून मीं सांगितलें कीं त्या ऋषिकुमाराला आंत घेऊन ये.

तदनंतर जसें रूपास अनुरूप यौवन, व यौवनास अनुरूप मदन, व मदनास अनुरूप वसंत, व वसंतास अनुरूप दक्षिणवात, तसा त्या ऋषिकुमारला अनुरूप असा त्याचा सखा कपिंजलनामक दुसरा ऋषिकुमार तो चोपदाराच्या मागून येत आहे असा मीं पाहिला. मग तो माझ्या समोर आला तेव्हां त्याची मुखचर्या खिन्न झाल्याप्रमाणें व याचना करणाऱ्याप्रमाणें माझ्या दृष्टीस पडली. तेव्हां म्यां उठून आदरपूर्वक त्यास प्रणाम करून आपल्या हातानें आसन बसावयास दिलें. तो आसनावर बसल्यावर त्याची इच्छा नसतां मीं बलात्कारानें त्याचे पाद प्रक्षालित करून आपल्या उत्तरीयाच्या पदरानें पुसिले आणि त्याच्याजवळ नुसत्या भुईवरच मी बसलें.

तदनंतर तो ऋषिकुमार मुहूर्तमात्र तसाच बसून कांहीं बोलावयाच्या इच्छेनें जी माझ्याजवळ तरलिका दासी उभी होती तिजकडे पाहूं लागला. मी त्याच्या पाहण्याचा अभिप्राय जाणून बोललें कीं, हे भगवन्, ही माझ्या शरीराहून निराळी नाहीं, तर आपणास जें काय बोलावयाचें असेल तें निःशंकपणानें बोलावें.

तदनंतर तो कपिंजलनामा ऋषिकुमार माझें भाषण ऐकून बोलूं लागला, कीं, हे राजपुत्रि, काय बोलूं, माझी वाणीच लज्जेनें बोलावयाच्या

विषयावर चालत नाहीं. पहा, कंद मूल फळें भक्षून वनांत राहणारा, शांतचित्त, तपोनिष्ठ, असा ऋषिजन कोणीकडे आणि मलिन, विषयी, कामुक, अशा जनांनीं ज्याचा अंगीकार केला असा विषय प्रपंच कोणीकडे ह्या दोहोंचा संबंध केवळ अनुचित होय पहा दैवानें काय आरंभिलें आहे. मला वाटतें हा ईश्वर लोकांस कदाचित् यत्नावांचूनही उपहासास पात्र करतो. मला समजत नाहीं कीं, हें आचरण वल्कलास योग्य, किंवा जटांस योग्य, किंवा तपश्चर्येस योग्य, अथवा हें धर्मोपदेशाचें अंग, आहे. अशी विटंबना पूर्वी कधीं पाहिली नाहीं. म्हणून हें अवश्य कथित केलें पाहिजे. दुसरा उपाय दिसत नाहीं, दुसरा प्रतीकार सांपडत नाहीं, व दुसरें शरण आढळत नाहीं. कथन केल्यावांचून अन्यगति नाहीं. न सांगितलें तर मोठा अनर्थ प्राप्त होणार. प्राण परित्याग करूनही मित्राचें रक्षण करावें असें आहे म्हणून सांगतों.

मी त्यावेळेस तुझ्या समक्षच मोठ्या कोपानें व निष्ठुरपणानें आपल्या मित्रास बोलावयाचें तें बोललों. तें त्वां ऐकलेंच असेल. मला अमळ वाईट वाटल्यामुळें मी त्याला तेथेंच टाकून व फुलें वेंचावयाचा व्यापार सोडून तेथून दुसरेकडे गेलों. मग तूंही तेथून गेलीस असें समजून हा एकाकी तेथें काय करतो तें पहावें म्हणून माघारा फिरून एका झाडाच्या आड उभा राहून त्या स्थळाकडे पाहूं लागलों, तों तो तेथें दिसेना. त्यावेळेस माझ्या मनांत अनेक तर्क उठले, असे कीं, हा काय मदनाच्या स्वाधीन होऊन तिजमागून गेला, किंवा ती गेल्यावर देहभानावर येऊन लज्जेनें माझ्या दृष्टीस पडूं नये म्हणून कोठें लपून बसला, अथवा मी निष्ठुर बोललों म्हणून मजवर रागावून मला टाकून कोणीकडे गेला, किंवा मलाच शोधावया करितां कोठें दुसऱ्या प्रदेशाकडे गेला. गेला कोठें असे तर्क मनांत करीत मुहूर्तभर उगाच तेथें उभा राहिलों. आणि जन्मापासून कधींच घडलें नाहीं असें जें त्याचें अल्पकाळ अदर्शन त्यामुळें उपताप पावून पुन्हा चिंतन करूं लागलों कीं, तो कदाचित् धैर्य गेल्यामुळें व्याकुळ होऊन व केल्या कर्माचा पश्चात्ताप पावून न जाणो एखादें भलतेंच आचरण करील. लज्जेच्या योगानें सर्व कांहीं होतें. तर आतां ह्याला एकाकी ठेवणें नीट नाहीं, असें मनांत आणून त्याला शोधावयाचा प्रयत्न करूं लागलों. शोध करीत असतां जों जों

तो माझ्या दृष्टीस पडेना तों तों मी स्नेहामुळें भयभीत होऊन मनांत वाईट चिंतीत वृक्षलता ह्यांच्या दाटीमध्यें व सरोवराच्या तटाकडून इकडे तिकडे दृष्टि देऊन चोहोंकडे फार वेळ फिरलों,

असा मी त्याला शोधीत फिरत असतां एके सरोवराच्या समीपभागीं भ्रमर कोकिल इत्यादि पक्ष्यांनीं व्याप्त अतिरमणीय अशा एका पुष्पित लतामंडपांत सर्व व्यापार सोडून चित्रासारखा स्तब्ध एका शिलातलावर बसलेला तो पुंडरीक नामक माझा सखा मीं अकस्मात् पाहिला. जवळ जाऊन पाहतों तों मुख पांढरें व कृश झालें आहे, डोळे मिटलेले आहेत, नेत्रांतून अश्रूंच्या धारा चालल्या आहेत, अधरोष्ठ कांपत आहे, व अधिक प्रमाणानें श्वास टाकीत आहे, व डाव्या गालावर डावा तळहात ठेविला आहे, आणि पारिजात पुष्पांची मंजिरी कर्णावरून नुकतीच जरी काढिली होती तरी तिचा सुवास कर्णप्रदेशीं असल्यामुळें त्याच्या लोभास्तव भ्रमरकुल मुखाजवळ गुंजारव करीत फिरत आहे, आणि सर्वांगावर रोमांच उभे राहिले आहेत, आणि उजव्या हातानें मोत्यांची माळ उराशीं धरिली आहे, बोलत नाहीं, पाहत नाहीं, ऐकत नाहीं, जणो निद्रित, किंवा समाधिस्थ, किंवा मोहित, किंवा भूतग्रस्त, किंवा मूर्छित, अशी त्याची अवस्था झाली आहे.

अशा अवस्थेस पावलेला जो माझा सखा पुंडरीक त्याजकडे मी चिरकालपर्यंत मेषोन्मेषरहित दृष्टीनें पाहून माझें अंतःकरण कंपित व खेदयुक्त झालें. आणि मी चिंतन करूं लागलों कीं, असा काय हा मदन असह्यवेग आहे कीं ज्या मदनानें एका क्षणांत हा माझा सखा अनिवार्य अवस्थांतरास नेला! आणि असला ज्ञानराशि ह्यानें एकाएकीं व्यर्थ व्हावें काय? ह्यास काय ह्मणावें? केवढें हें आश्चर्य! हा पुंडरीक लहानपणापासून स्वभावानें गंभीर, धीर, आणि अस्खलित चित्तवृत्ति, असा होता, म्हणून मला व इतर मुनिकुमारांस ह्याचा स्वभाव व चरित फार आवडत असे; आणि आज तर मदनानें ह्याच्या ज्ञानाचा पराभव करून, व तपःप्रभावाची अवगणना करून, व गांभीर्याचें उन्मूलन करून, प्राकृत जनाप्रमाणें हा अगदीं जडवत् करून टाकला. तस्मात् यौवनावस्थेंत चित्तवृत्ति स्थिर राहणें दुर्घट आहे. असें चिंतन करून पुढें जाऊन त्याच शिलातलाच्या एक्या कडेवर बसलों. त्यानें तर

डोळे झांकलेच होते, तरी त्याच्या खांद्यावर हात ठेवून मी त्यास बोल-लों कीं, हे सख्या पुंडरीका, त्वां हें काय मांडलें आहे ? अरे डोळे उघडू-न मजकडे पहा तरी असें मी बोलल्यावर त्या पुंडरीकानें चिरकाळ मिट-ल्यामुळें चिकटलेले व रोदन केल्यामुळें तांबडे झालेले व अश्रूंच्या पूरानें भरलेले असे आपले नेत्र मोठ्या कष्टानें उघडले. आणि मंददृष्टीनें फार वेळ मजकडे पाहून व दीर्घ सुसकारा टाकून लज्जेच्या योगानें अडखळत अडखळत माझ्याशीं भाषण केलें कीं, सख्या कपिंजला, तुला सर्व वृत्तांत विदित असून मला काय पुसतोस? असें मोठ्या संकटानें तो हळूच बोलला. मी तर तें ऐकून तशा अवस्थेवरून ह्याच्या विकाराचा प्रतीकार होणें कठीण असें समजलों, तरी सुहृदानें सुहृदाचें असन्मार्गापासून यथाश-क्ति सर्व प्रकारें निवारण करावें, असा मनांत निश्चय करून त्यास बो-ललों कीं, हे सख्या पुंडरीका, मला सर्व विदित आहे, पण मी येवढें तु-ला विचारतों कीं, जें हें त्वां आरंभिलें आहे हें काय गुरूंनीं उपदेशिलें आहे, अथवा धर्मशास्त्रामध्यें पठित आहे, किंवा हा काय धर्म संपादना-चा उपाय आहे, किंवा तपश्चर्येचा एक प्रकार आहे, किंवा स्वर्गास जा-ण्याचा मार्ग आहे, किंवा मोक्षप्राप्तीची युक्ति आहे, अथवा दुसरा कांहीं व्रतनियमाचा प्रकार आहे ? काय आहे तें सांग. अरे हें तुला मनानें चिंतावयास तरी योग्य आहे काय ? मग आचरावयास योग्य कोठून ? सांग बरें, अप्रबुद्ध पुरुषाप्रमाणें ह्या दुष्ट मदनानें उपहासास पात्रभूत के-लेला आपला देह त्याप्रत तूं कसा जाणत नाहींस ? हा मदन मूढजना-लाच आयास देतो आणि साधुजनांनीं निंदित केलेले विषय मूढजनासच बहुमान्य होतात. त्यांजविषयीं तुला सुखाची आशा कशाची ? जो पुरुष अनिष्ट कारक व परिणामीं विरस अशा विषयोपभोगाविषयीं सुख-बुद्धि करितो तो धर्माच्या बुद्धीनें विषवृक्षास पाणी घालतो, किंवा नील कमळांची माळ म्हणून खड्गवल्ली गळ्यांत बांधितो, किंवा महारत्न म्हणू-न अग्नि पदरीं बांधितो, असें समजावें. अशा प्रकारचा पुरुष तो मूर्ख जाणावा. तूं विषयाचें तत्त्व जाणत असूनही कोणत्या कारणास्तव अशा अज्ञानांत शिरतोस ? उन्मार्गानें जाणाऱ्या आपल्या इंद्रियांचें नि-वारण कां करीत नाहींस ? आणि क्षुभित झालेल्या अंतःकरणाचें निय-मन कां करीत नाहींस ? अरे मदन म्हणजे पदार्थ काय, धैर्य धरून त्या

दुष्टाची निर्भर्त्सना कर, केवळ नीचासारखा त्याच्या स्वाधीन होऊं नको.

असें मी बोलल्यावर माझ्या भाषणाचा तिरस्कार करून डोळ्यांचें पाणी करतलानें पुसून मला हातीं धरून तो माझ्याशीं बोलूं लागला, हे सख्या कपिंजला, तुला फार काय सांगू ? विषवेगापेक्षांही अति दुःसह जे मदनाचे बाण ते तुजवर पडले नाहींत म्हणून तूं सर्व प्रकारें स्वस्थ आहेस, आणि दुसऱ्यास सुखानें उपदेश करितोस. तर मी तुला सांगतों, ज्याला इंद्रियें असतील, किंवा ज्याला मन असेल, जो पाहत असेल, ऐकत असेल, व ऐकिलेलें मनांत ठेवीत असेल, आणि सदसत् विचार करावयास जो समर्थ असेल, त्याला तुझा उपदेश योग्य आहे. मला तर हें सर्व दुरापास्त आहे. स्थैर्य, धैर्य, ज्ञान, निग्रह, ही कथाच अस्तास गेली. कसे तरी यत्नावांचून धरिलेले प्राणमात्र अशा रीतीनें राहिले आहेत. उपदेशाचा काळ फार दूर गेला, आणि धैर्याचा अवसरही अतिक्रांत झाला, आणि निवारण करण्याची वेळ गेली, आणि ज्ञान व स्थैर्य यांचाही समय अतिक्रांत झाला. अशा प्रसंगीं तुझ्यावांचून दुसरा कोण मला उपदेश करणार आहे, किंवा अमार्गापासून माझें निवारण करणार आहे ? तुजवांचून दुसऱ्या कोणाच्या वचनांत म्यां रहावें ? तुझ्यावांजून दुसरा कोण ह्या जगांत माझा बंधु आहे ? काय करावें ? माझ्यानें आपलें निवारण करवत नाहीं. ह्या क्षणीं त्वां माझी अवस्था कशी झाली आहे ती पाहिली. तर आतां उपदेश करण्याचा काळ गेला. परंतु जोंपर्यंत मी जिवंत आहें तोंपर्यंत अतिदुःसह जो मदनाचा संताप त्याची प्रतिक्रिया त्वां करावी असें मी इच्छितों. माझीं अंगें पचत आहेत, ह्रदय कढत आहे, शरीर जळत आहे, दृष्टि दग्ध होत आहे. तर आतां अशा समयीं जें करावयास योग्य असेल तें त्वां करावें, असें बोलून माझा सखा पुंडरीक उगीच बसला.

असें त्याचें भाषण ऐकूनही मीं त्याला पुनः बोध केला, त्याला शास्त्रांतील दृष्टांत सहित व इतिहाससहित वचनें म्हणून दाखविलीं, त्याची प्रार्थना तर केली, त्याचें आर्जव तर केलें, परंतु तें सर्व फुकट झालें. जेव्हां तो कांहीं केल्यानें ऐकेना, तेव्हां मी मनांत असा विचार केला कीं, हा पराकाष्ठेचा विरहाक्रांत झाला आहे, ह्याचें निवारण करून

किंवा ह्यास उपदेश करून कांहीं फळ नाहीं, तर आतां ह्याच्या प्राण रक्षणाविषयीं तरी प्रयत्न करावा. असा निश्चय करून जवळच्या सरोवरांतून कमळ वल्लीचीं मृणालें ( देंठ ) पानें आणि पुष्पें आणून त्या लतागृहांतील शिलातलावर पुंडरीकास त्यांची शय्या करून दिली. त्या शय्येवर त्याला निजवून चंदनवृक्षाचा कोंवळा पाला आणून त्याचा रस काढून त्या सुगंधि व शीतळ रसानें ललाटापासून चरणतलापर्यंत त्याचें सर्वांग लिप्त केलें, आणि घाम बंद होण्याकरितां कर्पूर कदलीपासून कर्पूरचूर्ण आणून त्याच्या आंगावर टाकलें, आणि केळीचे पानानें त्याला वारा घातला. असें वारंवार करून आपल्या मित्राच्या संतापाची शांति करीत बसलों असतां, माझ्या अंतःकरणांत चिंता उत्पन्न झाली कीं, हा भगवान् कामदेव ह्याला असाध्य म्हणून कोणतें ही नाहीं. पहा, पशूंप्रमाणें वनांत राहणारा, व स्वभावानें भोळसर, असा हा जन कोणीकडे, आणि नानाविध विलास रसांची राशी अशी ती गंधर्व राजकन्या महाश्वेता कोणीकडे. तिचा अभिलाष ह्यानें धरावा काय ! ज्या कामानें अगाध गांभीर्याचा सागर असा हा पुंडरीक क्षणांत तृणबिंदुवत् लघुत्वास आणिला. त्याला दुर्घट म्हणून कांहीं नाहीं. अहो तें तप कोणीकडे आणि ही अवस्था कोणीकडे. ह्या संकटाचा प्रतीकार होणें अशक्य आहे. ह्या कालीं ह्याच्या प्राणरक्षणाकरितां कोणता उपाय करावा, कोणास शरण जावें, कोणत्या युक्तीनें हा माझा सखा पुंडरीक वांचेल ! अशा प्रकारच्या अनेक कल्पना माझ्या मनांत उत्पन्न झाल्या. शेवटीं मीं असा विचार केला कीं, अशी निष्प्रयोजन चिंता करीत बसणें व्यर्थ आहे. ह्याचे प्राण शुभ किंवा अशुभ तरी कोणत्या उपायानें रक्षिले पाहिजेत. प्राणरक्षणाचा मुख्य उपाय म्हटला तर महाश्वेतेच्या समागमावांचून दुसरा कोणताच नाहीं, आणि आपण स्वतः तिच्याकडे अभिगमनें करून आपला मनोरथ पूर्ण करून घेण्यास हा समर्थ नाहीं, आणि ह्याचा मदनविकार तर कालातिक्रम करण्याजोगा नाहीं. थोरांचें म्हणणें आहे कीं निंद्य कर्म करूनही मित्राच्या प्राणांचें रक्षण करावें, ह्यास्तव लज्जास्पद, अयोग्य, निंद्य, असें कर्म करणें भागास आलें, दुसरी गति नाहीं. मी तिजकडे जातों, तिला तुझी अवस्था कळवितों, असें त्याला सांगून जावें तर, मा-

ह्मा मित्र मजकरितां अयोग्य व्यापार करण्यास प्रवृत्त झाला, असें समजून तो लज्जित होऊन कदाचित् माझें निवारण करील. हें मनांत आणून त्याला न सांगतां दुसरें कांहीं मिष करून त्या स्थलापासून उठून मी तुजकडे आलों आहें. आणि त्याची अवस्था तुला कळविली आहे. ह्माउपर जें अवसर प्राप्त, जें अशा प्रेमास योग्य, व जें माझ्या येण्यास अनुरूप व जें आपणास उचित तें करण्याविषयीं तूं समर्थ आहेस. ह्माहून अधिक माझ्यानें बोलवत नाहीं. असें बोलून तो कपिंजल मुनिकुमारही काय उत्तर करिते तें ऐकावें म्हणून माझ्या मुखाकडे दृष्टि लावून उगाच राहिला.

असें त्याचें भाषण ऐकून मला असें वाटलें कीं, मी काय सुखरूप अमृताच्या डोहांत निमग्न झालें, किंवा प्रीतिरसाच्या समुद्रांत उतरलें, किंवा आनंद पर्वताच्या शिखरावर बसलें, किंवा मनोरथ वृक्षाच्या अग्रावर चढलें, किंवा सर्व उत्सवांच्या बिच्छान्यावर निजलें. असा सुखातिशय होऊन नेत्रांवाटे आनंदाश्रूंचा पूर वाहूं लागला. त्याक्षणीं माझ्या मनांत असें आलें कीं, ह्मा मदनानें जसें मला तसें त्यालाही परवश केलें. तर खरेंच ह्मानें मला संताप देत असूनही अनुकूलत्व दाखविलें. आणि जर खरीच त्याची अशी अवस्था असेल, तर ह्मानें मजवर मोठाच उपकार केला. ह्मा कपिंजल मुनीची वाणी खोटी म्हणतां येत नाहीं, कांकीं, ज्याची आकृति शांत अशाच्या मुखांतून खोटी वाणी निघेल कशी? अशा प्रसंगीं मीं तरी काय करावें, आणि काय उत्तर बोलावें, असें मनांत मी चिंतन करीत आहें तों, द्वारपालानें मोठ्या त्वरेनें येऊन मला सांगितलें कीं, हे राजकन्ये, तूं अस्वस्थशरीर आहेस असें परिजनाच्या मुखानें ऐकून महाराणी तुझ्या समाचाराकरितां प्राप्त झाली आहे. तें ऐकून कपिंजलऋषि जनाच्या दाटीस भिऊन सत्वर उठला, आणि मला म्हणाला, हे राजपुत्रि, हा मोठाच कालातिक्रम प्राप्त झाला, आणि सूर्यनारायणही अस्तास चालला. तर आतां मी जातों, तूं सर्व प्रकारें आपल्या इष्टजनाच्या प्राणांचें रक्षण कर, हीच दक्षिणा मागावयाकरितां हा मी तुला अंजलि जोडला आहे. हीच माझी संभावना. असें बोलून माझ्या प्रत्युत्तराची अपेक्षा न धरितां माझ्या आईच्या सेवक मंडळीच्या दाटींतून युक्तीनें बाहेर निघून गेला.

इतक्यांत माझी आई माझ्या जवळ येऊन कांहीं वेळपर्यंत बसून आपल्या मंदिरास गेली. त्या काळीं माझें तर अंतःकरण केवळ शून्य होतें. ह्यामुळें तिनें तेथें येऊन काय केलें व ती काय बोलली हें मीं कांहींच जाणलें नाहीं. माझी आई निघून गेल्यावर कमलिनीचा प्राणेश्वर, व चक्रवाकपक्ष्यांचा मित्र जो सहस्रकर सूर्य, तो अस्तास गेला असतां, आणि अंधकारानें दशदिशा व्यापिल्या असतां, मी पुढें काय करावें ह्याविषयीं मूढ होऊन त्याच तरलिकेस विचारिलें, अगे तरलिके, तूं कसें पाहत नाहींस ? माझें हृदय अत्यंत व्याकुळ झालें आहे, इंद्रियें विव्हल झालीं आहेत. पुढें काय करावें हें मला यत्किंचित्ही समजत नाहीं. तर ह्यासमयीं जें योग्य असेल त्याचा तूं मला उपदेश कर. तो कपिंजल तुझ्या समक्षच काय बोलून गेला तें त्वां ऐकिलेंच. जर मी इतर कन्येप्रमाणें लज्जा व धैर्य टाकून, सदाचाराचा अतिक्रम करून, कुलाची अवगणना करून, लोकापवादाचें भय सोडून, विषयांध होऊन, पित्याची अनुज्ञा व मातेचें अनुमोदन न घेतां त्याकडे जाऊन त्याजकडून आपलें पाणिग्रहण करवीन, तर गुरुजनाची अमर्यादा केल्यामुळें मोठा अधर्म होईल. बरें जर धर्मानुरोधास्तव इतर पक्षाचा अवलंब करून ( त्याकडे न जाण्याचा पक्ष धरून ) मृत्यूचा स्वीकार करावा तर प्रथम हाच दोष कीं आपण होऊन आलेला कपिंजलऋषि त्याचा मनोभंग केला असें होईल. दुसरा दोष, जर कदाचित् त्या जनाचा आशा भंग केल्यामुळें त्यास मरण प्राप्त होईल तर ऋषिजनाच्या वधाचें महापाप माझ्या मस्तकीं येईल. पुढें कसें काय करावें तें तूं सांग. असें मी बोलत आहें तों पूर्वदिशेचें मुख धवलित होऊन चंद्रोदय झाला, आणि त्याच्या प्रकाशानें वनपंक्ति धूसरवर्ण दिसूं लागल्या.

तदनंतर जों जों चंद्रमा वर येत चालला तों तों माझ्या अंतःकरणांत मदनाग्नि प्रज्वलित होऊन मला व्याकुल करूं लागला. तेव्हां मी तरलिकेच्या मांडीवर मस्तक ठेवून चंद्राकडे पाहून चिंतन करूं लागलें कीं, मदन, मधुमास, मलयमारुत इत्यादि सर्व पदार्थ एकीकडे आणि हा पापकर्मकर्ता मेला चंद्र एकीकडे. ह्याचें सहन करवत नाहीं. पहा मदनाच्या दुःसह वेदनेनें माझें हृदय पीडित झालें असतां ह्याच वेळेस हा कसा उदयास आला. हें असें झालें कीं, ज्वरदाहानें संतप्त झालेल्या-

वर जशी अंगार वृष्टि व्हावी, किंवा शीतानें पीडित झालेल्यावर जशी हिमवृष्टि व्हावी, किंवा विषाच्या फोडांनीं मूर्छित झालेल्यास जसा कृष्णसर्पाचा दंश व्हावा, तसें. असें मी चिंतन करीत असतां चंद्रोदयानें कमलिनीस जशी ग्लानि येते तशी मला मूर्छा येऊन डोळे झांकून मी पडलें. तसें मला पाहून माझी तरलिका दासी घाबरली. तेव्हां तिनें चंदनाची उटी माझ्या अंगास लावून ताडाच्या पंख्यानें मला वारा घातला. तेव्हां मी अंमळ सावध होऊन माझी अवस्था पाहून रोदन करणारी जी तरलिका तिच्या मुखाकडे पाहूं लागलें. मग मीं डोळे उघडले असें पाहून ती तरलिका हात जोडून मला म्हणाली कीं, हे भर्तृदारिके, आतां उगीच लज्जा कशास धरतेस आणि गुरुजनाची अपेक्षा कशास बाळगतेस. प्रसन्न हो. मला तिकडे पाठीव. मी तुझा हृदयप्रियजन घेऊन येतें, अथवा तूं स्वतः त्याजकडे गमन कर. इतःपर चंद्रोदयानें जसा समुद्र वृद्धिगत होतो तसा वृद्धिगत झालेल्या मदनाचें सहन करण्यास तूं समर्थ नाहींस. आतां कालातिक्रम करूं नको. ऊठ लौकर. असें तरलिकेचें भाषण ऐकून मी तिला बोललें, अगे वेडे, ह्या मदनानें अधिक तें काय करावयाचें आहे ? सर्व विकल्प घालविणारा, सर्व उपाय लोपविणारा, सर्व विघ्नें आच्छादणारा, सर्व संदेह दूर करणारा, सर्व शंकांचा तिरस्कार करणारा, लज्जेचें उन्मूलन करणारा, आपण होऊन अभिगमन करण्याच्या दोषावर माती लोटणारा, आणि कालातिक्रम न साहणारा, असा जो हा दोषाकर चंद्र तो मला त्या जनाकडे अथवा मृत्यूकडे न्यावयास आलाच आहे. तर चल आतां माझें जीवित आहे तों पर्यंत आयास पावणारा जो हृदयप्रियजन त्याला कसें तरी जाऊन भेटूं. असें बोलून मदनव्यथेनें जरी माझीं अंगें विव्हल झालीं होतीं तरी मी तरलिकेचा हात धरून मोठ्या कष्टानें उठून उभी राहिलें.

मी उभी राहिलें तों माझा उजवा डोळा लवला. त्यानें मला दुश्चिन्ह कळविलें असतां माझ्या मनांत कांहीं शंका येऊन असें वाटलें कीं, दैवानें हें दुसरेंच कांहीं आरंभिलें आहे.

इतक्यांत चंद्रबिंब बरेंच वर येऊन त्याच्या शुभ्र कांतीनें भूमंडळाचा मध्यप्रदेश व्याप्त केला असतां, आणि विलासिनी स्त्रियांनीं आपल्या

प्रियजनांकडे पाठविलेल्या दूतींनीं राजमार्ग व्याप्त केला असतां, मी गळ्यांत रुद्राक्षमाळा व कानावर पारिजात पुष्पांची मंजिरी असून तांबड्या वस्त्राचा बुरखा डोईवरून घेऊन कोणासही कळूं न देतां आपल्या मंदिराच्या शिखरावरून खालीं उतरलें. तेव्हां माझ्या बरोबर नानाप्रकारचीं पुष्पें, तांबूल, उटीचें साहित्य, व अरगजाचें चूर्ण, असे पदार्थ घेऊन एक तरलिका दासीमात्र होती. माझ्या कानावर जी पारिजात पुष्पांची मंजिरी होती तिच्या सुवासाच्या लोभानें भ्रमर समुदाय माझ्यामागें लागला असतां, मी प्रमदवनाकडच्या द्वारानें निघून त्या पुंडरीकाच्या समीप जाण्यास चालती झालें. मी जात असतां माझ्या बरोबर एकटी तरलिकामात्र होती, दुसरा परिजन कोणी नव्हता, तरी मी मनामध्यें असें आणिलें कीं, आपल्या प्रियजनाकडे अभिसरण करण्यास जो स्त्रीजन प्रवृत्त झाला त्याला बाहेरचा परिजन कशास पाहिजे. पहा हा प्रत्यक्ष मदन आपलें धनुष्य सज्ज करून माझ्या पाठीमागें चालला आहे, चंद्रमा हा आपल्या लांबविलेल्या करांनीं माझ्या हस्तास जणों आकर्षित आहे, पायांस लावलेल्या अलित्याच्या राग ह्याच पुंडरीकाविषयींचा अनुराग तो पाय निसरूं न देतां संभाळीत आहे, आणि लज्जेला मागें सारून इंद्रियांसहवर्तमान अंतःकरण पुढें धांव घेत आहे, आणि उत्कंठा मला संभाळून नेत आहे, असा विचार करून मग मीं तरलिकेशीं बोलूं लागलें. अगे तरलिके, हा मेला चंद्र माझ्या प्रमाणें त्या पुंडरीकास आपल्या करांनीं आकर्षून माझ्या अभिमुख आणील काय ? असें मी बोललें असतां ती तरलिका हास्य करून मला म्हणाली, हे राजकन्यके, तूं काय वेडी आहेस, ह्या चंद्राला त्या जनाचा काय उपयोग आहे. हा आपणच मदनातुर पुरुषाप्रमाणें राजकन्येवरच कामचेष्टा करीत आहे, असें मी पाहतें. तुझ्या गालावरच्या घर्मोदकांत त्याचें प्रतिबिंब पडलें आहे, त्या प्रतिबिंबाच्या मिषानें तो तुझ्या गालांचें चुंबनच करीत आहे, आणखी तो आपल्या शुभ्रकरांनीं तुझ्या उरस्थलास आणि कमरेवरच्या मेखलेस स्पर्श करीत आहे, आणखी तुझ्या पायाच्या निर्मल नखांत त्याचें प्रतिबिंब पडलें आहे ह्यावरून तो तुझ्या पायां पडत आहे असें वाटतें. अशा प्रकारें भाषण करीत करीत त्या सखीसहवर्तमान मी त्याच प्रदेशाच्या जवळ जाऊन पों-

हचलें. तदनंतर चालतांना मार्गांतील धुळीनें व पुष्पांच्या रजःकणांनीं मलिन झालेले आपले पाय चंद्रकांतमण्याच्या पाझरांत धुऊन अमळ पुढें गेलें तों सरोवराच्या पश्चिमतटावर जेथें पुंडरीक बसला होता त्या स्थलापासून येणारा असा पुरुषाचा रोदनध्वनि म्यां ऐकिला. तेव्हां अगोदर उजवा डोळा लवल्यामुळें मनांत शंका होतीच, त्यावर तो रोदन ध्वनि ऐकिला त्यानें तर माझें हृदय विदीर्ण झालें. आणि कांहीं अनिष्ट झाल्याची कल्पना मनांत आणून सभय होऊन, अगे तरलिके, हें काय आहे, असें बोललें. आणि कांपत अडखळत आणखी पुढें गेलें तों त्या रोदनामध्यें दुःखाच्या शब्दांचा उद्गार निघत आहे. तो असा कीं, हाय हाय, मेलों, हाय हाय जळालों, हाय हाय फसलों, हाय हाय काय हें अकस्मात् संकट आलें, हें काय झालें, नष्ट झालों. दुरात्म्या मदना, पाप्या, निर्दया, क्रायरे हें त्वां अकृत्य केलें, अगे पापिणी दुराचारिणी महाश्वेते, ह्यानें तुझा कोणता अपकार केला, अरे पाप्या चांडाळा चंद्रा, कृतार्थ झालास ना ? अरे दुष्टा दक्षिण वायो, तुझे मनोरथ पूर्ण झालेना ? आतां यथेष्ट वहा. हा भगवन् श्वेतकेतो, पुत्र वत्सला, आत्महरण झालेलें जाणत नाहींस. हायरे धर्मा, तूं निष्परिग्रह झालास, हायरे तपा तूं निराश्रय झालेंस, हायगे सरस्वती तूं विधवा झालीस, हायरे सत्या तूं अनाथ झालेंस, हायरे सुरलोका, तूं शून्य झालास. अरे सख्या, माझी वाट पहा. हा मी तुझ्या मागून लौकर येतों. तुजवांचून मी एकाकी क्षणभर रहावयास समर्थ नाहीं. अपरिचितासारखा, अनोळख्यासारखा आज एकाएकीं मला सोडून कसा चाललास ? कशामुळें तुला ही आज अशी निष्ठुरता प्राप्त झाली, सांग बरें ? मी तुजवांचून कोठें जाऊं ? कोणास याचना करूं ? कोणास शरण जाऊं ? मी अंध झालों. मला दिशा शून्य झाल्या. माझें जीवित निरर्थक झालें. माझें तप अप्रयोजन झालें. आणि लोकही सुखहीन झाले. आतां कोणा सहवर्तमान परिभ्रमण करूं ? कोणाशीं बोलूं सांग. आतां ऊठ लौकर आणि तुजकरितां मी दुःखांत पडून विलाप करीत आहें अशा मला एकदा तरी प्रतिवचन दे. अरे पुंडरीका, माझ्या वरचें सुहृत्प्रेम कोठें गेलें ? आणि तें पूर्वीचें स्मितपूर्वक भाषण कोठें गेलें ? अशा प्रकारें व आणखी दुसऱ्या प्रकारें कपिंजलानें केलेला विलाप म्यां ऐकिला.

तदनंतर जणो माण पतन पावतात काय, अशा प्रकारें दुरूनच मोठ्यानें हंबरडा फोडून सरस्तीराच्या वेलांस अडकून उत्तरीय वस्त्र जरी फाटलें तरी त्याकडे लक्ष न देतां व उंचसखल भूभागांकडे न पाहतां यथाशक्ति अतित्वरेनें कोणीं उचलून नेल्याप्रमाणें त्या प्रदेशास जाऊन पोहोंचलें. पाहतें तों सरोवराच्या कांठीं चंद्रकांत शिलातलावर कमलपुष्पें, मृणालें ह्यांची मृदु शय्या करून विजवर पुंडरीकास निजविलें आहे. हा निद्रित झाला आहे, किंवा मूर्छित झाला आहे, किंवा समाधिस्थ झाला आहे, हें कांहींच समजेना. त्याच्या कंठांत व मणगटांत मृणालांचीं वलयें घातलीं आहेत, उरावर कदलीचीं पानें ठेविलीं आहेत, सर्वांगास कर्पूरचूर्ण लाविलें आहे, उताणा पडलेला असून डावा हात उरावर पालथा ठेविला आहे, व उजवा हात उताणा ठेविला आहे, अशा प्रकारें चेतनारहित होऊन निचेष्ट पडलेला आहे. मला पाहतांच कपिंजलानें मोठ्यानें आक्रोश करून ज्याच्या कंठास आलिंगन केलें आहे, व नुकतेंच ज्याचें जीवित गेलें आहे, असा तो महाभाग्यवान् पुंडरीक ह्या पापिष्ट मंदभाग्येनें पाहिला.

तदनंतर मला मूर्छा येऊन डोळ्यापुढें अंधारी आली, आणि पाताळांत गेल्याप्रमाणें झालें. त्यावेळेस मी कोठें आहे, काय करतें, काय बोलतें हें कांहींच जाणलें नाहीं. माझेही प्राण तत्क्षणींच जावे, पण मूढ हृदयाच्या कठिणपणामुळें, किंवा शरीरानें दुःखसहस्राचें सहन करावें म्हणून, किंवा जन्मांतरीं केलेलें पाप भोगावयाचें होतें म्हणून, किंवा दुरात्मा जो मेला मदन त्याच्या वक्रत्वामुळें, कोणत्या हेतूनें प्राण निघून गेले नाहींत कोण जाणे. मग कांहींवेळानें मी सावध झालें तों शोकाग्नीनें दग्ध झालेला व भूमीवर गडबडां लोळणारा असा आपला देह केवळ पाहती झालें. आणि पुंडरीकास मरण प्राप्त झालें असून मी जिवंत आहे ह्याचें नवल मानीत तेथून उठून हाय हाय काय हें प्राप्त झालें असें म्हणून मोठा आक्रोश केला. हा आई, हा बापा, हा सख्यांनों, तुम्ही मला अंतरलां ना ! हा नाथा, हा जीविताधारा, हा अकरुणा, मला एकटीला टाकून कोठें गेलास ! तुझ्याकरितां मीं एक दिवसही सहस्रयुगाप्रमाणें घालविला. ह्या तरलिकेला पुस पाहिजे तर आतां प्रसन्न हो आणि एकदां तरी माझ्याशीं भाषण कर. आपली भक्तवत्सलता

दाखीव. डोळे उघडून किंचित तरी मजकडे पहा. माझा मनोरथ परिपूर्ण कर. मी अनुरक्त दासी आहें. मी दीन, अनाथ, दुःखित, अगतिक, अनन्यशरण, मदन परिभूत झालें आहे. मजवर कां दया करीत नाहींस ! सांग बरें म्यां तुझा कोणता अपराध केला ! कोणतें कार्य न केलें, आणि तुझ्या आवडीला मी कोणत्या गोष्टीनें प्रतिकूळ झालें कीं जेणेंकरून तूं इतका कोपला आहेस ! कारणवांचून दासीस टाकून जाणारा तूं लोकापवादास कसा भीत नाहींस ! अथवा हेंही खरेंच कीं, खोटाच अनुराग दाखवून प्रतारणा करणारी अशी जी पापकारिणी स्त्री तिचा तरी तुला काय उपयोग आहे ! हायरे दैवा ! मी अद्यापि कशी वांचलें ! मेलें कशी नाहीं ! हा नाथा ! मला तूं नाहींस, मातापितर नाहींत, बंधुवर्ग नाहींत, इहलोक नाहीं, परलोक नाहीं, मला धिक्कार असो. मी केवढी पापकारिणी कीं, ज्या माझ्या करितां तुझी अशी दशा झाली. माझ्या सारखी क्रूर अंतःकरणाची कोणी नाहीं, जी मी तुला सोडून घरीं निघून गेलें. काय मला घराचें प्रयोजन होतें, आईचा काय उपयोग, बापाचें काय कार्य, बंधुवर्गाचें कोणतें फळ, आणि परिजनाचें तरी काय कारण होतें. हायहाय, आतां मीं कोणास शरण जावें! अरे निर्दया दैवा, कांहीं तरी दया दाखीव. तुला मी शरण आलें. माझा प्रिय हीच मला देणगी दे. हे भगवति भवितव्यते, कृपाकर आणि ह्या अनाथ स्त्रीचें रक्षण कर. अहो भगवति वनदेवतांनो, तुम्ही तरी प्रसन्न व्हा, आणि माझ्या प्रियाच्या प्राणांचें दान मला द्या. माते पृथ्वी, तूं सर्व लोकांवर अनुग्रह करणारी आहेस. मग मजवर कां दया करीत नाहींस ? हे बापा कैलासा, तुला मी शरण आलें आहे ह्यासमयीं आपली दयालुता प्रगट कर. अशा प्रकारें व आणखी दुसऱ्या प्रकारें म्यां बहुत विलाप केला किती स्मरण करून सांगूं ? भूतग्रस्ताप्रमाणें व उन्मत्ताप्रमाणें फारच बडबड केली. त्यावेळेस माझ्या नेत्रांतून अश्रूंचा प्रवाह चालला होता. जशी त्याच्या जीविताची तशीच मी आपल्या मरणाची इच्छा करीत होतें. आणि मीं आपल्या करतलानें त्याच्या कपोलास, व त्याच्या ललाटास, व त्याच्या स्कंधास, व त्याच्या हृदयास वारंवार स्पर्श करून म्हणें कीं, अरे पुंडरीका तूं मोठारे निष्ठुर आहेस ! मी इतकी तझी विनवणी करीत असतां, तुजकरितां पीडित झाले-

ल्या माझी तूं गणना करीत नाहींस ! अशा प्रकारें वारंवार त्याची निंदा करून प्रश्नही करिती झालें. व त्याच्या मुखाचें चुंबन आणि कंठाचें आलिंगन वारंवार करून अतिशयित आक्रोश करिती झालें. रुद्राक्ष-मालेबद्दल जी मी त्यास मोत्यांची माळ दिली होती ती त्याच्या कंठांतच होती, तिचें निर्भर्त्सन करून मी तिलाही म्हटलें कीं, अगे पापिष्टे, कठि-णे, एकावली, तूं माझी असून मी परत येईपर्यंत माझ्या प्रियाचे प्राण त्वां रक्षिले नाहीं. आणि कपिंजलाच्या पायांपडून त्यास विनविलें कीं, हे महापुरुषा, ह्या पुंडरीकाच्या उज्जीवनाचा तूं कांहीं तरी उपाय कर. असें बोलून तरलिकेला कंठाशीं धरून पुष्कळ रोदन केलें. अजूनही चिंतन करतांना मला मोठें नवल वाटतें कीं, पूर्वीं कधीं न ऐकलेलीं, क-धीं न पाहिलेलीं अशीं प्रेमयुक्त दीनभाषणें चिंतन केल्यावांचून, व शि-कविल्यावांचून, मज मंदभाग्येच्या मुखांतून निघालीं तरी कशीं ! अशा प्रकारें आपला वृत्तांत ती महाश्वेता सांगत आहे, तों तिला एकाएकीं मूर्छा येऊन ती शिलातलावर पडूं लागली. इतक्यांत परिजनाप्रमाणें मोठ्या त्वरेनें पुढें हात करून त्या चंद्रापीडानें पीडित होऊन तिचें शरीर संभाळिलें. आणि वारा घालून तिला सावध केलें. तिचा वृत्तांत ऐकून चंद्रापीडाचेंही अंतःकरण अति दुःखित झालें. तेव्हां त्यास करुणा ये-ऊन तो महाश्वेतेला म्हणाला, हे भगवती, म्यां पापिष्ठानें हा तुझा शो-क पुन्हः नवेपणास आणिला, ज्याच्या योगानें तूं असली दशा अनुभ-वीत आहेस, तर आतां ही कथा पुरे, आटोपावी. मीही ही कथा पुढें ऐकावयास समर्थ नाहीं. कारण अतिक्रांत होऊन गेलेल्या दुःखाचें जर कोणी कथन करूं लागलें, तर तीं दुःखें सुहृज्जनास वेदना करितात, व आतां तीं अनुभवीत आहों, असें वाटतें. ह्यासाठीं कष्टानें कसे तरी धरिलेले प्राण वारंवार स्मरणानें उत्पन्न झालेल्या शोकाग्नींत का-ष्ठत्वाप्रत नेण्यास तूं योग्य नाहींस. असें बोलून चंद्रापीड राजपुत्र उगीच राहिला.

तदनंतर ती महाश्वेता दीर्घ उष्ण श्वास टाकून डोळ्यांतून पाणी गाळून अति खिन्न होत्साती बोलूं लागली, हे राजपुत्रा, जिला तशा भ-यंकर रात्रीचे ठायीं ह्या क्रूर प्राणांनीं सोडिलें नाहीं तिला हे प्राण आतां सोडून जातील ही गोष्ट दुरापास्त आहे. मला असें वाटतें कीं, मी अ-

पुण्यानें हत झालेली पापकारिणीच आहें म्हणून यमही माझें दर्शन न घ्यावें ह्या कारणानेंच मला न्यावयास येत नाहीं; आणि अशी कठिण त्हृदयाची जी मी त्या मला शोकतरी कोठून होणार. सर्वथा हें त्या खोड्या शठत्हृदया मदनाचें कृत्य आहे. त्या निर्लज्जानें तुलाही निर्लज्जामध्यें अग्रेसर केलें. ज्या म्यां वज्रमाय त्हृदय करून मदनवेदना सोसल्या त्या मला त्यांचें कथन करणें काय अशक्य आहे ? अथवा जें सांगितलें ह्याहून अधिक कष्टकारक असें तरी दुसरें कोणतें सांगावयाचें राहिलें आहे कीं, जें ऐकावयास व सांगावयास शक्य नाहीं ? आतां येवढेंच सांगावयाचें राहिलें आहे कीं, ह्या वज्रपात झाल्यानंतर जें कांहीं एक आश्चर्य पाहिलें आणि प्राणरक्षणाविषयीं जें यत्किंचित् आशा निबंधन झालें त्याचें कथन करितें. त्याच आशारूप मृगतृष्णिकेला मोहित होऊन हें भारभूत, अप्रयोजक, नष्ट, शरीर धरून राहिलें आहें.

तशा संकटसमयीं मी आपल्या मरणाचा निश्चय करून तरलिकेला म्हटलें कीं, अगे निष्ठुर त्हृदये, ऊठ, आतां मी रोदन किती करूं ? लौकर काष्ठें आणून चिता तयार कर. माझ्या जीवितेश्वराच्या मागून मला लौकर गेलें पाहिजे. असें मी बोलत आहे इतक्यांत चंद्रमंडळापासून निघालेला, श्वेतदेह, श्वेतवस्त्रें, किरीट, कटक, कुंडलें, मुक्तामाला, ह्यांचें धारण करणारा; आणि ज्याच्या देहाचा सुगंध आसमंतात्भागीं पसरत आहे असा; कोणी दिव्याकृति पुरुष येऊन त्यानें आपल्या गजशुंडाकार सरळ बाहूंनीं मृत झालेल्या पुंडरीकास उचलून घेऊन गंभीर वाणीनें हे वत्से महाश्वेते, तूं प्राण टाकूं नको, पुन्हा तुझा ह्याच्याशीं समागम होईल, असें आदरानें पित्याप्रमाणें मला सांगून त्या मृतशरीरासहवर्तमान आकाशमार्गानें उड्डाण करिता झाला. मी तसें तें कृत्य पाहून भय, विस्मय, आणि कौतुक ह्यांनीं युक्त होत्साती मुख वर करून हें काय असें कपिंजलास विचारिती झालें. तो कपिंजल तर मला उत्तर न देतां मोठ्या घाबरेपणानें उठून, अरे दुष्टा अंतका, माझ्या सख्यास घेऊन कोठें जातोस, असें बोलून कंबर बांधून कोपाविष्ट होत्साता त्या महापुरुषाच्या मागून आपणही आकाशांत गेला. पाहतां पाहतां ते दोघेही तारागणाच्या मध्यांत प्रविष्ट झाले. माझें त्हृदय तर प्रियतमाचें मरणच काय असें कपिंजलाचें निर्गमन पाहून द्विगुणित

शोकानें विदीर्ण झालें. त्याकाळीं मी काय करावें ह्याविषयीं मूढ हो-ऊन तरलिकेस बोललें, गे तरलिके, हें काय तें तूं जाणतेस ? सांग बरें ? ती तरलिका तर स्त्रीस्वभावामुळें भयभीत होऊन कांपूं लागली, आणि माझ्या मरणाच्या शंकेनें दीन व खिन्न होत्साती दीनवाणीनें मला बोल-ली कीं, हे राजकन्ये, पापकारिणी, मी कांहीं जाणत नाहीं. हें कृत्य मोठें आश्चर्यकारक झालें. जो पुरुष आला तो दिव्याकृति होता. त्या-नें राजकन्येस आश्वासन दिलें आहे. प्रायशः अशा दिव्याकृतीचें भा-षण मिथ्या असत नाहीं. ह्याजकरितां राजकन्येनें विचार करून आ-पणास प्राण परित्यागाच्या निश्चयापासून निवृत्त करावें हें योग्य आहे असें मला वाटतें. आणखी त्याच्या मागून कपिंजलही गेला आहे. तो आल्यावर हा दिव्य पुरुष कोण, कोठून आला, ह्यानें गतप्राण पुंडरीक कशासाठीं उचलून नेला, व कोठें नेला, आणि त्यानें राजकन्येचें आ-श्वासन कोणत्या कारणास्तव केलें, हें सर्व समजून घेऊन मग तूं आप-ल्या जीविताचें धारण किंवा परित्याग कर. प्राणपरित्याग सुलभ व स्वाधीन आहे. पाहिजे तेव्हां करितां येईल. कपिंजल जिवंत असतां तुला भेटल्यावांचून राहणार नाहीं. ह्याजकरितां तो परत येई तों पर्यंत तरी प्राण धारण कर. असें बोलून ती माझ्या पायां पडली. मी तर त्याकालीं तिचें वचन ऐकून विचार करून दुराशेस्तव तिच्या वचनास मान दिल्याप्रमाणें करून आपलें जीवित टाकिलें नाहीं. आशेनें कोण काय करीत नाहीं ? मग त्या सरोवराच्या तीरींच भूमीवर लोळत पडू-न तरलिकेसहवर्तमान वर्षसहस्राप्रमाणें ती भयंकर कालरात्री चिंतेंत घालविली.

पहांटेस उठून त्याच सरोवरामध्यें स्नान करून त्या पुंडरीकाच्या प्रीतीमुळें त्याचाच कमंडलु, त्याचींच वल्कलें, त्याचीच अक्षमाला, घे-ऊन संसार हा निःसार असें जाणून, वैराग्याचें अवलंबन करून, माता पिता बंधुवर्ग परिजन ह्यांचा त्याग करून, इंद्रियनिग्रह करून, अना-थाचें रक्षण करणारा एक त्रैलोक्यनाथ सदाशिव आहे त्यासच शरण करावें असा निश्चय करून, त्याच्या सेवेसाठीं येऊन त्याच्या आश्रयानें येथें राहिलें. दुसरे दिवशीं मजकडील वर्तमान आपास समजल्यावरून

माझ्या मातेसहवर्तमान तो येथें येऊन, त्यानें फार वेळपर्यंत शोक करून, त्यात्या उपायांनीं व प्रार्थनांनीं, व उपदेशांनीं व सांत्वनांनीं, माझें घरीं येणें व्हावें म्हणून बहुत प्रयत्न केला; परंतु तो सफल झाला नाहीं. मी त्याचें पुनः पुनः विसर्जन केलें तरी कन्येच्या प्रीतीस दुस्त्यजता असल्यामुळें तो कितीएक दिवस येथें राहून शोकानें दग्धत्हृदय होऊन आशा सोडून घरीं गेला.

पिता निघून गेल्यावर त्या दिवसापासून प्रियतमाकरितां अश्रुमोक्षणानेंमात्र कृतज्ञता दाखवीत, त्याच्या प्रेमानें कृश, अपुण्यानें व्याप्त, लज्जेनें रहित, अमंगल, क्लेशपात्र असें हें शोकदग्ध शरीर बहुत प्रकारच्या अवघड नियमांनीं शुष्क करीत, आणि वनांतील फळें, मूळें, उदक, ह्यांहीं करून शरीर निर्वाह करीत, आणि ह्या सरोवरामध्यें त्रिकाल स्नान करून श्रीमहादेवाची पूजा करीत, आणि ह्या गुहेमध्यें तरलिकेसहवर्तमान दीर्घ शोकाचा अनुभव घेत, फार दिवस राहिलें आहें. अशा प्रकारची पापकर्म करणारी, दुर्लक्षण, निर्लज्ज, निष्प्रयोजन, निंदापात्र, वीफलजी, विल, अनाथ, निराधार, आश्रयरहित, सुखविहीन मी आहे. अशा माझ्या दर्शनाचें तुज महाभाग्यवंताला काय फल, आणि अशा मला प्रश्न करण्याचा तरी काय उपयोग, जिणें ब्राह्मणहत्यारूप महापातक केलें ? असें बोलून शरत्कालच्या शुभ्र मेघानें जसें चंद्राचें आच्छादन तसें शुभ्रवल्कलाच्या पदरानें आपले मुखाचें आच्छादन करून नेत्रावाटे अश्रूंचे पूर चालत असून गळा मोकळा करून फार वेळपर्यंत रोदन करीत बसली.

चंद्रापीडनामक राजपुत्र तर अगोदर तिच्या रूपानें व विनयानें व मधुर भाषणानें व शांतस्वभावानें तिचें गौरव आपल्या अंतःकरणांत मानीत होताच. त्यावर तिच्या सद्भावगर्भित वृत्तांताचें श्रवण केलें त्यायोगानें लुब्धांतःकरण होऊन त्या महाश्वेतेवर अत्यंत प्रीति करिता झाला. आणि स्नेहरसानें आर्द्रचित्त होऊन तिच्याशीं बोलूं लागला कीं, हे भगवती, जो जन क्लेशाविषयीं भितरा, उपकार न जाणणारा, व सुखाची इच्छा करणारा, तो स्नेहास योग्य जें कर्तव्य कर्म तें न करितां केवळ अश्रुपातानें मात्र स्नेह दाखविण्यासाठीं रोदन करितो. तूंतर प्रेमास योग्य असें सर्व आचरण केलें. करावयाचें राहिलें कोणतें ? कीं

ज्यामुळें तूं रोदन करितेस ? आणि त्याजसाठीं जन्मापासून परिचित, तुजवर प्रेम ठेवणारा, अत्यंत प्रिय, असा जो गुरुजन, बंधुजन, परिजन, ह्यांचा त्याग केला; संपत्तीचीं सुखें तिरस्कृत केलीं; आपलें शरीर क्लेशास पात्र केलें, ब्रह्मचर्यव्रत घेतलें, स्त्रीजनास दुष्कर व कष्टकारक असा जो अरण्यवास त्याचा त्वां स्वीकार केला. माता, पिता, भ्राता, सखा, किंवा भर्ता, मरण पावला असतां, शोकानें आपला प्राणत्याग करणें हें कर्म केवळ साहसाचें, व मोहाचें, व मूर्खत्वाचें होय. ते प्राण स्वतां आपणास जर न सोडितील तर आपण त्यांस सोडूं नये. विचार केला असतां असला प्राणत्याग हा स्वार्थपर आहे. कारण कीं, तेणें करून प्रियजनाच्या शोकानें होणारी जी तीव्र वेदना ती मात्र नाहींशी होते. परंतु जो मरण पावला त्यास त्यापासून कांहीं उपयोग होत नाहीं. मेलेला प्राणी पराधीन होऊन कर्मार्जित भूमीस जातो, आणि हा प्राणत्याग करणारा आत्मघातरूप दोषानें युक्त होऊन अधःपातास जातो; आणि जिवंत राहिला तर मृताच्या उद्देशानें जलांजलिदान, पिंडदान, इत्यादि कृत्यानें मेलेल्यावर आणि आपणावर मोठा उपकार करतो. आत्मघातक्यापासून कोणावरही उपकार होत नाहीं. भगवान् मदन, आपला भर्ता सर्व जनांचें ह्रदय हरणारा असा सुंदर असून महादेवाच्या नेत्राग्नीनें दग्ध झाला असतां, त्याची स्त्री पतिव्रता रति, आपले प्राण न टाकितां, पुन्हा पतीच्या समागमाची प्रतीक्षा करीत राहिली, तिचें स्मरण कर. तसेंच महापराक्रमी विजयशाली जो पांडुराजा तो किंदमनामक ऋषीच्या शापानें मृत झाला असतां त्याची स्त्री कुंती महापतिव्रता तिनें आपले प्राण टाकिले नाहींत, तिचें स्मरण कर, तसेंच बालचंद्राप्रमाणें जनाच्या नेत्रांस आनंद देणारा जो अर्जुनपुत्र अभिमन्यु तो भारती रणांत पराक्रम करून मरण पावला असतां त्याची स्त्री विराटकन्या उत्तरा ती प्राणधारण करून राहिली, तिचें स्मरण कर. आणखी तसेंच महादेवाच्या प्रसादानें वाढलेला जो सिंधु देशाचा राजा जयद्रथ, आपला पति, तो अर्जुनानें लोकांतरास पाठविला असतां, जिणें प्राणपरित्याग केला नाहीं अशी जी शंभर भावांची लाडकी बहीण धृतराष्ट्राची कन्या दुःशीला, तिचें स्मरण कर. अशा किती दुसऱ्या देव दैत्य मनुष्य गं-

धर्व इत्यादिकांच्या कन्या भर्तृरहित होऊनही प्राणत्याग न करितां धृतजीवित राहिल्या अशा आम्ही हजारों एकतों.

आणखी माझें म्हणणें असें आहे कीं, पुंडरीकाच्या समागमाविषयीं जर संदेह असता तर तुला जीवित सोडणें योग्य होतें; परंतु ह्याशीं तुझा पुन्हा समागम होईल अशी महापुरुषाची वाणी त्वां एकिली आहे. तिच्या अनुभवाविषयीं विकल्प करणें व्यर्थ आहे. तशा दिव्याकृति पुरुषांची वाणी कधींही खोटी व्हावयाची नाहीं. आणखी, तूं जिवंत असून मृतासहवर्तमान तुझा समागम तरी कसा होईल ? ह्यावरून निःसंशय असें दिसतें कीं, ज्यास दया आली अशा त्या महापुरुषानें त्याचें पुन्हा प्रत्युज्जीवन करावें म्हणूनच त्यास उचलून देवलोकास नेलें. आतां मृताचें प्रत्युज्जीवन कसें होईल ? कधीं व्हावयाचें नाहीं, असें तूं समजूं नको. अशा गोष्टी मागें घडलेल्या आहेत. पूर्वीं विश्वावसुनामक गंधर्वराजाची प्रमद्वरानामक कन्या सर्पदंश होऊन जीवितरहित झाली असतां प्रमतीचा पुत्र तिचा भर्ता रुरुनामक ऋषिकुमार ह्यानें अपल्या आयुष्याचें अर्ध देऊन तिला जिवंत केलें. तसेंच अश्वमेधाचा घोडा सोडून त्याच्या मागून रक्षणास जाणारा जो अर्जुन त्याला त्याच्याच बभ्रुवाहन पुत्रानें युद्धांत बाण मारून गतप्राण केलें असतां नागकन्या उलूपी हिनें त्यास जिवंत केलें. तसेंच अभिमन्यूचा पुत्र परीक्षिति तो अश्वत्थाम्याच्या शस्त्रप्रभावानें मातेच्या उदरांतच मृत होऊन बाहेर पडला तेव्हां त्याची माता उत्तरा तिनें फार शोक केला त्यासमयीं श्रीकृष्णास दया येऊन त्यानें प्राणदान देऊन त्यास जिवंत केलें. तसेंच उज्जयिनी नगरींत सांदीपनीचा मृत पुत्र श्रीकृष्णानें यमनगरींतून आणून गुरूस गुरुदक्षिणा म्हणून दिला. येथें ही असेंच कांहीं होईल, ह्यांत संशय नाहीं. तथापि दैव बलवत्तर आहे. येथें कोणास दोष लावण्यास जागा नाहीं. आपण सर्व दैवपरतंत्र आहों. तें वागवील तसें वागलें पाहिजे. हा संसारमार्ग फार गहन आहे. ह्यांत अनेकविध संकटें प्राप्त होतात. त्यांत धीरपुरुष आहेत ते धैर्यानें सर्व आपत्ति तरतात. अशा बहुत प्रकारच्या मृदु भाषणांनीं तिचें सांत्वन करून त्या राजपुत्रानें झऱ्याचें उदक आपल्या ओंजळींत आणून ती इच्छित नसतांही बळेंच तिच्याकडून मुखप्रक्षालन करविलें.

इतक्या समयांत महाश्वेतेचा वृत्तांत ऐकल्यामुळें शोकाविष्ट हो-ऊनच काय दिवसव्यापार सोडून भगवान् सूर्य खालीं तोंड करून पाताळांत गेला असतां, व अंधकार वृद्धिंगत होऊं लागला असतां, व पशुपक्ष्यांचीं कुलें आपापल्या जागीं स्तब्ध झालीं असतां, आणि मंद सुगंध शीतळ असा वायु वाहूं लागला असतां, ती महाश्वेता हळू, हळू उठून कमंडलूंतल्या उदकानें पादप्रक्षालन करून भगवती सायंसंध्या हिचें उपासन करून व खेदाचा उष्ण दीर्घ सुसकारा टाकून, वल्कलाच्या शय्येवर बसली. चंद्रापीडही उठून जवळच्या झऱ्यावर जाऊन संध्योपासन करून पुनः परत येऊन जवळच्या दुसऱ्या एका शिलातलावर मृदु पल्लवांची शय्या करून तिजवर आपण बसला, आणि पुनः पुनः त्या महाश्वेतेच्या वृत्तांताचें मनांत चिंतन करिता झाला. मनांत म्हणतो, हा मदन महादुर्धर आहे, ह्याला प्रतीकार नाहीं. ह्याच्या आवेशाचें सहन होणें कठीण. ह्या मदनानें पराभूत केलेले मोठमोठे कालक्रमणाची अपेक्षा न धरितां धैर्य सोडून तत्काल जीविताचा परित्याग करतात. ह्या मदनानें सर्व त्रिभुवन आपलें अंकित केलें आहे. अशा ह्या मदनास सर्व प्रकारें नमस्कार असो. असें चिंतन केल्यावर त्यानें पुनः महाश्वेतेला प्रश्न केला कीं, हे भगवती, तुझ्या वनवासांतली मैत्रीण आणि दुःखाची सोबतीण अशी जी तुझी सखी तरलिका ती कोंठें गेली ?

राजपुत्राचा असा प्रश्न ऐकून महाश्वेता, बोलूं लागली, हे भाग्यवंता, जें पूर्वीं मीं तुला अमृतापासून एक अप्सरांचें कुल उत्पन्न झालें म्हणून सांगितलें, त्याच कुलांत विशालनयना, रूपवती, अशी मदिरा ह्या नांवाची एक कन्या उत्पन्न झाली. तिचें पाणिग्रहण गंधर्वांचा राजा जो चित्ररथ त्याणें केलें. तिच्या रूपानें व उत्तम गुणांनीं अंतःकरणांत अतिसंतुष्ट होऊन त्या गंधर्वराजानें तिला महादेवी असें अभिधान दिलें. तदनंतर तीं उभयतां परस्परांवर प्रेम वाढविण्याविषयीं तत्पर असून यौवनांतील सुखें उपभोगीत असतां, कांहीं कालानें त्यांपासून लोकोत्तर लावण्यादिगुणांनीं संपन्न आणि आईबापांचें व सर्व गंधर्वांचें एक जीवितच काय असें कादंबरी नांवाचें एक कन्यारत्न उत्पन्न झालें. ती कादंबरी माझ्याच वयाची ती अंमळ मोठी होऊन चालूं बोलूं

लागली तेव्हांपासून तिचें माझें मित्रत्व जडलें. तिनें आणि म्यां एका आसनावर बसावें, एका शय्येवर निजावें, एका पात्रांत भोजन करावें, एके ठायीं खेळावें. तिजवांचून मला व मजवांचून तिला क्षणभरही गमत नसे. तिचा मजवर व माझा तिजवर पूर्ण विश्वास. तिनें आणि मीं एके ठिकाणींच नृत्यगीतादिकलांचा अभ्यास केला. आणि शिशुपणास योग्य जे खेळ ते निष्प्रतिबंध खेळून बाल्य घालविलें. ती माझी सखी कादंबरी ह्याच माझ्या दुःखदायक वृत्तांतानें शोकयुक्त होऊन असा नियम करिती झाली कीं, महाश्वेता शोकयुक्त आहे तों पर्यंत मी आपलें पाणिग्रहण करविणार नाहीं. अशी तिनें सखीजनासमक्ष शपथ करून आणखी सांगितलें कीं, माझी इच्छा नसतां कदाचित् माझा पिता बलात्करानें कोणास द्यावयास इच्छील तर कोणत्या तरी उपायानें मी प्राणत्याग करीन. हा कन्येचा निश्चय परिजनाच्या मुखानें गंधर्वराजास श्रुत झाला. त्याला कांहीं काळ गेल्यावर कन्या पूर्णयौवनसंपन्न झालेली पाहून चित्ररथास चिंता प्राप्त झाली. आणि कन्येचा निश्चय स्मरून वारंवार दुःखी झाला, त्याला क्षणभरही सुख वाटेनासें झालें. त्याला ती तेवढेंच अपत्य, व अतिप्रिय त्यामुळें त्याला कादंबरीसमक्ष बोलवेना, व दुसरा उपाय सुचेना, म्हणून त्यानें महादेवी जी मदिरा तिच्याशीं विचार करून आपला चोबदार क्षीरोदनामा ह्याजबरोबर मला असा निरोप पाठविला कीं, हे महाश्वेते मुली, तुझें वर्तमान ऐकून आमचें अंतःकरण जळून गेलें, त्यांत हेंही दुसरें दुःख उपस्थित झालें; अशा प्रसंगीं कादंबरीचें सांत्वन करण्यास तूंच समर्थ आहेस, दुसरें कोणी नाहीं. त्यांचा असा निरोप ऐकिल्यावर त्यांच्या वचनगौरवामुळें व सखीच्या प्रेमभावामुळें आज पहांटेस त्या चोबदाराबरोबर तरलिकेस कादंबरीकडे पाठविलें आहे. तिला असें सांगून पाठविलें आहे कीं, हे सखि कादंबरी, दुःखित झालेल्या प्रियजनास आणखी वारंवार दुःख कां देतेस ? देऊं नको. आणि म्यां जिवंत रहावें असें तूं इच्छीत असशील तर गुरुजनाच्या आज्ञेप्रमाणें वाग. असा माझा निरोप घेऊन तरलिका कादंबरीकडे निघोन गेली, तों इतक्यांत महाभाग्यवान् आपण ह्या प्रदेशास आलां. इतकें बोलून महाश्वेता उगीच राहिली.

इतक्यांत लांछनाच्या मिषानें महाश्वेतेच्या शोकदग्ध हृदयाचें अनुकरण करणारा किंवा पुंडरीकनामा ऋषिकुमाराच्या वधाचें पातकचिन्ह धरणारा असा तारकाधिप मृगलांछन चंद्र उदयास आला असतां, व त्यानें क्रमें करून आकाशभाग धवलित केले असतां, व चक्रवाकपक्षी विरहानें आक्रोश करीत असतां तो चंद्रापीड राजपुत्र ती महाश्वेता निजली असें पाहून आपणही पल्लवांच्या शय्येवर निद्रा करिता झाला. आणि असें मनांत चिंतिता झाला कीं, माझा वैशंपायन प्रधान माझ्यावांचून काय करीत असेल, आणि ती बापडी पत्रलेखाही काय करीत असेल, व राजपुत्रांचा समुदाय तरी काय करीत असेल. असें चिंतन तो करीत असतां झोंपीं गेला. तदनंतर ती रात्रि संपून प्रातःकाळ झाल्यावर ती महाश्वेता प्रातःसंध्योपासना करून त्या शिलातलावर येऊन बसून अघमर्षणमंत्राचा जप करीत असतां, आणि तो चंद्रापीडही प्रातःकाळचा स्नानसंध्यादि विधि करून शेजारच्या शिलातलावर बसला असतां, सोळा वर्षांच्या वयाचा भव्याकृति असा केयूरकनामक गंधर्वकुमार बरोबर घेऊन तरलिका दिवस उगवतांच प्राप्त झाली. येतांच हा कोण म्हणून जिला कौतुक वाटलें अशी ती तरलिका चंद्रापीडाकडे फार वेळ पाहून महाश्वेतेच्या जवळ जाऊन तिला प्रणाम करून मोठ्या नम्रतेनें बसली. मग तो केयूरकही अत्यंत नम्रतेनें महाश्वेतेला प्रणाम करून तिनें दृष्टीनें सुचविलेल्या शिलातलावर बसला. आणि पूर्वीं कधीं न पाहिलेला, मदनाचाही तिरस्कार करणारा, व देव, दैत्य, गंधर्व, विद्याधर, ह्यांच्या सुंदर रूपाचा उपहास करणारा, असा जो रूपवान् चंद्रापीड, त्याला पाहून आश्चर्य पावता झाला.

तदनंतर महाश्वेता जप समाप्त करून तरलिकेस विचारूं लागली कीं, सखि तरलिके, त्वां कादंबरी पाहिली कीं ? ती खुशाल आहेना ? माझें वचन ती मान्य करील काय ? ह्यावर तरलिका मोठ्या नम्रपणानें व मधुरवाणीनें म्हणाली कीं हे राजपुत्रि, म्यां कादंबरी पाहिली, ती सर्व प्रकारें कुशल आहे. त्वां सांगितलेला सर्व निरोप मीं तिला कळविला. तदनंतर तिनें नेत्रावाटे अश्रु गाळून रोदन करून जो उलट निरोप पाठविला आहे तो मजबरोबर आलेला तिचा वीणाधारी केयूरक हाच सांगेल. असें बोलून ती उगीच बसली असतां केयूरक पुढें होऊन बोलूं

लागला, हे भर्तृदारिके महाश्वेते, देवी कादंबरी तुला दृढ आलिंगन करून विज्ञापना करीत आहे; ती अशी कीं तरलिकेबरोबर जो त्वां निरोप पाठविला हा काय गुरुजनाच्या वचनाचा अनुरोध, किंवा माझ्या चित्ताचें परीक्षण हें, किंवा मी घरीं राहिल्याबद्दल माझी निंदा, किंवा प्रेमाचा विच्छेद, किंवा भक्तजनाचा परित्याग, किंवा अंतःकरणांतील प्रकोप, आहे काय हें मला कांहीं समजत नाहीं. माझें हृदय तुजविषयीं किती प्रेमभरित आहे हें तूं जाणतच आहेस. असें असतां अति निष्ठुर निरोप सांगून पाठविण्याविषयीं तुला शंका कशी वाटली नाहीं ? तूं स्वभावतः मधुरभाषण करणारी असून असें कठोर भाषण करावयास तुला कोणीं शिकविलें ? तुझ्या दुःखानें मी दुःखित आहें. सुहृदाच्या दुःखानें दुःखित ज्याचें हृदय त्याला सुखाची अशा कोठची, व शांती तरी कोठची ? संभोगसुखाची वार्ता तर बोलावयासच नको. ज्यानें माझी सखी अशा दशेस पावविली, जो अत्यंत भयंकर, जो अप्रिय आचरण करणारा म्हणून जो विषासारखा वाटणारा, तो काम मी कसा सकाम करूं ? सूर्याच्या वियोगामुळें म्लान झालेल्या कमलिनीस पाहून तिच्या सहवासानें परिचित झालेली जी चक्रवाकी तीही खिन्न होऊन सुखाचा परित्याग करिते, मग आम्हांसारख्या स्त्रियांची काय कथा ? ज्या माझ्या हृदयामध्यें प्रियविरहानें दुःखित झालेली व परपुरुषाचें दर्शनही न घेणारी अशी माझी प्रियसखी रात्रंदिवस वागत आहे, तें माझें हृदय परपुरुषाची इच्छा कसें करील ? ज्या काळांत माझी प्रियसखी विरहदुःखित होऊन व्रतनियमांनीं देह कृश करून कष्ट अनुभवीत आहे त्याच काळांत सखीच्या दुःखाची अवगणना करून पाणिग्रहणसुखाची इच्छा म्यां करावी काय ? तुझ्या प्रेम्यामुळें कुमारींस विरुद्ध जें स्वातंत्र्य तें म्यां स्वीकारिलें, अयशाचा अंगीकार केला, विनय टाकला, गुरुजनाचा अतिक्रम केला, लोकापवादाचें भय सोडलें, आणि स्त्रीजनास भूषणभूत जी लज्जा तिचाही परित्याग केला. असें असून मी ह्या कर्माविषयीं कशी प्रवृत्त होऊं, सांग बरें ? तर मी तुला हात जोडून पायांपडून प्रार्थना करितें, मजवर अनुग्रह कर. माझ्या जीवितासहवर्तमान तूं येथून वनांत गेलेली आहेस म्हणून अशी गोष्ट स्वप्नामध्येंही मनांत आणूं नको. इतकें बोलून तो केयूरक उगाच राहिला.

महाश्वेतेनें त्या बोलण्याचा फार वेळपर्यंत विचार करून तूं जा, मीच स्वतां तेथें येऊन काय तें यथायोग्य करीन, असें सांगून केयूरकास परत जावयास आज्ञा केली. केयूरक गेल्यावर ती चंद्रापीडाशीं बोलूं लागली, हे महाभागा राजकुमारा, हेमकूटपर्वत तुवां पाहिला नसेल, फार रमणीय आहे. चित्ररथ गंधर्वाची विचित्र राजधानी तेथें आहे. तो किंपुरुषांचा व गंधर्वांचा कौतुककारी सुंदर लोक आहे, आणि सरलत्हृदया, महासामर्थ्यवती, माझी सखी जी कादंबरी, तीही तेथें आहे. जर गमन खेदकारक नसेल किंवा आपलें कांहीं कार्य नष्ट होत नसेल, व अपूर्व प्रदेश पाहण्याचें मनास कौतुक वाटत असेल, व आपली मति माझ्या वचनाचा अनुरोध राखीत असेल, व माझी प्रार्थना विफल करणें नसेल, व हा जन अनुग्रहास पात्र वाटत असेल, तर मी आपणास प्रार्थना करतें कीं, रमणीयतेचें निधान अशा हेमकूट पर्वतावर मजसहवर्तमान गमन करावें, आणि माझ्याशीं जिचा भेद नाहीं अशा कादंबरीस पाहून तिचें जें कुमतियुक्त मोहचेष्टित त्याचें निरसन करून एक दिवस विश्रांति घेऊन उद्यांच्या दिवशीं परत यावें. कारणावांचून ज्याचें बंधुत्व झालें अशा आपल्या महापुरुषाच्या दर्शनानें माझें चित्त पुन्हा संजीवित झालें, आणि मीं आपला वृत्तांत तुम्हांस ऐकविला त्यावेळेपासून माझा शोक मला साह्य झाला. सज्जनाचा समागम दुःखितजनासही रमवितो. तुम्हासारख्या पुरुषांचा गुणोदय दुसऱ्यास सुख देण्याविषयीं तत्पर असतो. असें महाश्वेतेचें भाषण ऐकून चंद्रापीड बोलला कीं, हे भगवती, आपलें दर्शन झाल्यापासून हा जन आपल्या स्वाधीन झाला आहे. जें कर्तव्य असेल त्याविषयीं मनांत शंका न धरितां पाहिजे तशी योजना करावी. असें बोलून तिच्या बरोबर तो हेमकूटपर्वताकडे चालता झाला.

गमनक्रमानें हेमकूटपर्वतावर जाऊन गंधर्वराजाचा वाडा मागें सोडून कांचनतोरणांनीं सुशोभित असे सात चौक वलांडून कन्यांतःपुराच्या द्वाराप्रत प्राप्त झाला. तेथें महाश्वेतेस पाहतांच सोन्याच्या काठ्या धरणारे द्वारपाल धांवत पुढें आले आणि त्यांनीं प्रणाम करून मार्ग दाखविला त्या मार्गानें चंद्रापीडानें आंत प्रवेश केला. तों आंत सहस्रावधि स्त्रियांची दाटी झालेली होती. पुरुष कोणीच नाहीं. सर्व स्त्रिया

सुंदरी असून वस्त्रालंकारांनीं भूषित होत्या. त्यामुळें तो स्त्रीमय दुसरा लोकच काय असें वाटलें. असें कुमारिकांतःपुर त्यानें पाहिलें.

अशा प्रकाराच्या अंतःपुरांत चंद्रापीडानें प्रवेश केला तों कादंबरीच्याजवळ असणारा जो परिजन त्याचें परस्पर अति मनोहर भाषण चाललें होतें. तें असें कीं, कोणी म्हणते, हे लवलिके, केतकीच्या धूलींनीं हरपरेवडीच्या झाडांस आळीं कर. कोणी म्हणते, हे सागरिके, गंधोदकाच्या हौदांमध्यें रत्नाची वाळू टाक. अगे मृणालिके, कृत्रिम कमलांच्या वेलींवर केशराच्या चूर्णानें चक्रवाक पक्ष्यांचीं जोडपीं काढ. अगे मकरिके, कर्पूरवृक्षाच्या पल्लवांच्या रसानें गंधपात्रें सुवासिक कर. अगे रजनिके, घरांतील बारवांजवळच्या तमालवृक्षाच्या अंधकारांत रत्नदीप ठेव. अगे कुमुदिके, दाडिमीफलांस पक्ष्यांचा उपद्रव न होण्याकरितां मोत्यांच्या जाळ्यांनीं झांक. अगे निपुणिके, रत्नांच्या पुतळ्यांच्या स्तनावर केशराच्या रंगानें वेलबुट्टी लिही. अगे उत्पलिके, सुवर्णशलाकांच्या मार्जनीनें कदलीगृहांतल्या मरकतमण्याच्या वेदिका झाडून स्वच्छ कर. अगे नलिनिके, गृहांतील कलहंसांस कमलांतला मधुरस पाज. अगे कदलिके, गृहांतल्या मयूरांस कारंज्याच्या गृहांत ने. अगे चूतलतिके, पिंजऱ्यांतल्या कोकिलांस आंब्याचा मोहर खावयास घाल. अगे लवंगिके, चकोर पक्ष्यांस पिंपळ्यांचे तुकडे दे. अगे मधुरिके, फुलांचे दागिने कर. अगे मयूरिके, संगीतशालेंत किन्नरांचे जोडे सोड. अगे हरिणिके, पिंजऱ्यांतील शुकांस व सारिकांस बोलावयास आणि गावयास शिकीव. ह्या प्रकारची व अशींच आणखी दुसऱ्या प्रकारचीं व कांहीं विनोदाचीं भाषणें ऐकत ऐकत चंद्रापीड कादंबरीच्या मंदिराजवळ गेला.

तदनंतर सेवेकरितां येऊन उभा राहिलेला जो स्त्रियांचा समुदाय त्यानें दोहों बाजूंस होऊन मधून दिलेल्या मार्गानें गमन करून ज्याच्या अग्रभागीं द्वारपालांचा समुदाय उभा आहे असा कादंबरीचा बसावयाचा श्रीमंडप चंद्रापीडानें पाहिला, आणि त्या मंडपाच्या मध्यभागीं बसलेली कादंबरीही पाहिली. ती अशी कीं जिच्याभोंवतीं उत्तम वस्त्रालंकारांनीं सुभूषित अशा हजारों कन्या बसल्या आहेत. मध्यें हस्तिदंती पलंगावर तक्क्यावर कोंपर टेकून जी बसली आहे. जिच्या-

भोंवतालीं चंवऱ्या वारणाऱ्या स्त्रिया उभ्या आहेत, आणि दुसऱ्या पुष्कळ सख्या तिच्या मुखावाटे निघालेलें कार्य करण्याविषयीं तत्पर होऊन आज्ञेची वाट पाहत उभ्या आहेत. जी आपल्या सखीजनाशीं विनोदाचीं भाषणें करीत आहे, आणि जी, आपल्या अग्रभागीं समीप बसलेली व चंद्रापीडाचें वर्णन करणारा, जो केयूरक त्यास कोणहा, कोणाचें अपत्य, त्याचें नांव काय, त्याचें रूप कसें आहे, त्याचें वय किती आहे, तो काय बोलत होता, तूं त्याशीं काय बोललास, किती-वेळपर्यंत त्याला त्वां पाहिलें, त्याचा महाश्वेतेशीं परिचय कसा झाला, आणि तो येथें येईल काय, त्याचें येणें येथवर होण्यास कोणता उपाय योजावा, अशा प्रकारें वारंवार चंद्रापीडसंबंधीच भाषण करून विचा-रणारी, आणि उत्तम लक्षणांनीं युक्त, रूपयौवनसंपन्न, अशी ती कादं-बरी चंद्रापीडानें त्या श्रीमंडपांत बसलेली पाहिली.

चंद्रापीडास कादंबरीचें दर्शन होतांच चंद्रोदयाच्या योगानें समुद्रा-चें उदक उल्लास पावतें तसें कादंबरीच्या मुखाच्या अवलोकनानें चं-द्रापीडाचें अंतः करण अत्यंत उल्लास पावलें. चंद्रापीडाच्या मनांत आलें कीं, माझीं इतर इंद्रियें ब्रह्मदेवानें नेत्रमय कां केलीं नाहींत. ह्या माझ्या नेत्रयुग्मानें जन्मांतरीं कोणतें शुभकर्म आचरिलें असेल, कीं जें ह्या का-दंबरीस निष्प्रतिबंध पहात आहे. काय आश्चर्य सांगावें ! ब्रह्मदेवानें सर्व रमणीयांचें एक स्थान असें हें कादंबरीचें स्वरूप अद्भुत अलौकिक उत्पन्न केलें आहे. असें रूप उत्पन्न करण्यास त्यानें सामग्री कोठून आणली असेल ? असा मनांत विचार करित आहे तों कादंबरीची दृष्टि चंद्रापीडाच्या मुखावर गेली. तेव्हां केयूरकानें ज्याचें वर्णन केलें तोच ह्या असें रूपातिशयावरून कादंबरीनें जाणल्यामुळें तिची दृष्टि प्रफुल्लित झाली. तीं दोघेंही एकमेकांकडे स्तब्ध दृष्टीनें फार वेळपर्यंत पाहत राहिलीं. चंद्रापीडास पाहतांच प्रथम कादंबरीच्या शरीरावर रोमांच उठले. मग ती उठून उभी राहिली. मांड्यांस व त्हदयास कंप सुटला. अंतःकरणांत लज्जा प्रविष्ट झाली. अशा प्रकारचे कामभाव कादंबरीस झाले. त्याचप्रमाणें चंद्रापीडासही झाले.

कादंबरी तर फार दिवसांनीं महाश्वेतेस पाहिल्यामुळें उत्कंठित हो-ऊन आयासानें कांहीं पावलें पुढें जाऊन तिच्या कंठास आलिंगिती

झाली, व महाश्वेतेनेंही तिला दृढालिंगन केलें. मग महाश्वेता कादंबरी-शीं बोलूं लागली, अगे सखी कादंबरी, भारत वर्षामध्यें समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्यकरणारा, व प्रजांचें उत्तम प्रकारें संरक्षण करणारा, तारा-पीड नांवाचा प्रसिद्ध सार्वभौम राजा त्वां ऐकिला असेल. त्याचा पुत्र हा चंद्रापीड, महा पराक्रमी, दिग्विजयाच्या प्रसंगानें ह्या भूमीस प्राप्त झाला आहे. मला ह्याचें दर्शन झाल्यापासून कारण नसतांही हा माझ्या बंधुतेस पात्र झाला आहे, आणि सर्वसंगपरित्याग करून विरक्त व निष्ठुर झालेली जी माझी चित्तवृत्ति तिचें ह्यानें आपल्या सरलस्वभावाच्या गुणांनीं आकर्षण केलें आहे. तुला एक सांगतें, चतुर असून अनुकूलपणानें वर्तणारा व निमित्तावांचून मैत्री करणारा, व अंतःकरण निष्कृत्रिम राखणारा, असा पुरुष फार दुर्लभ आहे. म्हणून माझ्याप्रमाणें तूंही ह्याला पाहूनच ब्रह्मदेवाचें निर्माणाविषयीं कौशल्य, रूपाची निरुपमता, लक्ष्मीची निवासयोग्यता, पृथ्वीला सत्पतिनिमित्त सुखरूपता, मर्त्यलोकास देवलोकापेक्षां श्रेष्ठता, व स्त्रियांच्या नेत्रांची सफलता, आणि सर्व कलांचा एकत्र समागम, हीं जाणशील म्हणून ह्याला मीं बलात्कारानें बरोबर आणिलें आहे; व तुजविषयीं ह्याला मीं बहुत प्रकारानें सांगितलें आहे. तर ह्याचें अपूर्वदर्शन झाल्यामुळें प्राप्त होणाऱ्या लज्जेचा त्याग करून व ह्याचा आपला परिचय नाहीं ह्याजमुळें होणाऱ्या अविश्वस्तपणाचाही परित्याग करून व ह्याचा स्वभाव ठाऊक नसल्यामुळें प्राप्त होणारी शंका सोडून जशी माझ्याविषयीं वर्ततेस तशीच ह्याजविषयीं वर्तन कर. हा तुझा मित्र व बंधुजन व परिजन आहे. असें आपणाविषयीं महाश्वेतेनें कादंबरीस निवेदन केलें जाणून चंद्रापीडानें तिला प्रणाम केला. मग ज्यानें आपणास प्रणाम केला त्याकडे सलज्ज तिर्यक्दृष्टीनें पाहून व किंचित् हास्य करून अंतःकरणास आनंद देणाऱ्या त्या जनास कादंबरीनेंही विनयपूर्वक प्रणाम केला. त्यासमयीं जवळ बसणाऱ्या सर्व कन्यकांनीं कौतुकानें चंद्रापीडाकडे पाहिलें.

कादंबरी तर चंद्रापीडास प्रणाम करून महाश्वेतेसहवर्तमान आपल्या असनावर बसली. इतक्यांत परिजनानें अतित्वरेनें आणलेल्या दुसऱ्या उत्तमासनावर चंद्रापीड बसला. तेसमयीं कादंबरीचा चित्ताभि-

गाय जाणणाऱ्या द्वारपालिकांनीं वीणा, वेणु, मृदंग, ह्यांचे ध्वनि, व गायनाचे ध्वनि, व स्तुतिपाठ करणाऱ्या स्त्रियांचे जयशब्द, हे सर्व प्रदेशाचे ठायीं बंद केले.

तदनंतर कादंबरी उठून परिजनानें आणलेल्या उदकानें स्वतः महाश्वेतेच्या चरणांचें प्रक्षालन करून आपल्या उत्तरीयवस्त्रानें ते पुसून पुनः आसनावर बसली. आणि कादंबरीची जिवलग सखी जी मदनलेखा तिनें चंद्रापीडाची इच्छा नसतांही बळेंच त्याच्या पादांचें प्रक्षालन केलें.

महाश्वेता प्रेमानें कादंबरीच्या खांद्यावर हात ठेवून, व भारानें खालीं लोंबणारें तिचें कर्णभूषण वर उचलून, व चामरांच्या वाऱ्यानें उडविलेले तिचे केंस नीट सारून, कादंबरीला कुशलप्रश्न करिती झाली. कादंबरीही सखीच्या प्रेमास्तव, सखी संकटांत असतां मी घरीं राहिलें ह्यामुळें आपणास अपराधयुक्त मानीत होत्साती, व सखीनें कुशलप्रश्न केल्यामुळें लज्जित होत्साती, मोठ्या संकटानें आपलें कुशल सांगती झाली; आणि महाश्वेतेचें दुःख मनांत आणून अंतःकरणांत शोकाविष्ट होऊन महाश्वेतेच्या मुखाकडे पाहूं लागली, व मध्यें मध्यें चंद्रापीडाकडे पाहून त्याच्या रूपास मोहित झाली. अशाखालीं दोन घटका गेल्यावर कादंबरी महाश्वेतेला तांबूल देऊं लागली. तेव्हां महाश्वेता तिला म्हणाली, हे सखी कादंबरी, आपण सर्वांनीं नवा आलेला पाहुणा जो हा चंद्रापीड ह्याचेंच आराधन करावें. तर अगोदर ह्याला तांबूल दे. असें महाश्वेतेचें भाषण ऐकून कादंबरी तिजकडे तोंड वळवून हळूच बोलली कीं, ह्याचा माझा परिचय नाहीं म्हणून मला ह्याला तांबूल देण्याविषयीं संकोच वाटतो. ह्यासाठीं, हे प्रियसखी, तूंच हा तांबूल आपल्या हातांत घे आणि त्याला दे. असें कादंबरी बोलली तरी त्या महाश्वेतेनें त्या कादंबरीलाच तांबूल देण्याविषयीं वारंवार आग्रह केला. त्याजमुळें त्या कादंबरीनें मोठ्या संकटानें अवकाशेंकरून चंद्रापीडास तांबूल देण्याविषयीं ग्राम्य स्त्रीप्रमाणें भीत भीत महाश्वेतेच्या मुखाकडे पहात आपला हात पुढें केला. तें पाहून चंद्रापीडानेंही आपला हात पुढें पसरिला. तेव्हां तिनें तांबूल त्याच्या हातावर ठेवला. असें वाटतें कीं, तो तिनें तांबूल नाहीं दिला, तर ह्या दासजनाचा स्वीकार करावा हें सु-

चविण्यासाठीं आपल्या प्राणप्रियास आपल्या जीवित्वाचेंच अर्पण केलें. तांबूल देतांना जो हस्तस्पर्श झाला तेणेंकरून अत्यंत हर्षयुक्त होऊन कादंबरीनें आपणास कृतार्थ मानिलें. मग दुसरा तांबूल घेऊन तिनें महाश्वेतेस दिला.

अशा समयांत जिची गति त्वरित, आणि जिच्या मागून एक शुक गमन करीत आहे, अशी एक मनोहर सारिका येऊन क्रोधानें बोलली, कीं, अगे भर्तृदारिके कादंबरी, सौंदर्याचा खोटा अभिमान बाळगणारा हा दांडगा शुक माझ्या पाठीस लागला आहे ह्या अधमाचें निवारण कां करीत नाहींस? हा माझा पराभव करीत असतां तूं उपेक्षा करून माझें रक्षण न करशील तर मी निश्चयेंकरून प्राणत्याग करीन, हें मी तुला खरेंच सांगतें. असें न करीन तर तुझ्या पायांचीच शपथ. असें सारिकेचें भाषण ऐकून कादंबरीनें किंचित् हास्य केलें. त्या कालीं महाश्वेतेला तो वृत्तांत कांहींच माहीत नव्हता म्हणून तिनें मदलेखा नामक दासीस विचारिलें कीं, अगे मदलेखे, ही सारिका कायगे बोलत आहे? मदलेखेनें सांगितलें ह्या सारिकेचें नांव कालिंदी ही कादंबरीची दासी आहे. तिनें ह्या परिहास नामक शुकाशीं हिचा विवाह करून देऊन त्याची ही बायको केली आहे. आज पहांटेस हा परिहास शुक कादंबरीची तांबूलदासी जी तमालिका तिशीं एकांतीं बोलतांना हिनें पाहिलें. तेव्हांपासून ही सारिका ईर्ष्या आणि कोप झाल्यामुळें पराङ्मुख होऊन ह्या शुकापुढें जात नाहीं, त्याचा स्पर्श करीत नाहीं, त्याशीं बोलत नाहीं, त्याकडे पाहतही नाहीं. आम्हीं सर्वांनीं तिला बहुत प्रकारें समजावून सांगितलें तरी ती समजत नाहीं असें त्या मदलेखेचें भाषण ऐकून चंद्रापीडास फारच आश्चर्य वाटलें. तो चंद्रापीड हळूच असें बोलला, कीं, हो अशी कथा आहे खरी, आणि राजगृहामध्यें हेंच कर्णपरंपरेनें ऐकूं येत आहे; परिजनही असेंच बोलत आहे; लोकही असेंच बाहेर बोलत आहेत; पृथ्वीवर चोहोंकडे ह्याच गोष्टी चालल्या आहेत; आणि आम्हीं ही असेंच ऐकिलें आहे कीं, देवी कादंबरीची तांबूलदासी जी तमालिका तिची कामना धरणारा परिहासशुक कामवश होऊन गेलेल्या दिवसासही जाणत नाहीं. तर असला हा विरुद्ध आचरण करणारा आणि आपलें कलत्र सोडणारा शुक ह्या दासीबरोबर रममाण होणार तर होवो. परंतु

देवी कादंबरीला हें कसें आवडलें. ती ह्या दासीचें अशा चापल्यापासून निवारण कां करीत नाहीं. अथवा देवी कादंबरीनें प्रथमच निःस्नेहता दर्शविलीच आहे. कांकीं ही बिचारी कालिंदी तिनें अशा दांडग्या शुकाची अंकित केली. तर आतां हिनें काय करावें. स्त्रियांस सपत्नीभाव फार दुःसह आहे. तोच क्रोधास व वैराग्यास कारण होतो. ही कालिंदी मोठ्या धैर्याची व प्रौढ विचाराची आहे असें मी समजतों, कांकीं, असें हिला सापत्न्यरूप दौर्भाग्य प्राप्त झालें असतां हिनें विषभक्षण केलें नाहीं, किंवा अग्निप्रवेश केला नाहीं, अथवा अत्यंत विरक्त होऊन निरशनव्रत धरिलें नाहीं असो, स्त्रियांस यासारखें लघुत्वास दुसरें कोणतेंच कारण नाहीं असें असतां कदाचित् शुकानें आर्जव केल्यावरून क्रोध टाकून त्या अपराध करणाऱ्या शुकावर जर कालिंदी विश्वास धरील तर हिला धिक्कार असो. ही नको. हिचें वर्जन करावें. आपल्या अपमानाची जिला लाज नाहीं तिच्याशीं बोलणार कोण व तिजकडे पाहणार कोण ? अथवा तिचें नांव तरी कोण घेईल ? अशा प्रकारचा चंद्रापीडाचा विनोदालाप ऐकून तन्मय झालेल्या सर्व स्त्रिया कादंबरीसहवर्तमान मोठ्यानें हांसल्या. इतक्यांत तो शुक बोलूं लागला, हे धूर्ता राजपुत्रा, ही निपुण आहे, पक्की आहे. जरी ही चपल आहे तरी तुजकडून किंवा दुसऱ्या पुरुषाकडून फसली जाणार नाहीं. आणि ही असल्या प्रकारच्या वक्रोक्ती व परिहासोक्ती जाणते हिची मति राजगृहाच्या संबंधाविषयीं चतुर आहे. पुरे करा, उगे बसा; असलीं भुंजंगभंगीचीं+ भाषणें करण्याचें हें स्थल नव्हे. ही मंजुल भाषण करणारी असून कोप व प्रसाद ह्यांचा काल, कारण, प्रमाण, विषय, आणि प्रसंग सर्व जाणत आहे.

इतकें तो शुक भाषण करीत आहे इतक्यांत एक चोबदार येऊन महाश्वेतेला प्रणाम करून बोलला कीं, हे आयुष्मती, देव चित्ररथ आणि देवी मदिरा तुला पहावयास बोलावीत आहेत. असें चोबदाराचें भाषण ऐकून महाश्वेता जावयास सिद्ध झाली. ते समयीं तिनें कादंबरीस विचारलें कीं, हे सखी कादंबरी, आतां ह्या चंद्रापीडानें कोठें असावें ? असें महाश्वेतेचें भाषण ऐकून कादंबरीनें प्रथम आपल्या मनांत

---

+ सर्पगतीसारखीं वक्र. पक्षीं जाररीतीचीं.

असा उपहास केला कीं, ह्या चंद्रापीडास हजारों स्त्रियांच्या हृदयामध्यें राहण्यास जागा पुरत नाहीं काय ? मग ती उघडपणें बोलली कीं, हे सखी महाश्वेते, तूं असें काय बोलतेस ? ह्याचें दर्शन झालें त्या वेळेपासून ह्या माझ्या शरीराचाही तोच धनी आहे, मग ह्या मंदिराचा आहे हें काय सांगावें ? किंवा माझ्या वैभवाचा व माझ्या परिजनाचा प्रभू आहे हें काय सांगितलें पाहिजे ? तर ह्याला जेथ राहणें रुचत असेल, अथवा तुझ्या अंतःकरणास जेथें रुचत असेल, त्याठिकाणीं ह्यानें रहावें. जेथें राहील तेथें सर्व साहित्याची सिद्धता आहे. असें कादंबरीचें भाषण ऐकून महाश्वेता बोलली कीं, हें जें तुझ्या प्रासादाजवळचें प्रमदवन त्यांतील क्रीडापर्वतावरच्या मणिमय गृहामध्यें ह्या चंद्रापीडानें असावें असें बोलून ती महाश्वेता गंधर्वराजाच्या भेटीकरितां निघोन गेली. चंद्रापीडही तिजबरोबरच बाहेर पडून केयूरकानें दाखविलेल्या मार्गानें त्या क्रीडापर्वतावरच्या मणिमय मंदिरांत जाऊन राहिला. इकडे कादंबरी सर्व सखीजनास व परिजनास जावयास सांगून परिमित परिचारिका बरोबर घेऊन आपल्या प्रासादाच्या शिखरावर चढली.

प्रासादशिखरावर गेल्यानंतर कादंबरी वारंवार त्या क्रीडापर्वताकडे पाहून आपल्या शय्येवर जाऊन पडली. जवळच्या परिचारिका तिला कांहीं कर्मणुकी करितां गोष्टी सांगत असतां अंमळ डोळा लागलासा होऊन पुन्हा दचकून जागी झाली, आणि फारवेळ मनांत विचार करून लज्जित होऊन आपणाला निंदून घेऊं लागली कीं, सर्व शंकांची गणना न करणारी, व आपल्या अंतःकरणाची चंचलता लोकांस दाखविणारी अशी, आणि मोहामुळें अंध व जिची आशा नष्ट अशी, मी आज झालें. तर हें मीं काय केलें ! जो पूर्वीं कधीं पाहिला नाहीं व ऐकिला नाहीं व परिचित नाहीं अशा पुरुषाकडे चित्ताची प्रवृत्ति करण्यास मनांत कांहींच शंका धरिली नाहीं. जवळच्या स्त्रिया मला लघुहृदया म्हणतील हें मी मनांत आणिलें नाहीं. व ह्या पुरुषाची चित्तवृत्ति मजविषयीं कशी आहे ह्याची परीक्षाही म्यां मूढेनें पाहिली नाहीं. तसेंच गुरुजनाचें भय, लोकापवादाचें भय, आणि सखीजन व परिजन मनांत काय म्हणेल याचें भय कांहींच धरिलें नाहीं. महाश्वेता दुःखित आहे हें देखील म्यां मंदमतीनें मनांत आणिलें नाहीं, आणि एकाएकीं त्या पुरु-

षाकडे मन समर्पित केलें. हा माझा वेडेपणा स्थूल बुद्धि जे आहेत ते देखील जाणतील मग जिनें मदनवृत्तांत अनुभविला आहे अशी महाश्वेता जाणेल, व चतुर सख्या जाणतील, हें काय सांगावें ! अल्प पुण्यामुळें सर्व प्रकारें मी नष्ट झालें. आज मला मरण येईल तर फार बरें होईल. लज्जा देणारें जीवित वारंवार दुःख देणारें आहे. हा वृत्तांत ऐकून मला आई काय म्हणेल, बाप काय बोलेल, आणि गंधर्व लोक तरी काय म्हणतील ? आतां मी काय करूं ? आतां कोणता उपाय करू कीं ज्यानें माझें दुष्ट चेष्टित झांकेल ? माझ्या इंद्रियांचें अनिवार चांचल्य कोणास सांगूं ? मदनानें तर बाण प्रहारांनीं माझें हृदय जर्जर केलें आहे. आतां मी कोणास शरण जाऊं ? महाश्वेतेच्या वृत्तांतामुळें मीतर तशी प्रतिज्ञा केली, आणि प्रियसखींच्या समक्ष तसें वदलें, आणि केयूरका बरोबरही तसाच निरोप पाठविला. परंतु हें मला समजत नाहीं कीं, मज मंदभाग्ये पुढें हा वंचक चंद्रापीड आणिला कोणीं ? धूर्त दैवानें, किंवा गर्विष्ठ मदनानें, किंवा पूर्वीच्या पापसंचयानें, किंवा दुष्ट मृत्यूनें, किंवा आणखी कोणीं, हें समजत नाहीं. अथवा अपरिचित पुरुष माझी बिटंबना करावयासाठींच येथें आला काय, कीं ज्याचें दर्शन होण्याबरोबर इंद्रियांनीं मला बांधून त्याच्या स्वाधीन केलें ? मीही त्यास वशंगत झालें. पण तो चपल धूर्त मला नको. त्याची मला काय गरज आहे ! त्याचें काय प्रयोजन ? असा कादंबरीनें क्षणभर संकल्प केला.

कादंबरीचा हा संकल्प तिच्या मनांत राहणारा जो चंद्रापीड त्यास विदित होऊन तो त्रासून चालला त्यास अडविण्यासाठींच काय, किंवा चंद्रापीडाच्या परित्यागाचा संकल्प होण्याबरोबर जीवित बाहेर जाण्यास प्रस्थित होऊन कंठद्वारापर्यंत येऊन, जाऊं आतां ? असें त्यानें विचारल्यामुळेंच काय, किंवा तुझ्या प्राणासहवर्तमान तुझ्या धैर्याचें हरण करतो अशी मदनानें तिची निर्भर्त्सना केल्यामुळेंच काय, कादंबरीचें अंतःकरण पुन्हा चंद्रापीडाच्या अभिमुख झालें. आणि चंद्रापीडाविषयींच्या प्रेमानें तिला आपल्या स्वाधीन करून घेतलें ह्यामुळें परतंत्राप्रमाणें उठून जाळीवाटे त्या क्रीडापर्वताकडे पाहत उभी राहिली, आणि

पुन्हा तो येईल काय ? माझ्या दृष्टीस पडेल काय ? असें चिंतन करिती झाली

तिकडे चंद्रापीडही कादंबरीचें दुसरें हृदयच काय अशा त्या रमणीय मणिमय गृहांत प्रवेश करून शिलातलावर पसरलेला, व ज्याच्या बाजूंस लोड, तिवाशे, उशा, गिरद्या, ठेविल्या आहेत, अशा मृदु गालीचावर स्वछंदपणानें आडवा पडला. आणि त्याचें पादसंवाहन केयूरक करीत असतां, व कुशल कन्या भोंवतालीं वाद्यवादन गान करीत बसल्या असतां, चंचल अंतःकरणानें असें चिंतन करूं लागला.

गंधर्व राजाची कन्या जी कादंबरी तिचे साहजिक विलास सकल लोकांचें अंतःकरण हरणारे आहेत काय ? किंवा मदनानें प्रेरित होत्साती ती वांकड्या दृष्टीनें मजकडे पाहते, आणि मी तिजकडे पाहिलें असतां किंचित् हास्य करून लज्जेनें मुख वळविते, असे हे भाव माझ्या अंतःकरणाची परीक्षा पाहण्याकरितांच करिते काय ? असो, मनुष्यत्वासमुलभ जी लघुता तीच खोट्या हजारों कल्पनांनीं मला आयास देऊन फसवीत आहे, कारणकीं तारुण्य आणि मदन हे विवेकाचा लोप करणारे आहेत. आतां ह्या मनाला व्यर्थ आयास कां द्यावे ? जर ह्या कादंबरीची खरीच मजविषयीं चित्तवृत्ति अशी असेल तर कामदेवच ती उघड करील, आणि तोच संशयाचा छेद करील. असा निश्चय करून चंद्रापीड उठून बसला, आणि त्या कन्यकांसहवर्तमान अक्षक्रीडेनें, वाद्यवादनानें, गायनानें, सुभाषितानें, आणि दुसऱ्या अशा कितीएक कलाविलासांनीं, कालक्रमण करिता झाला. अशी कांहीं वेळपर्यंत करमणूक करून चंद्रापीड तेथून निघून उपवनाचें अवलोकन करीत इकडे तिकडे फिरून क्रीडा पर्वताच्या शिखरावर आरूढ झाला.

कादंबरी तर त्या चंद्रापीडास पाहून महाश्वेता येण्याचा मार्ग पाहण्याच्या मिषानें जाळीचें गवाक्ष सोडून कामविव्हल होत्साती सौधाच्या वरच्या शिखरावर चढली. ती वर चढली त्यावेळेस दासीनें जिच्या मस्तकावर सोन्याच्या दांडीचें चंद्रमंडळासारखें शुभ्र छत्र धरिलें आहे, व जिच्यावर शुभ्र चवऱ्या उडत आहेत, व जी कैलासशिखरावर आरूढ झालेल्या पार्वतीप्रमाणें भासत आहे, व जी सखीच्या आड उभी राहून बारीक दृष्टीनें त्या क्रीडापर्वताकडे वारंवार पाहत आहे, अशी ती चंद्रा-

पीडानें तेथून पाहिली. कादंबरीही चंद्रापीडाकडे पाहत त्याशिखरावर फार वेळ उभी होती, तरी त्या कादंबरीनें फार वेळ गेला हें जाणलें नाहीं.

इतक्यांत द्वारपालिकेनें वर जाऊन कादंबरीस कळविलें कीं महाश्वेता परत आली. तेव्हां कादंबरी सौधशिखरावरून उतरून खालीं आली, आणि स्नानादि कृत्यांविषयीं जरी तिला इच्छा नव्हती, तरी महाश्वेतेच्या अनुरोधानेंच तिनें दिवसास करावयाचीं सर्व कृत्यें केलीं. इकडे चंद्रापीडही क्रीडापर्वताच्या शिखरावरून खालीं उतरला, आणि कादंबरीनें पाठविलेल्या सेवकांनीं सर्व सिद्धता करून दिली असतां स्नानसंध्या, देवतार्चन, भोजन, इत्यादि सर्व दिवसाचीं कृत्यें त्या क्रीडापर्वतावरच करिता झाला.

तो चंद्रापीड भोजनादि व्यापार आटोपल्यावर स्वच्छंदपणें मरकत मण्यांच्या शिलातलावर बसला असतां त्यानें अकस्मात् आकाशांत पांढरा शुभ्र तेजाचा पुंज पाहिला. तेणेंकरून आश्चर्ययुक्त होऊन तो मनांत म्हणतो, काय हा अकालींच भगवान् ओषधीनाथ चंद्रमा उदयास येत आहे काय! असें म्हणून प्रकाशाच्या अनुरोधानें त्याच दिशेकडे कौतुकानें पाहता झाला. तों इतक्यांत जिच्या भोंवतीं पुष्कळ कन्यका चालत आहेत, व जिच्या मस्तकावर पांढरें छत्र धरलेलें आहे, व जिच्यावर दोन चवऱ्या उडत आहेत, व जिला कादंबरीच्या द्वारपालिकेनें वेताची छडी आणि अनुलेपनद्रव्यानें भरलेला नारळाचा डहू डाव्या हातीं घेऊन उजव्या हातानें अवलंब दिला आहे, व सर्पाच्या कांतीं सारखीं पातळ, हलकीं, धौत, स्वच्छ, आणि मृदु, अशीं दोन वस्त्रें हातीं घेऊन चालणाऱ्या केयूरकानें पुढें होऊन जिला मार्ग दाखविला आहे, व मालती पुष्पांचा हार तुरा घेउन तमालिका जिच्या मागून चालत आहे, अशी येणारी कादंबरीची प्रियसखी मदलेखा, आणि तिच्या बरोबर चालणारी महाश्वेतेची सखी तरलिका, अशा दोघी चंद्रापीडाच्या दृष्टीस पडल्या. त्या दोघींपैकीं तरलिकेच्या हातीं एका तबकांत घातलेला, व पांढऱ्या अभ्रयानें झांकलेला, व प्रकाशाची वृष्टिच करीत आहे काय असें वाटाया जोगा, एक स्थूल मुक्तांचा हार पाहिला.

तेव्हां चंद्रापीडानें असा मनांत तर्क केला कीं, चंद्राच्या चांदण्याचा-

ही पराभव करणारा असा जो मीं शुभ्र प्रकाश पाहिला त्याला कारण हा हारच असावा. असा निश्चय करून आपणाकडे येणारी जी मदलेखा तिला दुरून पाहतांच प्रत्युत्थानादिक योग्य जो उपचारक्रम तेणेंकरून तिचा त्यानें सन्मान केला. ती मदलेखा तर त्याच मरकत शिलातलावर अम्मळ बसून, मग आपण स्वतां उठून त्या डहूंतल्या अंगरागानें चंद्रापीडाचें अंग अनुलिप्त करून, आणि तीं दोन वस्त्रें त्याजकडून घेववून, व पुष्पांची माळा त्याच्या गळ्यांत घालून, व तुरा मस्तकीं खोंवून, तो मोत्यांचा हार हातीं घेऊन, चंद्रापीडास म्हणाली कीं, हे राजपुत्रा, ही तुझी सुंदर आणि मनोहर आकृति पाहून तुजवर कोणाची प्रीति जडणार नाहीं ? तुझें सौजन्यच आम्हासारख्यांस जवळ येण्यास अवकाश देतें. कारणावांचून स्नेह करणारा तूं कोणास बंधुत्व देत नाहींस ? हा तुझा स्वभाव मधुर व्यवहार कोणाशीं सख्य करीत नाहीं ? तुझी मूर्तिच प्रथमदर्शन होतांच विश्वास उत्पन्न करिते. सकळ भुवनामध्यें ज्याचा महिमा प्रख्यात अशा तुजसारख्या पुरुषाविषयीं जें जें कांहीं योजावें, तें तें अनुचिताप्रमाणेंच भासतें. माझी सखी कादंबरी म्हणते, आपण होऊन ज्यानें माझें अंतःकरण हरिलें, व जो माझ्या जीविताचा धनी झाला, त्याला म्यां काय द्यावें ? प्रथम आगमनाचा महोपकार ज्यानें केला त्याला कोणता प्रत्युपकार करावा ? व ज्यानें दर्शनमात्रें करूनच जीवितास साफल्य दिलें त्याचें आगमन कशानें सफल करावें ? तर कादंबरी ह्या हार देण्याच्या मिषानें आपली निर्मल प्रीति तुला अर्पित आहे, आपलें वैभव दाखविते असें नाहीं. वैभवाची कथा असो, आपणासारख्याच्या दास्याचा अंगीकार करणारीसही अकार्य करणारी आहे असें कोणी म्हणणार नाहीं. आणखी आमची अशी खातरी आहे कीं, तुला आत्मा अर्पून माझी सखी फसली अशी होणार नाहीं, व जीविताचें अर्पण करून पश्चात्ताप पावणार नाहीं. साधु पुरुषाचें चित्त असें असतें कीं, जो कोणी भेटेल त्याच्याशीं अनुकूल असून प्रीतिकरणाऱ्याच्या म्हणण्याचें प्रत्याख्यान करण्याविषयीं पराङ्मुख असतें इतकेंच कीं, आपणासारख्याचें येथें येणें दुर्लभ तें झालें असून आपला योग्य सत्कार झाला नाहीं, तेणेंकरून कादंबरी आपणाला कृतापराधाप्रमाणें मानीत आहे. तर समुद्र मंथन करून जीं रत्नें काढिलीं त्यां-

पैकींच शेष राहिलेला म्हणून ज्यास शेषनाम प्राप्त झालें आहे असा हा हार रत्नांत रत्नभूत म्हणून समुद्रानें वरुणास दिला, वरुणानें चित्ररथगंधर्व राजास दिला, त्यानें आपली प्रियकन्या कादंबरी हीस दिला, तिनेंही चंद्रास जसें गगनांगण योग्यस्थान तसें ह्या अलंकारास तुझें हृदयच योग्यस्थान असें मनांत आणून हा हार तुजकडे पाठविला आहे, ह्याचा स्वीकार करावा. जे सद्गुणरूप अलंकारांनीं भूषित तुम्हांसारखे पुरुष, ते क्लेशकारक जे जड अलंकार त्यांचा स्वीकार करीत नाहींत असें जरी आहे तरी, कादंबरीच्या प्रीतीकरितां ह्या हाराचें धारण आपण केलें पाहिजे. पहा, षड्गुणैश्वर्य संपन्न जो भगवान् श्रीनारायण त्यानें लक्ष्मीबरोबर समुद्रापासून उत्पन्न झालेल्या कौस्तुभनामक शिलाशकलाचें त्याच्या सन्मानार्थ आपल्या उरस्थलीं धारण केलें नाहीं काय? तर आपण नारायणापेक्षां कमी आहां असें नाहीं, आणि हा हार कौस्तुभ रत्नापेक्षां गुणांनीं उणा आहे असेंही नाहीं, आणि माझी सखी कादंबरीही लक्ष्मीपेक्षां सौंदर्यादि गुणांनीं कमी आहे असें नाहीं. ह्याजकरितां ही कादंबरी बहुमानास योग्य व प्रीतीस पात्र आहे, असे मनांत आणून ह्या हाराचा स्वीकार करावा. कदाचित् तुम्हीं तिच्या प्रीतीचा भंग केला तर माझी निंदा करून निश्चयें ती प्राणत्याग करील, असें मनांत आणूनच महाश्वेतेनें तरलिकेच्या हातीं हार देऊन तिला तुजकडे पाठविलें आहे, आणि महाश्वेतेचा निरोप कुमारास असाच आहे कीं, हे भाग्यवंता, तूं ह्या कादंबरीच्या प्रथम प्रीतिदानाचा अव्हेर करूं नये. असें बोलून त्या मदलेखेनें जसा मेरुपर्वताच्या तटावर तारागण तसा चंद्रापीडाच्या वक्षस्थलावर तो मोत्यांचा हार बांधिला.

चंद्रापीड तर त्याकालीं आश्चर्ययुक्त होऊन मदलेखेस बोलला, अगे मदलेखे, काय सांगावें, तूं मोठी चतुर आहेस. अन्याकडून वस्तु घेववावें कसें हें तूं चांगलें जाणत आहेस. उत्तराच्या अवकाशास राहूं नदेणारें असें भाषण करण्याविषयीं तुझें मोठें कौशल्य आहे. अगे वेडे, तुला कळलें? आतां मी ह्या देहाचा स्वामी नाहीं, व ग्रहण करणें न करणें ह्याविषयींही बोलावयास समर्थ नाहीं. तुमच्या सौजन्यानेंच हा जन आपलासा करून टाकिला आहे. तर आतां ह्याला इष्ट किंवा अनिष्ट कोणत्याही व्यापाराविषयीं पाहिजे तसें योजावें. कादंबरीच्या

गुणांनीं कोणास दास केलें नाहीं ? असें बोलून कादंबरीच्या संबंधाच्याच गोष्टी बोलत फार वेळपर्यंत बसून मदलेखेस घरीं जावयास चंद्रापीडानें आज्ञा दिली.

तदनंतर ती मदलेखा फारशी दूर गेली नाहीं तो उदयाचलावर प्राप्त झालेल्या चंद्राप्रमाणें त्या क्रीडापर्वतावर आलेला, व चंदनानुलेपन, दुकूलें आणि हार, ह्यांच्या योगानें शुभ्रवर्ण झालेला, जो चंद्रापीड त्यास पहावें म्हणून ती कादंबरी एकट्या तमालिकेस बरोबर घेऊन पुन्हा आपल्या सौधशिखरावर गेली; आणि अनेक प्रकारच्या विलासदृष्टीनें चंद्रापीडाकडे पहात सूर्य अस्तास जाईपर्यंत तशीच उभी राहिली. मग दिसेनासें झाल्यावर ती तेथून खालीं उतरली. तिकडे चंद्रापीडही क्रीडापर्वतावरून खालीं आला.

तदनंतर लौकरच सकल जनांच्या नेत्रांस आल्हाद देणारा व सर्व दिशांचीं मुखें प्रकाशित करणारा, असा चंद्रमा उदयास आला असतां, आणि कादंबरीच्या परिजनानें सिद्ध करून दिलेल्या शुभ्रवर्ण मुक्तामय शयनावर निद्राकरण्यासाठीं चंद्रापीड आडवा पडला असतां, केयूरकानें येऊन कळविलें कीं महाश्वेतेनें पाठविल्यावरून देवी कादंबरी आपल्या दर्शनास आली आहे.

असें ऐकतांच चंद्रापीड मोठ्या त्वरेनें उठून जवळ आलेल्या कादंबरीस पाहता झाला. ती अशी होती कीं, जिच्या आसमंतात् सखीजन आहे, छत्र चामरें जिनें एकीकडे केलीं ( निषेधिलीं ) आहेत, जिनें सामान्य स्त्रीप्रमाणें गळ्यांत एकेरी मोत्यांचा सर मात्र बांधिला आहे, आंगास शुभ्रचंदन रसाचा अनुलेप केला आहे, जिनें एका कानावर फणी व एका कानावर कमलपुष्प ठेविलें आहे, आणि कल्पवृक्षाचीं शुभ्र दुकूलवस्त्रें ह्यांचें परिधान जिनें केलें आहे, आणि मदलेखेनें जिला हस्तावलंब दिला आहे, आणि अशा साध्या व सुंदर वेषानें साक्षात् चंद्रोदय देवताच काय अशी शोभत आहे, अशी पाहिली.

तदनंतर ती कादंबरी प्रीतिमुळें प्रणाम करून आपला नम्रपणा दाखवीत होत्साती परिजनास बसावयास योग्य अशा भूतलावर बसली. चंद्रापीडास आसनावर बसण्याविषयीं मदलेखेनें वारंवार प्रार्थना केली असतां तोही भूतलावरच बसला. मग कादंबरीबरोबर आलेल्या सर्व

स्त्रिया खालीं बसल्या असतां चंद्रापीड मुहूर्तमात्र उगाच बसून कादंबरीस म्हणाला, हे देवी, दृष्टिपात मात्रानें आनंद पावणारा जो हा दासजन त्याला केवळ भाषणाचाही अनुग्रह प्राप्त होणें कठीण मग दर्शन देण्यास येथवर येण्याचा येवढा अनुग्रह कोठून प्राप्त होणार. मी विचार करून पाहतों परंतु माझ्या आंगीं तसा गुणाचा लेशही नाहीं कीं ज्याच्या योगानें येवढा अनुग्रह लाभ प्राप्त व्हावा. ह्याला कारण देवीचें सरळ आणि निरभिमान जें सौजन्य तेंच होय. ज्याच्या योगानें नव्या सेवकजनावरही आपला अनुरोध राहतो. तोच सेवकजन धन्य कीं ज्याला स्वामीच्या आज्ञेचा विभाग मिळाला. आणि अशा दासजनाचा आदर तो कोणता करावयाचा ? तर परोपकार साधनभूत असें शरीर आणि तृणासारखें लघु असें जीवित हीं दोन्ही आपणापुढें उपायनरूपानें ठेविलीं आहेत, ह्यांचा स्वीकार करून मोठेपणास पाववावें. असें चंद्रापीडाचें भाषण झाल्यावर त्याच्या वचनाचा आक्षेप करून किंचित् हास्य करून मदलेखा बोलली कीं, हे राजकुमारा, अशा उपरोधिक भाषणानें कादंबरी खेद व लज्जा पावते, तर असें कशासाठीं बोलावें ? बोलल्यावांचून हिनें सर्व मनांत घेतलें आहे. आतां पुनःपुन्हा बोलून हिला संदेहांत घालूं नका. असें बोलल्यावर कांहीं वेळानें प्रसंग आणून राजा तारापीड कसा आहे, राणी विलासवती कशी आहे, शुकनास प्रधान कसा आहे, उज्जयनी नगरी कशी आहे, व ती कितीदूर आहे, व भारत वर्षाची स्थिति कशी आहे, व मर्त्यलोक रमणीय आहे काय, अशा प्रकारचे पुष्कळ प्रश्न मदलेखेनें चंद्रापीडास केले, व त्यांचीं उत्तरेंही त्यानें दिलीं. अशा गोष्टींनीं करमणूक करीत कादंबरी कांहीं वेळ तेथें बसून उठली, आणि चंद्रापीडास व त्याच्या परिजनास विचारून निघाली, ती आपल्या सौधशिखरावर शयनाच्या स्थानीं जाऊन शुभ्र चांदण्याखालीं पसरलेल्या मृदु शुभ्र शय्येवर निजून रात्र घालविती झाली. चंद्रापीडही त्याच शय्येवर पडून केयूरक पादसंवाहन करीत असतां त्या कादंबरीची निरभिमानता, व अभिरूपता, व अतिगंभीरता, आणि त्या महाश्वेतेची निष्कारण वत्सलता, आणि त्या मदलेखेची सुजनता, व परिजनाची महानुभावता, व त्या गंधर्वलोकींचें

वैभव, व किंपुरुष देशाची रम्यता, ह्या सर्वांचें मनांत चिंतन करीत ती रात्र क्षणाप्रमाणें घालविता झाला.

तदनंतर चंद्र अस्तास गेला असतां व पहांटेचा शीतळ मंद सुगंधि असा वायु वाहत असतां व दीपाचें तेज पांढरें झालें असतां व अरुणोदयाच्या त्रासानें नक्षत्रें लपून राहिलीं असतां, व क्रमेंकरून सूर्याचें बिंब वर आलें असतां, तो चंद्रापीड शयनावरून उठला, आणि मुखप्रक्षालन, संध्यावंदन, करून तांबूल घेऊन केयूरकास म्हणाला, रे केयूरका, पहा बरें, देवी कादंबरी निजून उठली किंवा नाहीं. उठली असली तर कोठें बसली आहे, हें पाहून ये. अशी चंद्रापीडाची आज्ञा ऐकून केयूरकानें तिकडे जाऊन परत येऊन सांगितलें कीं, हे देवा, मंदर प्रासादाच्या अधोभागीं अंगणामध्यें जो लहान बंगला आहे त्याच्या ओट्यावर महाश्वेतेशीं बोलत देवी कादंबरी बसली आहे. असें केयूरकाचें भाषण ऐकून तो चंद्रापीड उठला, आणि त्या गंधर्वराजकुमारीस भेटून जाण्याचा निरोप मागावयासाठीं तिजकडे गेला. तेथें महाश्वेता व कादंबरी ह्या दोघींसही चंद्रापीडानें पाहिलें. तेव्हां तो पुढें होऊन महाश्वेतेस व कादंबरीस प्रणाम करून त्याच ओट्यावर मांडलेल्या आसनावर बसला, आणि कांहीं वेळ महाश्वेतेच्या मुखाकडे पाहून किंचित् हांसला. महाश्वेता तर तितक्यानेंच राजपुत्राचा अभिप्राय जाणून कादंबरीशीं बोलूं लागली, हे सखी कादंबरी, जसा चंद्रकांतमणि चंद्राच्या किरणांच्या संबंधानें द्रवतो, तसा हा चंद्रापीड तुझ्या गुणांच्या योगानें द्रवून तुझ्याशीं बोलावयास समर्थ होत नाहीं, परंतु ह्या राजकुमाराच्या मनांत परत जावें अशी इच्छा उत्पन्न झाली आहे. कारणकीं, ह्याच्या मागून आलेल्या राजमंडळास ह्याचा ठिकाण लागत नसल्यामुळें फार दुःख होत आहे, ह्याजकरितां ह्याला जाण्याविषयीं त्वां निरोप दिला पाहिजे. दूरस्थित जे कमलिनी आणि कमलबांधव किंवा कुमुदिनी आणि कुमुदनाथ ह्यांच्यासारखी तुम्हां दोघांची प्रीति एकमेकांवर चिरकाळ पर्यंत राहो.

तदनंतर कादंबरी बोलली हे सखी महाश्वेते, परिवारासहित हा जन आपल्या अंतरात्म्याप्रमाणें राजकुमाराच्या स्वाधीनच आहे, मग इतका अनुरोध तो कशाला ? त्याचे इच्छेविरुद्ध वागण्यास कोण समर्थ आहे ?

असें महाश्वेतेशीं बोलून गंधर्व कुमारांस बोलावून आणून त्यांस तिनें सांगितलें कीं ह्या राजकुमारास आपल्या स्थानास सुरक्षित पोंहचवावें.

तदनंतर तो चंद्रापीडही उठून प्रथम महाश्वेतेस प्रणाम करून मग कादंबरीस प्रणाम करून कादंबरीच्या प्रेमानें ज्याच्या नेत्रांत अश्रु आले आहेत असा होत्साता बोलला, हे कादंबरी, हे देवी, फार काय बोलावें? फार बोलणाराचें बोलणें लोक श्रद्धापूर्वक ऐकत नाहींत. तर माझें इतकेंच मागणें आहे कीं, परिजनाच्या गोष्टींमध्यें ह्या जनाचें स्मरण करीत जावें. असें बोलून कन्यांतःपुरापासून निघाला. तेव्हां कादंबरीवांचून सर्व कन्याजन चंद्रापीडाच्या गुणानें आकर्षिला होत्साता त्याच्या मागून बाहेरच्या द्वारापर्यंत गेला. मग कन्याजनास परतवून केयूरकानें आणलेल्या अश्वावर बसून चंद्रापीड गंधर्व कुमारांसहवर्तमान त्या हेमकूटपर्वतावरून परत जावयास निघाला. त्याकाळीं चंद्रापीडाचें अंतःकरण कादंबरीमय होऊन गेलें होतें त्यामुळें मागें पुढें बाजूस वर चोहोंकडे त्याला कादंबरीच दिसूं लागली. असातो चंद्रापीड येतयेत महाश्वेतेच्या आश्रमास आला. तों इंद्रायुध अश्वाच्या खुरांच्या मागानें आलेलें आपलें. सैन्य अच्छोद सरोवराच्या तीरावर उतरलें आहे, असें त्यानें पाहिलें.

तदनंतर चंद्रापीड आपणाबरोबर आलेले गंधर्व कुमार परत लावून उभा राहिला. तेव्हां सैन्यांतील सर्व जनानें आनंद आणि आश्चर्य ह्यांनीं युक्त होऊन चंद्रापीडास प्रणाम केला. मग तेथून निघून त्यानें आपल्या पटगृहांत प्रवेश केला, आणि तेथें आलेल्या सर्व राजलोकांची भेट घेऊन त्यांचा सन्मान करून वैशंपायन आणि पत्रलेखा ह्यांजबरोबर महाश्वेता अशी आहे, कादंबरी अशी आहे, मदलेखा अशी आहे, तमालिका अशी आहे, केयूरक असा आहे, गंधर्वलोक असा आहे, अशा प्रकारच्या गोष्टी सांगत प्रायः तो दिवस घालविला. त्याचप्रकारें कादंबरीचें रूप पाहून मोहित झालेल्या चंद्रापीडानें आपला राज्यकारभार सोडून अंतःकरणांत कादंबरीचें चिंतन करीतच रात्रही घालविली.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं चंद्रापीड सभास्थानीं बसला असतां अकस्मात् द्वारपालाबरोबर आंत आलेला केयूरक त्यानें पाहिला. केयूरकानें दुरूनच भूमिस्पर्श करून चंद्रापीडास वंदन केलें. चंद्रापीडानें

तर पुढें धांवून जाऊन ये ये असें बोलून मोठ्या आनंदानें दोहों भुजांनीं त्यास आलिंगिलें, आणि समीपभागीं बसविलें. मग आदरपूर्वक मधुर भाषणानें त्यास असा प्रश्न केला कीं, हे केयूरका, सांग बरें, ती देवी कादंबरी परिजनासहवर्तमान कुशल आहेना ? आणि ती भगवती महाश्वेता कुशल आहेना ? केयूरकानें उत्तर केलें कीं, आपण कुशलप्रश्न केल्यामुळें ती कादंबरी कुशलयुक्त झालीच; असें बोलून कादंबरीनें दिलेला कमलिनी पत्रांचा पुडा पुढें ठेवून उघडून दाखविला. त्यांत हिरव्या रंगाचीं कोंवळी पोफळें, व केवड्यासारखीं पांडुरवर्ण नागवेलीचीं पिकलेलीं पानें, व चंद्रखंडासारखा कर्पूर, आणि कस्तूरीगंधयुक्त चंदनानुलेपन, हीं द्रव्यें होतीं तीं निरनिराळीं ठेवून बोलला कीं कादंबरी अंजली जोडून देवाचें अर्चन करीत आहे, आणि महाश्वेता आलिंगनपूर्वक कुशल प्रश्नानें अर्चन करीत आहे, आणि मदलेखा व तमालिका व इतर कन्याजन देवाचे चरणास वंदन करून अर्चन करीत आहेत. महाश्वेतेचें म्हणणें असें आहे कीं, ज्यांच्या दृष्टीस तूं मुळींच गोचर झाला नाहींस ते धन्य होत. कारण, तूं समक्ष असतां जे तुझे गुण हिमाप्रमाणें शीतल अतएव चंद्राप्रमाणें सुख देणारे होतात, तेच गुण तुझा विरह झाला असतां दुःख देणारे म्हणून सूर्याप्रमाणें ताप देणारे होतात. तूं येथें असतां येथील सर्वजनांस जो अमृतमय दिवस गेला, तसा दिवस पुन्हा प्राप्त व्हावा अशी सर्व इच्छा करीत आहेत. फार काय सांगावें, तुझ्या वियोगानें सर्व गंधर्वनगर महोत्सवहीन व खिन्न झालें आहे. आणखी मी तर सर्व संगपरित्याग केला आहे हें तूं जाणतच आहेस, तथापि कारणावांचून प्रीति करणारा जो तूं त्या तुझें आणखी एकवेळ दर्शन करावें असें माझें अंतःकरण इच्छीत आहे, असें महाश्वेतेचें म्हणणें आहे. आणि तुमच्या वियोगानें कादंबरीचें चित्त स्वस्थ नाहीं, ती सर्वदा तुमचें चिंतन करीत आहे. ह्याजकरितां पुनरागमनरूपगौरवानें सर्वांस कृतार्थ करण्यास आपण योग्य आहां. असा निरोप पाठविणें हेंही अनुचित आहे, परंतु आपली सुजनताच असें धार्ष्ट्य उत्पन्न करिते. आणखी शेषनामक हार आपल्या शय्येवर विसरून राहिला होता तो हा पाठविला आहे. असें बोलून उत्तरीयवस्त्रा-

च्या पदरीं बांधलेला हार काढून घेऊन चंद्रापीडाची चामरग्राहिणी दासी जवळ उभी होती तिच्या हातीं देऊन केयूरक उगाच बसला.

तदनंतर चंद्रापीड बोलला कीं, हें महाश्वेतेच्या कृपेचें फल होय. आमच्या सारख्या परिजनाचें वारंवार स्मरण होणें हें कृपेवांचून नाहीं, आणि कादंबरी देवीही अशा प्रकारचा प्रसाद करीत आहे, हेंही मोठें नवलच आहे. असें बोलून त्या चंद्रापीडानें तें सर्व आपल्या मस्तकीं धरून घेतलें. मग कादंबरीच्या अंतःकरणांतील प्रेमरसच काय असें मानून तें आल्हादकारक अतिसुगंधि विलेपन हातीं घेऊन त्यानें आपलें सर्व शरीर विलिप्त केलें, आणि तो हार आपल्या गळ्यांत घातला. मग मुहूर्त मात्र तेथें बसून सर्वांस तांबूल देववून आपणही घेतला, आणि उठला. तेव्हां सर्व मंडळी उभी राहिली. चंद्रापीडानें केयूरकाच्या खांद्यावर आपला डावा हात ठेवून उभ्यां उभ्यां राजेलोकांस सन्मानपूर्वक जावयास निरोप दिला. मग तो चंद्रापीड केयूरकास बरोबर घेऊन हळू हळू गंधमादननामक हत्ती पहावयास गेला. तेथें क्षणभर उभा राहून आपल्या हातानें त्याला कोमल तृणांचे ग्रास देऊन अत्यंत प्रिय जो इंद्रायुधनामक अश्व त्याच्याजवळ गेला. त्या चंद्रापीडानें मुख वळवून परिजनाकडे पाहतांच राजाचा चित्ताभिप्राय जाणून सर्व परिजन दूर गेले. एक केयूरक मात्र जवळ राहिला. चंद्रापीडानें त्या अश्वाच्या पाठीवरची झूल एक्या बाजूस सरकली होती ती आपल्या हातानें सारखी करून त्याच्या मानेवरील अयाळीचे केस उडवले होते ते नीट केले, आणि दवासनाच्या खुंट्यावर एक पाय ठेवून आडव्या दांड्यावर देहाचा भार देऊन मोठ्या कौतुकानें केयूरकाशीं बोलावयास आरंभ केला. अरे केयूरका,सांग बरें ? मी निघालों तेव्हांपासून त्या गंधर्वराजाच्या मंदिरांत कोणता वृत्तांत झाला, आणि गंधर्वराजाची कन्या जी कादंबरी तिणें कोणत्या व्यापारानें दिवस घालविला, आणि ती महाश्वेता काय करिती झाली, आणि त्या मदलेखेनें काय भाषण केलें, आणि परिजनाचे काय आलाप झाले, आणि त्वांही त्यावेळेस कोणता व्यापार केला ? आमच्या संबंधाच्या कांहीं गोष्टी झाल्या काय ? अशा प्रकारचा चंद्रापीडाचा प्रश्न ऐकून केयूरक सांगूं लागला. हे देवा, ऐकावें, सर्व सांगतों. आपण तेथून निघाल्यावर देवी कादंबरी कन्यांतःपुरापासून नि-

घून परिजनासहवर्तमान सौधशिखरावर आरोहण करून अश्वखुरांनीं उडालेल्या धूळीनें धूसरवर्ण झालेला जो देवाचा गमनमार्ग त्याकडे अवलोकन करीत उभी राहिली. देवाचें दर्शन होईनासें झाल्यावर मदलेखेच्या स्कंधावर मुख ठेवून त्या दिशेकडे पाहत कांहींवेळ उभी राहून तेथून मोठ्या दुःखानें खालीं उतरली; आणि क्षणभर सभामंडपांत बसून चित्तास स्वस्थपणा देण्यांकरितां ज्या क्रीडापर्वतावर देवानें आरोहण केलें होतें त्या क्रीडापर्वतावर गेली; आणि ज्याज्या ठिकाणीं देवानें विलास केले होते त्या त्या ठिकाणीं जाऊन सखीच्या मुखानें ऐकती झाली कीं, ह्या ठिकाणीं मरकत शिलातलावर देवानें आरोहण केलें, ह्या ठिकाणीं देवानें सुवासित जलानें स्नान केलें, ह्या ठिकाणीं बसून देवानें शंकराचें पूजन केलें, ह्या स्फटिक शिलातलावर बसून देवानें भोजन केलें, ह्या ठिकाणीं देवानें शयन केलें. अशा प्रकारें परिजनानें निवेदित केलेलीं देवाच्या विलासाचीं स्थानें पाहतां पाहतां तिणें तो सर्व दिवस तेथें घालविला. दिवसाचें अवसान झाल्यावर महाश्वेतेच्या आग्रहामुळें कसा तरी आहार केला. सूर्यास्त होऊन चंद्रोदय झाल्यावर कांहीं वेळपर्यंत आपल्या दोन्ही गालांवर दोन तळहात ठेवून व नेत्र निमीलित करून तेथेंच चिंतन करीत बसली होती. मग तेथून उठून हळू हळू ती कादंबरी आपल्या शयनगृहास आली. तेथें ती आपल्या शयनावर पडून प्रबल शिरोवेदनेच्या योगानें इकडे तिकडे लोळूं लागली, आणि दाहज्वरानें व विलक्षण मनोव्यथेनें व्याकुळ झाल्यामुळें, मंगल प्रदीप आणि कुमुदाकर हे जसे रात्रभर निमीलित होत नाहींत तसे जिचे नेत्र निमीलित झाले नाहींत, अशी होत्साती मोठ्या दुःखानें ती रात्र घालविती झाली. प्रातःकाळ होतांच मला बोलावून नेऊन देवाची वार्ता आपणास कळावी ह्याकरितां उत्कंठापूर्वक आज्ञा करिती झाली.

असें केयूरकाचें भाषण ऐकून चंद्रापीड तिकडे जावयास इच्छित होत्साता अरे अश्व, अरे अश्व असें बोलून तेथून निघाला, आणि इतक्यांत अश्व सेवकांनीं तयार करून आणलेल्या इंद्रायुधनामक अश्वावर आरोहण करून पत्रलेखेस आपल्या मागें बसवून आपल्या सैन्यावर वैशंपायनास स्थापून कोणी परिजन बरोबर न घेतां चालता झाला. दुसऱ्या एका अश्वावर केयूरकास बसवून त्यासहवर्तमान त्वरेनें हेमकूट

पर्वतास गेला, आणि कादंबरीच्या मंदिराच्या द्वारापुढें घोड्यावरून खालीं उतरला.

तदनंतर चंद्रापीडानें आपला अश्व द्वारपालाच्या स्वाधीन करून मंदिरांत प्रवेश केला. तेव्हां बरोबर आलेली पत्रलेखा कादंबरीच्या प्रथम दर्शनाविषयीं अत्यंत उत्सुक झाली होती म्हणून चंद्रापीडाच्या मागून तिनेंही प्रवेश केला. मग त्या चंद्रापीडानें समोर आलेल्या एका खोज्यास विचारलें कीं देवी कादंबरी कोठें बसली आहे ? तेव्हां त्या सेवकानें प्रणाम करून सांगितलें कीं मत्तमयूरनामक क्रीडापर्वताच्या अधोभागीं कमलवनवापिकेच्या कांठाजवळ हिमगृह केलेलें आहे त्याजमध्यें देवी कादंबरी बसली आहे. असें त्यानें निवेदन केल्यावर त्या स्थलाचा मार्ग केयूरकास विदित होता ह्यामुळें त्यानें दाखविलेल्या मार्गानें चंद्रापीड तिकडे चालता झाला. जातां जातां प्रमदवनांतील फार चमत्कार त्याच्या दृष्टीस पडले. पुढें हिरवें गार कदलीवन लागलें, त्यामध्यें हिमगृह चंद्रापीडानें पाहिलें. इतक्यांत त्या चंद्रापीडानें हिमगृहांतून बाहेर येणारा कादंबरीचा अंतरंग परिजन पाहिला. त्या परिजनानें चंद्रापीडास प्रणाम करून दाखविलेल्या मार्गानें कदलींच्या तोरणांच्या खालून चालतांना चंद्रापीडानें स्थलस्थलीं केलेले चमत्कार पाहिले; व जागजागीं शीतलोपचारांच्या साहित्यांचे व्यापार परिजन करीत आहे असें पाहिलें. असें पाहत पाहत चंद्रापीड हिमगृहाच्या मध्यभागीं पावला. तें हिमगृह असें शीतल होतें कीं, जाणो हिमालयपर्वताचें त्हृदय, किंवा जलाधिपति वरुण ह्याचें क्रीडास्थान, किंवा चंद्रकलांची जन्मभूमि चंद्रकांतमण्यांचें उत्पत्तिस्थान, किंवा शिशिरऋतूंतल्या रात्रींचें निवासस्थान, किंवा वर्षाकालाचें संकेतगृह; आणि ज्या हिमगृहांत कारंज्यांच्या हजारों धारा उडत होत्या त्यामुळें सूर्यकिरणांचा स्पर्शही होत नसे; आणि कदंबपुष्पांचीं रजें घेऊन वाहणाऱ्या शीतळ वायूनें व्याप्त, आणि कदलीवृक्षांच्या समुदायांनीं वेष्टित, आणि पुष्पसुगंधाच्या लोभानें आलेल्या भ्रमरांच्या शब्दांनीं नादयुक्त, आणि नानाप्रकारच्या पुष्पितलतांनीं आच्छादित, अशा प्रकारचें तें हिमगृह पाहून तो चंद्रापीड अत्यंत शीतस्पर्शाच्या योगानें आपणास हिममय असें मानिता झाला.

अशा प्रकारच्या त्या हिमगृहाच्या एका प्रदेशाचे ठायीं सख्यांनीं

वेष्टित होत्साती ती कादंबरी मृणालमंडपिकेच्या अधोभागीं पुष्पशय्येवर निजलेली चंद्रापीडानें पाहिली. ती अशी कीं, जिनें सर्व अंगांवर कमलमृणालांचींच भूषणें घातलीं आहेत, व अंगास चंदनरसाचें विलेपन केलें आहे, व जिच्या नेत्रांपासून अश्रुप्रवाह चालला आहे, व मुखावाटे दीर्घ श्वासोच्छ्वास होत आहे, व जिचें सर्वांग कामसंतापानें संतप्त झालें आहे व घर्मजलानें व्याप्त केलें आहे, व जिच्या शरीरास दुर्बलता आली आहे, ती इतकी कीं, उदरस्थलावरील एकीकडे सरकलेलें वस्त्र पुन्हा तेथें स्थापण्यास जी समर्थ नाहीं, व अतिदाह झाल्यामुळें त्याच्या शांत्यर्थ बाहूंनीं शीतळ केलेल्या पाषाणाच्या पुतळीस आलिंगीत आहे, व कपोलांनीं कर्पूराच्या पुतळीस व चरणांनीं चंदनपंकाच्या पुतळीस वारंवार स्पर्श करीत आहे.

तदनंतर कादंबरीच्या परिजनानें कादंबरीस कळविलें कीं, चंद्रापीड आला आहे. तेव्हां ती कादंबरी प्रत्येक परिजनास विचारूं लागली कीं, तो खरोखरीच आला आहे काय ? त्वां पाहिला काय ? तो कोठें आहे ? तो किती दूर मार्गावर आहे ? इतक्यामध्यें तो चंद्रापीड आपल्या समोर येत आहे असें दुरूनच अवलोकन करून ती कादंबरी पुष्पशय्येवरून उठली, आणि त्हृदयावरील पदर व मस्तकावरील केश गडबडीनें सांवरून आनंदाश्रूंनीं भरलेल्या दृष्टीनें चंद्रापीडाकडे पाहूं लागली. तेव्हां चंद्रापीडानें कादंबरीच्या पुढें होऊन पहिल्याप्रमाणें विनयपूर्वक प्रथम महाश्वेतेस प्रणाम करून मग कादंबरीस प्रणाम केला. तदनंतर त्या कादंबरीनें त्याला प्रतिप्रणाम करून पुनः त्याच पुष्पशयनावर स्थिति केली असतां चंद्रापीडास बसावया करितां द्वारपालिकेनें आणलेलें रत्नजडित वेत्रासन आपल्या चरणानें एकीकडे करून चंद्रापीड भूमीवरच बसला.

तदनंतर केयूरकानें कादंबरीस हात जोडून विनंती केली कीं, देव चंद्रापीड ह्याच्या अत्यंत प्रीतींतली त्याचा तांबूल करंड संभाळणारी पत्रलेखा म्हणून जी दासी ती ही असें बोलून कादंबरीस ती त्यानें भेटविली. कादंबरीही त्या पत्रलेखेस पाहून मोठ्या आश्चर्यानें युक्त होऊन बोलली कीं, कायहो हा ब्रह्मदेवास मानवी स्त्रियांविषयीं पक्षपात ! असें कादंबरी बोलल्यावर त्या पत्रलेखेनें कादंबरीस प्रणाम केला. मग कादंबरीनें मो-

ध्या आदरें करून ये, ये, असें म्हणून त्या पत्रलेखेला आपल्या पाठीशीं बसविलें. तें पाहून सर्व परिजनास मोठें कौतुक वाटलें. पत्रलेखेस पाहण्या बरोबर कादंबरीची प्रीति पत्रलेखेवर बसली. त्यामुळें ती कादंबरी पत्रलेखेच्या अंगास करपल्लवानें वारंवार स्पर्श करिती झाली.

चंद्रापीड तर आगमन संबंधी विनयादि उपचार झाल्या नंतर विरह व्यथेनें व्यथित झालेली जी चित्ररथ गंधर्वाची कन्या ( कादंबरी ) तिजकडे अवलोकन करून चिंतन करिता झाला कीं, माझें अंतःकरण फारच अचतुर आहे, अजूनही निश्चय करीत नाहीं. असो ह्या कादंबरीसच युक्तीप्रयुक्तीनें विचारावें. असें मनांत आणून तो स्पष्टपणें कादंबरीस विचारूं लागला, तें असें. हे देवी, कोणत्या माराच्या निमित्तानें हा तुला अतिशयित संताप झाला आहे ? हे सुतनु, खरेंच सांगतों, हा व्याधि तुला तशी व्यथा देत नसेल, जशी मला देतो. तर मी असें इच्छितों कीं, आपला देह देऊनही तुजसारख्या योग्य स्त्रीला स्वस्थ करावें. तुला पुष्पशय्येवर पडलेली पाहून माझाही देह पतन पावतो. तुझें शरीर फार कृश झालें आहे. तुझे नेत्र अत्यंत आरक्त दिसतात. तुझ्या नेत्रावाटे सतत अश्रुपात होत आहे. ह्यावरून तुला बळकट संताप झाला आहे असें समजून मी फार खेद पावतों.

तदनंतर ती कादंबरी बालत्वामुळें स्वभावानें सरळ व भोळसर होती. तरी तिनें चंद्रापीडाच्या भाषणाचा अभिप्राय सर्व अंतःकरणांत जाणला. परंतु आपल्या मनोरथाची प्राप्ति खचीत होईल असा भरवसा न धरितां लज्जेनें नम्र होऊन कांहीं न बोलतां ती उगीच राहिली, व खालीं दृष्टि करून किंचित् हांसली. कादंबरी कांहीं बोलत नाहीं असें पाहून मदलेखा बोलूं लागली, हे राजकुमारा, काय सांगूं ? हा हिचा संताप मोठा भयंकर आहे. तो सांगतां येत नाहीं. तो तरी कुमारभावानेंच झालेला आहे. अशा हिला संताप देत नाहीं असें काय आहे ? पहा, कमलिनीचा शीतल पल्लव अग्नीसारखा वाटतो, चंद्रिका उन्हाप्रमाणें वाटते, पल्लवांच्या पंख्याचा वारा हिला खेद देतो, हें सर्व आपण पाहत नाहीं

* ताडनाच्या पक्षीं मदनाच्या.

* तुमच्यामुळें किंवा मदनामुळें.

काय ? ह्यासमयीं आपण हिचें धीरत्व व हिच्या प्राणधारणास हेतु आ-हां असें म्हटलें पाहिजे. अशा प्रकारें जें मदलेखा बोलली त्यांतच चं-द्रापीडास कादंबरीचें प्रत्युत्तर झाल्यासारखें झालें. तदनंतर चंद्रापीडही मनोरथ सिद्धीविषयीं संशयित होत्साता त्या महाश्वेते बरोबर प्रीतीच्या मधुर गोष्टी सांगत बहुत वेळपर्यंत बसून पूर्वीप्रमाणें मोठ्या यत्नानें आ-पली सुटका करून घेऊन दोघींला विचारून आपल्या सेनानिवेश स्था-नाकडे जावया करितां कादंबरीच्या भवनापासून निघाला.

तदनंतर चंद्रापीड अश्वावर बसावयास चालला तों पाठीमागून के-यूरक येऊन बोलला कीं, ही मदलेखा अशी विज्ञापना करीत आहे कीं, पत्रलेखेचें प्रथम दर्शन झाल्यापासून तिजवर कादंबरीची अतिप्रीति उत्प-न्न झाली आहे, ह्याकरितां देवी कादंबरीची अशी इच्छा आहे कीं, पत्र-लेखेनें माघारें यावें, पाठी मागून ती येईल. ह्यावर देवाची मर्जी.

ह्याप्रकारें केयूरकाच्या मुखानें मदलेखेची विज्ञापना ऐकून चंद्रापीड बोलला कीं, हे केयूरका, देवी कादंबरीचा इतका प्रेमा पत्रलेखेवर झाला ह्यावरून ती पत्रलेखा धन्य आणि स्पृहणीय आहे. तर हिनें कादंबरी-पाशीं असावें, त्यांत मला संतोष आहे, असें बोलून चंद्रापीड आपल्या सेनानिवेशास गेला. तो तेथें पोहोंचला तोंच आपल्या पित्याकडून आ-लेला जासूद त्यानें पाहिला. तेव्हां तत्क्षणीं घोडा उभा करून प्रफुल्लने-त्रांनीं युक्त होत्साता दुरूनच त्या जासुदास त्यानें प्रश्न केला कीं, अरे बाबा, सर्व परिजनासहवर्तमान माझा पिता आणि सर्व अंतःपुरस्त्रियां स-हवर्तमान माझी माता खुशाल आहे कीं ? असा प्रश्न ऐकून तो जासूद पुढें झाला आणि प्रणाम करून जसें आपलें आज्ञावचन तसेंच आहे, असें बोलून पत्रांचे दोन लाखोटे चंद्रापीडाच्या हातीं देता झाला. चंद्रापी-डानें तीं पत्रें आपल्या मस्तकीं स्थापित करून आपल्या हातानें उलग-डून मोठ्यानें वाचलीं. त्यांत मजकुर असा होता कीं, स्वस्ति श्री, उज्ज-यिनींत राहणारा, व ज्याला सर्व राजे वंदन करितात, व जो महेश्वरा-चा भक्त, असा जो राजाधिराज देव तारापीड, तो सर्व संपत्तीचें गृह असा जो चंद्रापीड, त्याचें रत्नखचित मुकुटानें अलंकृत जें मस्तक त्याचें चुंबन करून आलिंगन देत आहे. विशेष तर, सर्व प्रजा कुशल आहेत. परंतु तुला पाहून बहुत दिवस अतिक्रांत झाले, ह्यामुळें आमचें अंतःकर-

पाहण्याविषयीं फार उत्कंठित झालें आहे, आणि देवीही अंतः
ःसहित तुझ्या अदर्शनानें फार खेद पावत आहे. ह्याजकरितां
वल्यावर क्षणाचा विलंब न करितां निघून यावें. असें पित्याचें
वून शुकनास प्रधानानें पाठविलेलें पत्र वाचिलें. त्यांतही असा-
कुर होता. इतक्या अवसरामध्यें वैशंपायन नामक प्रधानपुत्रही
द्रापीडाकडे येऊन ह्याच मजकुराचीं आपणास आलेलीं पत्रें चंद्रा-
दाखविता झाला.

ःनंतर तो चंद्रापीड पित्याची आज्ञा प्रमाण असें बोलून तसाच
त्रर बसलेला असतां प्रयाणाचा नगारा वाजविण्यास आज्ञा क-
झाला. आणि मेघनादनामा सेनापति ह्यास बोलावून आणून
यानें अशी आज्ञा केली कीं, त्वां पत्रलेखे बरोबर यावें. निश्चयें-
केयूरक तिला येथपर्यंत घेऊन येईलच. तो तिला पोंहचवून प-
ईल ते समयीं त्याजबरोबर माझी विज्ञापना देवी कादंबरीस अशी
पाठवावी कीं, मनुष्य जातीची प्रकृति त्रिभुवनानें निंदावया जोगी
कारण कीं, जी प्रकृति इष्टाचा अनुरोध धरीत नाहीं व परिचय
त नाहीं, व दुसऱ्याच्या हातीं सांपडत नाहीं. आणखी अशी
ो, अकालीं विरुद्ध वर्तन करणारी, व कारणावांचून आपणावर
रणाऱ्याची गणना न करणारी आहे. अशा प्रकृतीचा मीं असून
ोडून इकडे येण्यानें आपला स्नेह कपटानें खोटें इंद्रजाल दाख-
शा प्रकारास नेला; आणि भक्तिही खोट्या वक्रोक्ति करण्याच्या
ास पावविली, आणि बाहेरच्या विनयानें मात्र मधुर असें जें आ-
( म्हणजे मी तुझा आहें असें म्हणणें ) तेंही धूर्तत्वांत पाडलें,
वाणीस व अंतःकरणास भिन्नार्थकत्व आणिलें. ही माझी गोष्ट
परंतु भलत्या ठिकाणीं प्रसाद करणारी व दिव्य पुरुषास योग्य
नी देवी तीही लोकांनीं नांव ठेवावें अशा योग्यतेस म्यां नेली.
केलेला प्रसाद मागून अंतःकरणास खेद देतो हें खरें आहे. अ-
देवीविषयीं माझें अंतःकरण लज्जेच्या भारानें तितकें मंदत्व पाव-
ें, जितकें महाश्वेतेविषयीं मंदत्व पावत आहे. कारण खोटा
करून तिनें माझा गुणातिशय वर्णिला. तर अशी अस्थानीं

पक्षपात करणारी जी महाश्वेता तिची वारंवार निंदा देवी करीत असेल. परंतु मीं काय करावें, पित्याची आज्ञा प्रबळ आहे, ह्या क्षुद्रदेहाच्या हातून तिचें उल्लंघन करवत नाहीं. हेमकूट पर्वतावरच निवास करावा असा आग्रह धरणारें जें माझें अंतःकरण त्यानें तर देवीला जन्मांतरसहस्राचा दास्यपट लिहून दिला आहे. वनेचराधिपति जसा वनेचरांस वनांतून जाऊं देत नाहीं तसा त्या अंतःकरणास देवीचा प्रसाद तेथून जाऊं देत नाहीं. सर्व प्रकारें इतकेंच निवेदित करतों कीं, पित्याच्या आज्ञेनें माझा देह उज्जयिनीस गेला. परंतु ज्या वेळेस असज्जनांच्या कथेचा प्रसंग येईल, त्या वेळेस तरी ह्या चंद्रापीड चंडालाचें स्मरण देवीस व्हावें. परंतु देवीनें असें मानूंनये कीं, हा चंद्रापीड जिवंत असून पुनः देवीच्या चरणारविंददर्शनानंदाचा अनुभव न घेतां राहील. आणखी प्रदक्षिणापूर्वक महाश्वेतेचे दोन्ही पाद म्यां वंदिले असें तिला सांगावें, आणि मदलेखेसही प्रणामपूर्वक दृढ कंठालिंगन केलें असें कळवावें. आणि तमालिका प्रमुख जो कादंबरीचा परिजनसमुदाय त्यासही कुशल प्रश्न केला आहे म्हणून सांगावें. आणि भगवान् हेमकूटपर्वत ह्यासही हात जोडून प्रणाम केले आहेत असें सांगावें. अशी मेघनादास आज्ञा केली.

अशी आज्ञा करून मेघनादास चंद्रापीडानें आणखी असें सांगितलें कीं, जेव्हां तूं परत येऊं लागशील तेव्हां सुहृदादि मंडळीस क्लेश न देतां हळूहळू सावकाश यावें; आणि वैशंपायनास सांगितलें कीं सर्व सैन्याचा व मंडळीचा बंदोबस्त तुम्ही ठेवावा. चंद्रापीड आपण तसाच घोड्यावर बसलेला असून हूं चला आतां असें बोलून आपल्या खासगीच्या अश्वसैन्यासहवर्तमान चालता झाला. त्याच्या अश्वाच्या खोगरास धरून बरोबर चाललेला जो लेखहारक ( जासूद ) त्यास कादंबरी वियोगानें ज्याचें अंतःकरण शून्य झालें आहे असा असतांही उज्जयिनी कडील वार्ता पुसत पुसत गमन करिता झाला.

तदनंतर त्या चंद्रापीडानें क्रमें करून शून्यारण्यांतून दिवसभर गमन करून सूर्याचा अस्त होण्याच्या सुमारास पुढें दूर प्रदेशावर एका जुनाट रक्तचंदनवृक्षावर एक मोठा रक्तवर्ण ध्वज पाहिला. त्या ध्वजाच्याच अभिमुख होऊन जातां जातां पुढें त्यानें एक देवालय पाहिलें. तें देवा-

लय चंडिकेचें होतें. चंडिकेची मूर्ति फार उग्र होती. तिच्या गळ्यांत मुंडांची माळा होती, आणि बलिदानासाठीं पशुवध करण्याचीं स्थानें जवळ दिसत होतीं, आणि देवालयाच्या अंगणांत रक्ताचा कर्दम झाला होता. देवालयाच्यापुढें एका ओट्यावर लोहमय महिष बसविला होता. त्या चंडिकेच्या जवळच एक वृद्ध धार्मिक द्रविड चंडिकेचें आराधन करीत बसलेला पाहिला. तो धार्मिक द्रविड फार वृद्ध होता. त्याच्या शरीरावर सर्व शिरा वर आलेल्या स्पष्ट दिसत असत. त्याच्या गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा होत्या. चंडिकेच्या पायावर मस्तक ठेवतां ठेवतां ज्याच्या कपाळावर मोठें टेंगूळ आलें होतें. त्याचें आचरण लोकविलक्षण असे. असें पाहून चंद्रापीडास वाटलें कीं आज येथेंच निवास करावा.

तदनंतर तो चंद्रापीड अश्वावरून उतरून त्या चंडिकेच्या देवालयांत प्रवेश करून भक्तियुक्त अंतः करणानें त्या चंडिकेस साष्टांग नमस्कार करिता झाला. मग देवीस प्रदक्षिणा करून पुनः नमस्कार करून देवालयाभोंवतालच्या शांत प्रदेशाचें अवलोकन करण्याविषयीं कौतुक वाटल्यावरून आसमंताद्भागीं भ्रमण करूं लागला. तों इतक्यांत तो धार्मिक द्रविड वृद्ध होत्साता मोठ्यानें आरडत व शिव्या देत सुटला. तो चंद्रापीड कादंबरीच्या विरहानें व उत्कंठेनें त्रस्त झाला होता, तरी त्या वृद्ध द्रविडाकडे फारवेळ अवलोकन करून हास्य करिता झाला, आणि त्या वृद्ध द्रविडाबरोबर कलह करणारे व त्याचा उपहास करणारे जे आपले सैनिक लोक त्यांचें निवारण करून सांत्वयुक्त प्रिय भाषणांनीं त्या वृद्धाचा क्रोध दूर करून त्याची शांति करिता झाला. मग क्रमेंकरून त्यानें त्या वृद्ध द्रविडाला त्याची जन्मभूमि, विद्या, कलत्र, अपत्ये, विभव, वयःपरिमाण, आणि विरक्त होण्याचें कारण ह्यांविषयीं प्रश्न केले. ते प्रश्न ऐकून त्या द्रविडानें प्रत्येक प्रश्नाचें विस्तारें करून उत्तर दिलें. त्यानें आपलें वर्णन करतांना जी बडबड मांडिली तिच्या योगानें चंद्रापीडाच्या विरहातुर अंतःकरणास मोठा विनोद झाला. मग परिचय झाल्यामुळें चंद्रापीडानें त्या द्रविडास तांबूल देवविला.

इतक्यांत किरणमाली सूर्य अस्तास गेला असतां राजपुत्रांनीं व सैनिकलोकांनीं आपापल्या वैभवानुरूप व शक्त्यनुरूप अशीं वृक्षांच्या

छायेखालीं शयनाचीं स्थळें सिद्ध केलीं, घोड्यांवरचीं खोगरें काढून वृ-
क्षस्कंधांवर ठेविलीं, आपापले घोडे भूमितळावर लोळवून त्यांस पाणी
दाणा तृण देऊन पुढें रोंवलेल्या भाल्यांस बांधिले आणि दिवसभर झाले-
ला गमनश्रम स्वस्थपणें निजून घालवावा म्हणून जागजागीं पाहरेकरी
उभे केले, आणि जागजागीं आगट्या पेटविल्या त्यांच्या योगानें दिव-
साप्रमाणें जिकडेतिकडे प्रकाश पडला. असें झाल्यावर तो चंद्रापीडही
सेवकांनीं एका प्रदेशाचेठायीं बांधलेला जो इंद्रायुधनामक अश्व त्याच्या
पुढें सिद्ध केलेली व द्वारपालानें दाखविलेली जी मृदुशय्या तिजवर जा-
ऊन बसला. शय्येवर बसला असतां त्याच्या अंतःकरणास अस्वस्थ-
तेनें व अप्रीतीनें स्पर्श केल्यामुळें दर्शनास आलेल्या राजलोकांस निरोप
देऊन जवळच्या परिजनांशीं कांहीं भाषण न करितां डोळे झांकून श-
य्येवर पडला हांत्साता तो चंद्रापीड मनानेंच वारंवार त्या किंपुरुष प्रदे-
शास गमन करिता झाला, आणि अन्यविषयाकडे चित्त न देतां हेमकू-
टपर्वताच्या रमणीयतेचेंच स्मरण करूं लागला, आणि महाश्वेतेच्या अ-
कारण बांधवतेचें चिंतन करिता झाला, आणि कादंबरीचें दर्शन हेंच
आपल्या जीवित्वाचें फल म्हणून त्याचीच इच्छा करिता झाला, आणि
अभिमान शून्य अतएव अतिशोभन जो मदलेखेचा परिचय त्याची स्पृहा
करिता झाला, आणि तमालिकेस पाहण्याची इच्छा करिता झाला,
आणि केयूरकाच्या आगमनाची उत्प्रेक्षा करिता झाला, आणि हिमगृह
मनांत आणून वारंवार दीर्घउष्ण श्वास टाकिता झाला, आणि शेषना-
मक जो हार त्याजवर अधिक प्रीति करिता झाला, आणि मागें राहि-
लेली जी पत्रलेखा ती महापुण्य भागिनी अशी मानिता झाला. अशा
प्रकारें चिंतन करितां करितां निद्रा न घेतां ती रात्रि घालविता झाला.
मग प्रातःकाळीं उठून यथेछ द्रव्यदानानें त्या वृद्धधार्मिकद्रविडाचे मनो-
रथ पूर्ण करून तो चंद्रापीड तेथून निघाला, आणि आपणास अभीष्ट
जे रमणीय प्रदेश त्यांचे ठायीं निवास करीतकरीत थोड्याच दिवसांनीं
उज्जयिनीस पोंहचला.

तो चंद्रापीड अकस्मात् आला ह्याजमुळें नगरवासी लोक आनंद-
युक्त होऊन मोठ्या गडबडीनें धांवत जाऊन त्याच्या नमस्कारार्थ अंज
लिपुट जोडिते झाले. तेव्हां असें वाटलें कीं त्या लोकांनीं चंद्रापीडास पू-

जार्थ सहस्रशः कमळेंच अर्पिलीं. तीं ग्रहण करीत होत्साता चंद्रापीड नगरींत प्रवेश करिता झाला. तेव्हां मोठ्या हर्षानें धांवत जाऊन परिजनांनीं, हे देवा, चंद्रापीड आला, असें महाराज तारापीड ह्यास कळविलें. हें वर्तमान ऐकतांच चंद्रापीडाचा पिता तारापीड आनंदभरानें आक्रांत होत्साता त्वरेनें उठून उत्तरीय वस्त्र सांवरीत व आनंदाश्रूंची वृष्टी करीत राजमंडळासहवर्तमान पायांनींच चंद्रापीडाच्या समोर गमन करिता झाला. चंद्रापीडही दुरून पित्यास पाहतांच घोड्यावरून खालीं उतरला, आणि मुकुटसहित मस्तक भूमीस लावून त्यास प्रणाम करिता झाला. तारापीडानें आपले दोन्ही भुज पुढें पसरून येथे सत्वर असें आव्हान करून त्यास गाढ आलिंगन दिलें. त्या आलिंगनांतून सुटल्यावर चंद्रापीडानें पित्याच्या बरोबर आलेल्या राजमंडळास क्रमानें विनयपूर्वक नमस्कार केले. मग त्यास आपल्या हातीं धरून तारापीडानें विलासवती नामक जी आपली पट्टराणी तिच्या मंदिरास नेलें. विलासवतीनेंही आपल्या अंतःपुरसंबंधी परिवारजनासहवर्तमान समोर जाऊन त्याच्या येण्याचें अभिनंदन करून व त्यास आलिंगन देऊन आगमनकालीं करावयाचे जे मंगलोपचार ते सर्व केले. मग तो चंद्रापीड दिग्विजय यात्रेच्या कथांनीं कांहीं वेळ तेथें घालवून शुकनास प्रधानाची भेट घ्यावयास त्याच्या घरीं गेला. तेथेंही ह्याच क्रमानें कांहीं वेळ घालवून त्याच्या पुत्राचें कुशल त्यास निवेदित करून सेनानिवेशाच्या संरक्षणार्थ मी त्यास मागें ठेविलें आहे असें सांगून त्या प्रधानाची स्त्री जी मनोरमा तिला भेटून विलासवती जी आपली माता तिच्या मंदिरास पुन्हा गेला. तेथें स्नानादिक सर्व कर्में पराधीना प्रमाणें संपादून दोनप्रहर दिवसाच्या सुमारास आपल्या कुमार भवन नांवाच्या मंदिरास जाता झाला.

त्या मंदिरांत असतांही उत्कंठेनें ज्याचें अंतःकरण खिद्यमान झालें आहे असा तो चंद्रापीड केवळ आपलें गृहच शून्य मानिता झाला असें नाहीं, तर त्या कादंबरीवांचून तें सर्व उज्जयनी नगर किंबहुना सर्व भूमंडलही शून्य असें मानिता झाला. असा तो चंद्रापीड गंधर्वराजकन्या जी कादंबरी तिच्याकडील वार्ता ऐकण्याविषयीं उत्सुक होत्साता महोत्सवाप्रमाणें व ईप्सित वराच्या प्राप्तिकालाप्रमाणें व अमृतोत्पत्तीच्या

समयाप्रमाणें त्या पत्रलेखेच्या आगमनाची प्रतीक्षा करीत राहिला.

तदनंतर कांहीं दिवस गेल्यावर मेघनाद पत्रलेखेस घेऊन आला, आणि तिला चंद्रापीडाजवळ नेऊन पोहंचविता झाला. मग त्या पत्रलेखेनें दुरूनच चंद्रापीडास प्रणाम केला. तेव्हां त्या चंद्रापीडानें किंचित् हास्य करून व प्रेमभाव प्रकट करून जो आधींच प्रिय त्यावर जिनें कादंबरीचा प्रसाद हेंच दुसरें सौभाग्य संपादिलें ह्यामुळें जी अति प्रियतेस पात्रभूत झाली अशी जी पत्रलेखा ती कादंबरीकडून आपणाजवळ आली ह्यामुळें तिचा आदर करण्याकरितां आपल्या आसनावरून उठून तिचें आलिंगन केलें, आणि मेघनादानें लवून प्रणाम केला असतां त्याच्या पाठीवर हात ठेवून त्यास शाबासकी दिली. मग तो चंद्रापीड पत्रलेखेशीं बोलता झाला कीं, हे पत्रलेखे, सांग बरें, अत्यंत योग्य जी महाश्वेता, आणि तशीच मदलेखेसहित कादंबरी ह्या दोघी खुशाल आहेत काय? तसेंच तमालिका केयूरक इत्यादि परिवार कुशल आहेना? असें चंद्रापीडानें विचारलें असतां ती पत्रलेखा बोलती झाली कीं, हे देवा, जशी आपण आज्ञा करितां त्याप्रमाणें सर्वांस कुशल आहे. सखीजनाशीं व परिजनाशीं सहित देवी कादंबरी आपल्या मस्तकीं अंजलि जोडून तुमचें पूजन करीत आहे. असें पत्रलेखा बोलली असतां तो चंद्रापीड राजेलोकांचें विसर्जन करून त्या पत्रलेखेस बरोबर घेऊन अभ्यंतर प्रदेशांत प्रवेश करिता झाला. तेथें तो विरहतापानें ग्लानतेप्रत पावलेला व उत्कंठित अंतःकरणानें युक्त असा होत्साता परिजनास युक्तीनें दूर घालवून लतामंडपाच्या मध्यभागीं बसून पत्रलेखेस पुन्हा प्रश्न करिता झाला. हे पत्रलेखे, खरेंच सांगबरें, मी आल्यावर तेथें तूं कशी राहिलीस, कितीदिवस राहिलीस, देवी कादंबरीचा प्रसाद त्वां कसा जोडला, तेथें कोणत्या गोष्टी झाल्या, कोणत्या कथा चालल्या होत्या, आमचें विशेष स्मरण कोण करीत असे, कोणाची आम्हांवर प्रीति आहे? असे चंद्रापीडाचे प्रश्न ऐकून पत्रलेखा विज्ञापना करिती झाली कीं, हे देवा, अवधान देऊन श्रवण करावें. मी कोणत्याप्रकारेंकरून तेथें राहिलें, व कितीदिवस राहिलें, व देवी कादंबरीचा प्रसाद मजवर कसा झाला, व तेथें कोणत्या गोष्टी झाल्या, व कोणत्या कथा चालल्या होत्या, आणि देवाचें विशेषें करून स्मरण कोण

करीत आहे, देवावर अतिशयित प्रीति कोणाची आहे, हें सर्व मी सांगतें. असें बोलून ती पत्रलेखा आरंभापासून वृत्त सांगूं लागली.

त्या स्थळापासून आपण निघून आल्यानंतर केयूरकाबरोबर मी परत गेलें, आणि पूर्वीप्रमाणेंच त्या कादंबरीच्या पुष्पशय्येजवळ जाऊन बसलें. मला पाहून देवीचें मन फार प्रसन्न झालें. फार काय सांगावें ! प्रायशः त्यादिवशीं सारावेळ त्या देवीचे नेत्र माझ्यानेत्रांचेठायीं व शरीर माझ्याशरीराचेठायीं व आपला करपल्लव माझ्या कराचे ठायीं व नामाक्षराचेठायीं वाणी आणि प्रीतीचे ठायीं व्हदय असतें झालें. मग ती कादंबरी अपराण्ह कालीं मलाच हातीं धरून त्या हिमगृहापासून निघून स्वेच्छेनें इकडे तिकडे फिरून सर्व परिजन दूर घालवून मला एकटीलाच बरोबर घेऊन आपल्या प्रिय बालोद्यानांत प्रवेश करिती झाली. ज्याला पाचूरत्नाच्या पायऱ्या आहेत अशा वेदिकेवर चढून तेथील मणिमय स्तंभाच्या आधारानें उभीराहिली. मग फारवेळपर्यंत आपल्या अंतःकरणाशीं विचार करून कांहीं बोलावयास इच्छित होत्साती निश्चल नेत्रांनीं फारवेळपर्यंत माझ्या मुखाकडे पाहत राहिली. मजकडे पाहत असतां ती कादंबरी मदनाग्नीनें संतप्त व घर्मप्रवाहानें स्नात व भयानें कंपित व विषादानें युक्त अशी झाली.

तदनंर कादंबरीचा अभिप्राय मी जाणून काय बोलावयाचें असेल तें बोलून कळवावें, श्रवण करण्यास माझें अवधान आहे अशी विज्ञापना करिती झालें. तथापि ती कादंबरी बोलावयास इच्छित असतां लज्जेच्या योगानें जिचा शब्द कुंठित झाला अशी होत्साती कांहीं एक बोलावयास समर्थ झाली नाहीं. तिनें प्रयत्न केला तरी तिची वाणी प्रवृत्त होईना. कारण जाणों मदनाग्नीच्या ज्वालेनें दग्धच झाली काय, किंवा नेत्रोदकाच्या प्रवाहानें वाहविली काय, किंवा अंतःकरणांत प्रवेश करणाऱ्या दुःखांनीं आक्रांत झाली काय, किंवा मदनाच्या बाणांनीं छिन्नभिन्न झाली काय, असें वाटलें. मग ती अधोमुख होऊन आपल्या पादांगुष्ठानें मणिमय भूमीचें उल्लेखन करीत व दुःखसस्राचें स्मरण करून नेत्रोदकाची वृष्टि करीत स्तब्ध उभी राहिली. तेव्हां मी बोललें कीं, हे देवी, हें काय, असें काय करतेस ? निःशंकपणें बोलावें काय तें. इतकें मी बोललें तरी तिच्या मुखांतून शब्द निघेना. तिनें आपल्या नेत्रांचे

अश्रु पुसून भुंवया वर चढवून व दीर्घ उष्ण उच्छ्वास टाकून आपलें उ-द्बंधन ( गळफांस ) करून घ्यावें म्हणूनच काय कोण जाणे एक पुष्प माला हातीं घेऊन उभी राहिली. तिच्या मनांतील दुःखाचा तर्क करू-न मी पुन्हःपुन्हा पुसूं लागलें असतां लज्जेच्या योगानें भूतलाकडे निश्चल नेत्रेंकरून अवलोकन करीत फार वेळपर्यंत तशीच त्या ठिकाणीं स्तब्ध राहिली.

पुन्हा क्रमें करून माझ्या मुखाकडे दृष्टि देऊन व पुनःपुन्हा नेत्रावा-टे अश्रुबिंदु गाळून व सद्गदित कंठ होऊन कसें तरी मोठ्या कष्टानें बोल-ण्याविषयीं आपणास अभिमुख करून ती कादंबरी मजप्रत बोलती झाली. ती असें बोलली कीं, अगे पत्रलेखे, ज्या स्थानीं मला तूं दर्शन झाल्यापा-सून प्रिय झाली आहेस त्या स्थानीं तात किंवा माता, किंवा महाश्वेता, किंवा मदलेखा, किं बहुना जीवितही मला प्रिय नाहीं. मी जाणत नाहीं कीं कोणत्या कारणानें सकल सखीजनाचा परित्याग करून माझें अंतः-करण तुझ्यावरच विश्वास धरीत आहे. तर आतां मी दुसऱ्या कोणा-कडे जाऊं ? आणि आपलें दुःख कोणास सांगूं ? आणि हें माझें दुःख दु-सऱ्या कोणत्या दुःखाबरोबर मोजूं ? असा हा असह्य दुःखभार आज ए-कवेळ तुला कळवावा आणि जीवित टाकावें असा मीं निश्चय केला आ-हे, ह्याविषयीं तुझ्या जीविताची शपथ करितें. परंतु बोलवयास मला लाज वाटते. हा वृत्तांत ज्यानें जाणला आहे अशा प्रकारच्या मी आ-पल्या अंतःकरणापासून देखील लज्जित होतें, मग दुसऱ्यापासून लज्जित होतें हें काय सांगावें ? आणखी मी तुला सांगतें, चंद्रकिरणांसारखें निर्म-ल असें जें आपलें कुल त्याला मजसारखी स्त्री लोकापवादाचा डाग क-सा लावील ? आणि कुलक्रमानें आलेली जी लज्जा ती कशी टाकील ? आणि इतर कन्याजनास योग्य जें चांचल्य त्याविषयीं चित्त प्रवृत्त कशी करील ? अशी ही मी पित्यानें संकल्पित नाहीं, मातेनें दत्त नाहीं, व गु-रुजनांनीं अनुमोदित नाहीं; तसेंच मी होऊन कांहीं सांगत नाहीं, व कां-हीं पाठवीत नाहीं, व आपला आकार दाखवीत नाहीं; असें असतां भ-यचकितेसारखी, अनाथेसारखी, गर्विष्ठेसारखी, नीचेसारखी ही चंद्रापीड-नामक राजकुमारानें मोठ्या निंद्यत्वाप्रत पावविली. तर तूंच सांग बरें, हा काय थोर लोकांचा आचार ? हेंच काय परिचयाचें फल ? ज्यामुळें

अति कोमल जें माझें अंतःकरण तें पराभवाप्रत पावविलें ? ठीकच आहे, भोळा जो कुमारिका जन तो तरुण पुरुषांस प्रायशः पराभव पावविण्यास शक्य असतो, म्हणून असें केलें काय ? मदनाग्नि तर प्रथम लज्जेतें दग्ध करितो, तदनंतर अंतःकरणातें दग्ध करतो, आणि मदनाचे बाण प्रथम विनयादिगुणांचें खंडन करितात. मग मर्मस्थानांचें खंडन करितात. असो, आतां पुनः तुजशीं माझा जन्मांतरीं समागम व्हावा असें मी तुजपाशीं मागतें. कारणकीं तुझ्याहून दुसरी कोणीही मला अत्यंत प्रिय नाहीं. तर मी आतां प्राणत्यागरूप प्रायश्चित्ताचरणानें आपला कलंक दूर करितें, असें बोलून ती कादंबरी उगीच बसली.

मी खरेंच सांगतें, मला तो वृत्तांत कांहींच विदित नसल्यामुळें मीं लज्जित झाल्याप्रमाणें व भयभीत झाल्याप्रमाणें व व्याकुळ झल्याप्रमाणें व मोहित झाल्याप्रमाणें झाल्यें, आणि खेदयुक्त होऊन मीं देवीस विज्ञापना केली कीं, हे देवी, काय आज्ञा कर्तव्य असेल ती कर, मी ऐकावयास सिद्ध आहें. कुमार चंद्रापीड ह्यानें काय केलें ? तुझा कोणता अपराध केला ? अथवा कोणत्या अविनयानें देवीचें कोमल अंतःकरण त्यानें दुखविलें ? हें ऐकून घेऊन प्रथम मी त्यक्तजीवित झाल्यावर पश्चात् देवो आपलें जीवित त्यक्त करो. असें मी बोलल्यावर ती कादंबरी पुन्हा बोलूं लागली कीं, हे पत्रलेखे, अपराध सांगतें, तूं सावध अंतःकरण करून ऐक तो प्रति दिवशीं स्वप्नामध्यें येऊन मला रहस्याचा निरोप सांगण्याविषयीं पिंजऱ्यांतील राघू, मैना, ह्यांस दूत करतो. मी निद्रित झालें असतां कानापाशीं केंसांत खोंबलेल्या फणीवर संकेतस्थानें लिहितो. घर्माच्या योगानें ज्यांचीं अक्षरें पुसट झालीं आहेत, जे मनास मोह करणारे, असे सुंदर मदनलेख पाठवितो, आणखी जणो आपल्या मनांतील अनुरागच काय असा लाक्षारस घेऊन त्यानें बळेंच माझे चरण रंगवितो, आणि अविनयाच्या योगानें निश्चेतन होत्सता नखामध्यें प्रतिबिंबित झालेल्या आपल्या देहास श्रेष्ठ मानितो, आणखी खोटें प्रौढत्व दाखविणारा तो उपवनामध्यें एकटीला गांठून कोणी मला धरील ह्या भयानें मी पळत चाललें असतां मध्यें लतापल्लवास पदर गुंतल्यामुळें थबकलें असतां मागून येऊन माझें आलिंगन करतो, आणि वक्र स्वभावाचा तो माझ्या स्तन प्रदेशाचे ठायीं वेलबुटी लिहितो, ते-

णेंकरून माझ्या सरळ अंतःकरणास कुटिलपणाच काय शिकवितो असें वाटतें, आणि खोटी प्रीति दाखविणारा तो माझ्या गालांवर श्रमानें घर्मबिंदु आलेसे पाहून त्यांवर मुखानें थंडवारा फुंकितो, आणि लटकें चातुर्य दाखविणारा तो कर्णभूषणार्थ हातीं घेतलेलें कमळ हातास घाम आल्यामुळें खालीं गळून पडलें तरी आपलें करकमलच माझ्या कानावर अलंकाररूप करितो. आणि त्याचा अविनीतपणा ( धृष्टपण ) पहा कसा तो. बकुलवृक्षास सेचन करण्याकरितां म्यां मुखांत घेतलेले जे मद्याचे गुळणे ते बलात्कारानें आपल्या मुखांत घेतो, आणि निर्लज्जासारखा वागणारा तो अशोकवृक्षास करावयाचे जे पादप्रहार ते आपल्या मस्तकावर घ्यावयास इच्छितो. तर सांग बरें पत्रलेखे, मदनाच्या योगानें ज्याचें अंतःकरण मूढ झालें म्हणूनच जो चेतनारहित झाल्याप्रमाणें असतो, अशा पुरुषाचा कोणत्या प्रकारानें निषेध करावा ? तो असा आहे कीं, निषेध केला तरी ईर्ष्या अशी संभावना करितो; त्याचें निर्भर्त्सन केलें तरी तो विनोद असें समजतो; संभाषण न केलें तरी तो मानच असें मानतो; त्याच्या दोषांचें उद्घाटन केलें तरी तो स्मरण करण्याचा उपाय असें समजतो, आणि अवज्ञा केली तरी तो निष्प्रतिबंध प्रेमा अशी कल्पना करितो; आणि लोकापवाद प्राप्त झाला तरी तें यशच असें गणितो. ह्याला काय म्हणावें ?

असें कादंबरीचें भाषण ऐकून मला जो हर्ष झाला तो माझ्या पोटांत मावेना. तेव्हां मीं असें मनांत आणिलें कीं, मकरध्वज जो मदन त्यानें ही कादंबरी चंद्रापीडाच्या उद्देशें करून खचित आकृष्ट केली आहे, फारच आकृष्ट केली आहे, हें मोठें आश्चर्य होय. जर खरेंच कादंबरीच्या मिषानें साक्षात् कामदेवाचीच अंतःकरणवृत्ति चंद्रापीडावर प्रसन्न झाली असेल, तर त्याचे साहजिक व संवर्धित जे गुण त्यांनीं त्याजवर मोठाच प्रत्युपकार केला, आणि यशानें दिशा शुभ्र केल्या, आणि तारुण्यानें प्रीतिरस समुद्राच्या तरंगाकडून रत्नांची वृष्टि करविली, आणि सौभाग्यानें आपली शोभा चंद्रावर पाडिली, आणि वसंत कालानें आपणास योग्य असें फल मिळविलें, आणि मन्मथयुगानें आपल्या अवताराचें मुख दाखविलें. मग मी विशेषेंकरून हास्यकरून उघडपणें कादंबरीस बोललें कीं, हे देवी, जर अशी गोष्ट आहे तर क्रोध टाकून दे आ-

णि प्रसन्न हो. मदनानें केलेले अपराध देव चंद्रापीड ह्याजकडे लावून त्यांच्या योगानें त्यास दूषित करावयास तूं योग्य नाहींस. हा दुष्ट मदन मोठा धूर्त आहे. त्याचेंच हें सर्व कृत्य. चंद्रापीडाकडे कांहीं नाहीं. असें मी बोलल्यावर कादंबरी कौतुकयुक्त होऊन उलटून मला बोलली कीं, तूं म्हणतेस तो हा मदन किंवा कोणी कां असेना, परंतु सांग बरें त्याचीं रूपें कोणतीं तीं ? असें कादंबरीनें मला विचारल्यावर म्यां कादंबरीस उत्तर दिलें कीं, हे देवी, त्या मदनास रूप कोठून असणार ? शरीर विरहित हा विलक्षण अग्नीच आहे. तो असा कीं, ज्वालांच्या पंक्ति प्रकट न करितां संताप उत्पन्न करितो, व धुराचे लोट प्रकाशित न करितां नेत्रांपासून उदकें पाडवितो, व भस्माचे रेणु बाहेर न दाखवितां शरीरास पांडुरता आणितो. एवढ्या त्रिभुवनामध्यें असा कोण आहे कीं, जो मदनाच्या बाणास लक्ष्यभूत झाला नाहीं, किंवा होत नाहीं, किंवा होणार नाहीं ? त्या मदनाच्या बाणापासून कोणता पुरुष सुटला जाणार आहे ? त्याचे बाण जरी पुष्पमय आहेत तरी तो बलाढ्य पुरुषास आपल्या बाणांनीं वेधिल्यावांचून सोडीत नाहीं. ज्या कामिनी स्त्रियांस मदनाचे बाण लागले त्या स्त्रिया चिंतेनें आपल्या प्रियपुरुषांचे मुखचंद्र पाहत असतां त्यांस एवढें मोठें आकाशतल परंतु तें सहस्रावधि मुखचंद्र मावावयास अपुरतेंसें वाटतें. आणि प्रियाच्या आकृति लिहावयास एवढें विस्तीर्ण भूतल तें अल्पसें वाटतें, आणि आपल्या प्रियवल्लभाच्या गुणांची गणती करावयास प्रसिद्ध जी परार्धपर्यंत संख्या ती फार थोडीशी वाटते, व प्रियजनाच्या कथा ऐकत असतां वाग्देवता जी सरस्वती तीही बहुभाषण करणारी नव्हे असें वाटतें, आणि प्राणासारखा प्रिय जो वल्लभ त्याच्या समागम सुखाचें ध्यान करीत असतां काल अत्यंत अल्पसा वाटतो. अशीं मदनाचीं लक्षणें आहेत.

तदनंतर ती कादंबरी असें माझें भाषण ऐकून क्षणभर विचार करून पुनः मजशीं बोलूं लागली, अगे पत्रलेखे, जसें तूं सांगतेस तसाच हा जन ( म्हणजे मी ) मदनानें कुमाराविषयीं पक्षपात धरणारा केला आहे. मदनाचीं जीं रूपें त्वां सांगितलीं तीं सर्व माझें ठायीं वर्तताहेत. तूं तर माझ्या अंतःकरणाहून वेगळी नाहींस, म्हणून ह्या कालीं तुलाच मी विचारितें, ह्याविषयीं जें मला योग्य असें तुझ्या चित्तास वाटेल त्याचा तं

मला उपदेश कर. मी तर अशा प्रकारच्या वृत्तांताविषयीं अनभिज्ञ (अचतुर) आहें, आणि सांप्रत गुरुजनांनीं दोष ठेवण्यास पात्रभूत आणि लज्जेनें ग्रस्त अशी मी झालेली आहें. अशा मला जीवित्वापेक्षां मरणच अतिप्रशस्त आहे असें माझें अंतःकरण मानीत आहे.

असें कादंबरी बोलल्यावर मी तिला म्हटलें कीं, हे देवी, पुरे पुरे, कारणावांचून इतका मरणाविषयीं अतिशयित आग्रह कशास पाहिजे? आराधन केल्यावांचून प्रसन्न झालेला जो भगवान् कामदेव त्यानेंच हा तुला वर दिला आहे. ह्याविषयीं तुझ्या मातापितरांचें बोलावयाचें काय राहिलें आहे? कारण, ज्या कालीं पित्याप्रमाणें कामदेव कन्यकेस पतीला देण्याविषयीं संकल्प करितो, व मातेप्रमाणें अनुमोदन देतो, व भ्रात्याप्रमाणें दान करितो, व सखीप्रमाणें उत्कंठा उत्पन्न करितो, आणि उपमातेप्रमाणें प्रीतीचे उपचार करावयास शिकवितो, त्याकालीं तो गुरुजनाची अपेक्षा ठेवीत नाहीं. तुला आणखी सांगतें, मागें बहुत कन्यांनीं स्वयंवरविधीनें पति वरिले, परंतु त्यांस कोणीं दोष ठेविला नाहीं. असें नसतें तर धर्मशास्त्रामध्यें जो स्वयंवर करण्याचा प्रकार सांगितला आहे तो व्यर्थ होईल. ह्याजकरितां हे देवी, प्रसन्न हो, आणि मरणाविषयीं जो त्वां अत्याग्रह धरिला आहे तो सोडून दे. मी तुझ्या पादकमलाचा स्पर्श करून शपथ करितें, मला आज्ञा कर, मी अशीच जातें आणि तुला अतिप्रिय जो देव चंद्रापीड त्यास घेऊन येतें. असें माझें भाषण ऐकून कादंबरीस फार आनंद झाला, आणि मजकडे आदरपूर्वक अवलोकन करूं लागली. तेव्हां प्रीतिरसानें आर्द्र झालेल्या दृष्टीनें माझें ती प्राशनच करिते काय असें वाटलें, आणि मला देण्याकरितांच कीं काय कोण जाणे, ती आपल्या कंठांतील मोत्यांचा हार काढूं लागली. तेव्हां असें वाटलें कीं मदनानें कंठांत घातलेला मरण पाशच काढीत आहे. अशी ती कादंबरी हर्षातिशयानें व्याकुल होत्साती कन्याजनाची जी स्वाभाविक लज्जा तिचा अवलंब करून हळूहळू मजप्रत बोलूं लागली.

अगे पत्रलेखे, मी जाणतें कीं, तुझी मजवर मोठी प्रीति आहे, आणि म्हणूनच तूं असें बोललीस परंतु शिरीषकुसुमासारख्या मृदुप्रकृति स्त्रीजनास इतकें प्रौढत्व कोठून असणार? असणार नाहीं. विशेषेंकरून बाल-

त्वामुळें कुमारिकाजनास तर नाहींच नाहीं. त्या स्त्रिया तर साहसकर्म करणाऱ्या होत, ज्या आपण होऊनच निरोप पाठवितात किंवा उठून जातात. तर असें साहसकर्म करण्याविषयीं बालत्वामुळें मला लाज वाटते. बरें निरोप तरी कोणता पाठवावा ? तूं मला अतिप्रिय आहेस असा पाठवावा तर पौनरुक्त्य होतें, किंवा मी तुझा प्रिय आत्माच आहें असें म्हणणेंही जडत्वाच्या प्रश्नासारखें होतें. तुजविषयीं मोठा अनुराग आहे, असें म्हणणें हें वेश्यांच्या भाषणासारखें होतें. तुझ्यावांचून मी वांचत नाहीं, असें म्हणणें अनुभवास विरुद्ध आहे. मदन फार मला पीडा देतो असें म्हणणें हें आपला दोष आपणच कळविणें होय. मदनानें मी तुला अर्पिलें, असें म्हणणें पुढें जवळ चालून जाण्याचा उपाय होय. म्यां बळेंच तुला वरिलें असें म्हणणें हें कुलटेचें धाष्टर्य होय. त्वां इकडे अवश्य यावें असें सांगून पाठविणें हें सौभाग्य गर्व दाखविणें होय. मीच स्वतां तुजकडे येतें असें म्हणणें हें स्त्रीचापल्य होय. हा जन अनन्यरक्त आहे असें म्हणणें हें आपलें लघुत्व दाखविणें होय. प्रत्याख्यानाच्या शंकेमुळें निरोप पाठवीत नाहीं हें म्हणणें अप्रबुद्ध बोधन होय ( निजलेल्यास जागें केल्याप्रमाणें होय. ) अथवा मरणानें प्रीति जाणशील असें सांगून पाठविणें हें असंभाव्य आहे. ह्याप्रमाणें अनेक कल्पना काढून देवी कादंबरी माझ्याशीं बोलली.

पुढील कथा उत्तरार्धांत लिहिली आहे.

पूर्वार्ध समाप्त.

---